विद्यावृद्धीविषयीं परमोत्सुक आणि

लोकमान्य

ती. रा. रा. गोविंदराव विनायक

ऊर्फ

दासोपंत तात्या साहेब नरगुदकर

यांस

पितृभक्ति पुरःसर

हें

पुस्तक

अर्पण केलें असे.

बालक

विनायक गोविंद लिमये

पुस्तक कर्ते.

# मुलीची सासरी वागणूक

## आणि

# संगीत "कन्याविक्रय" व

# त्याचे परिणाम.

### परमेश्वराची प्रार्थना.

( दत्तात्रयाची स्तुति. )

( पद ) राग झिंजोटी; ताल धुमाळी.

" दिसली पुनरपि गुप्त जाहली " या चा० )

अनुसूयेचें सत्व हराया ब्राह्मणवेषें त्रयमूर्ती ॥
हरहरब्रह्मा इच्छाभोजन मागाया द्वारीं येती ॥ ध्रु ॥
कौतुक करुनी सति बोले त्यां काय असे हो
इच्छा ती ॥ भिक्षुक आह्मीं इच्छाभोजन देई आह्मां
ानि सती ॥ १ ॥
स्नान करुनी लवकर यावें पात्रें थंडहि कीं
ती ॥ परिसुनिया ते काय बोलती नग्न होउनी
वीं तीं ॥ २ ॥
ओळखुनीयां अवश्य वदुनी पति जवळी गेली
ति ती ॥ गंगोदक देउनिया बोले तिची सखये
ांजप्राति ॥ ३ ॥

परिसुनिया तें करितां झाली नूतन ऐशीं बाळें तीं ॥ सतिसत्त्वातें बघुनी विस्मय हरिहरब्रह्मा मनिं करिती ॥ ४ ॥

प्रसन्न होउनि येऊं उदरीं हाच सतीतें वर देती ॥ तो दत्तात्रय करुणासागर देवो मज काव्यीं स्फूर्ती ॥ ५ ॥

श्वशुरवास कन्येचा रचितों असूनियां मी मंद मती ॥ सफलद होवो हीच विनायक कर जोडुनि या करि विनती ॥ ६ ॥

---

# प्रस्तावना.



पुरातनकाळीं **स्त्रिया** विद्वान होत्या; उदाहरण **गार्गी**, **गौतमी**, इ०. ह्यावरून **स्त्रियांस** विद्या शिकविण्याची चाल होती, असें अनेक **शास्त्रें**, **पुराणें**, आणि **इतिहास**, इत्यादि **प्राचीनग्रंथा**वरून निर्विवाद सिद्ध होत आहे. तरी ह्या भरतखंडावर अनेक वेळीं व अनेक प्रसंगीं, राज्यक्रांती सारख्या महत्संकटांचे प्रसंग आल्यामुळें व मुख्यत्वें **अविवाहित स्त्रियांवर यवनांची जबरी** होऊं लागल्यामुळें **स्त्रियांस** शिकवून सज्ञान करून मग त्यांच्या इच्छेनुरूप त्यांचीं **लग्नें** करण्याची चाल **बंद** झाली. ती इतकी कीं, **आठवर्षांवर मुली लग्नाच्या** राहूं नयेत, आणि त्यांस **श्रुत्योपदेशक** करूं नये, असें शास्त्रच झालें !! हर हर! केवढा हा भ्रममूलशास्त्रार्थ ! असो; आतां ती वेळ गेली, सुदैवानें **न्यायी**, **दयाळू** आणि **प्रजोत्कर्षोत्सुक**, अशा **इंग्रज** सरकारचें राज्य झालें, तरीही **स्त्रियांनीं** अज्ञानांतच रहावें? अगदीं वाईट. हें आह्मां एकट्यांसच वाईट वाटतें असें नसून "**राज्यकर्त्यांच्या उपदेशानें देशहिताचें बीजारोपण ज्यांच्या हृदयांत झालेलें आहे अशा सुधारकांनीं**" त्याविषयीं खटपट चालविली आहे, हें पाहून कोणास बरें आनंद होणार नाहीं? ज्याला आपली

**स्त्री, माता, भगिनी,** इत्यादि ज्ञानी असाव्या, **असें** वाटत असेल, त्याला तर आह्मांप्रमाणें आनंद झालाच पाहिजे.

आतां सूक्ष्म दृष्टीनें विचार करून पाहतां जरी **स्त्रीशिक्षणाविषयीं** अनेक प्रकारच्या खटपटी चालू आहेत, तरी त्यांच्या वाचनासाठीं योग्य अशीं **पुस्तकें** कोणी प्रसिद्ध केल्याचें आढळत नाहीं. तेव्हां ती उणीव अंशतः तरी दूर व्हावी, ह्या हेतूनें आह्मीं, **कुलीन व ज्ञानाभिलाषी देशभागिनींच्या** सत्कालक्षेपार्थ "**मुलीची सासरी वागणूक**" आणि "**संगीत कन्याविक्रय व त्याचे परिणाम**" ह्या नांवाचें हें पुस्तक तयार केलें आहे. ह्याची रचना लहान **मुलीपासून** पोक्त **स्त्रीला** वाचावयास योग्य अशी केलेली असून ह्यावेळीं ह्यांत अनेक प्रकारची **उपयुक्त** माहिती दिली आहे. व **संगीताचे** चालीवर अनेक **पद्यें** ही दिलीं आहेत, तीं **स्त्रीपुरूषाचे** फारच उपयोगाचीं आहेत.

**स्त्रियांस** ( लहानमुलीस ) शिक्षण कोणत्या प्रकारचें व कसें द्यावें ? **लग्न** झाल्यावर **सासू मुलीला** कसें वागविते ? त्यापासून अनिष्टपरिणामीं वैर कसें उत्पन्न होतें आणि **स्त्रीपुरूषांनीं** कोणत्या प्रकारानें वागावें ? इत्यादि अनेक उपयुक्त विषयांचें ह्या पुस्तकांत सयुक्तिकपणानें वर्णन केलें आहे.

पूर्वीं ह्या पुस्तकाच्या पाहिल्या **भागाच्या पाहिल्या** आवृत्तींत थोडकेच विषय देऊन ह्याचा **दुसरा** भाग

छापणार होतों; परंतु ही आवृत्ति संपून बऱ्याच लोकांच्या मागण्या राहिल्या म्हणून तो **दुसरा भाग**ही यास जोडून ही आवृत्ति काढली आहे. संगीत "**कन्याविक्रय**" हा भाग तर सर्व **संगीतांतच** आहे. तर सर्व **स्त्रीहितचिंतकांनीं** उदार आश्रय द्यावा, अशी विनंति आहे.

Vinayakrao Govindrao Limaye,

Author.

Girgam, Bombay, 1-I-1886.



# मुलींची सासरी वागणूक

आणि.

# संगीत "कन्याविक्रय" व त्याचे परिणाम.

## भाग १ ला.

## सदुपदेशाच्या चार गोष्टी.

( पद ) राग काफी—ताल दीपचंदी.

"वाढविलां सेवीत जावें" या चालीवर.

लवकर प्रातःकालीं उठावें ॥ नित्य प्रभुला प्रेमें भजावें ॥ ध्रु ॥ सासूश्वशुरां पतीस नमावें ॥ निज-कार्यीं हो दक्ष रहावें ॥ गृहसंबंधी कृत्य करावें ॥ तुटुनी कोणासी न वदावें ॥ भृत्यगणावरि सदय असावें ॥ धैर्यें दुःखासी सोसावें ॥ सौख्यागमनीं मत्त न व्हावें ॥ गुण तुमचे कीं सुजनीं गावें ॥

( १ ) प्रातःकाळीं व सायंकाळीं ईश्वराची प्रार्थना करावी ह्मणजे तेणेंकरून त्याची प्रसन्नता व साह्य मिळतें. मनुष्यमात्रास ईश्वराची प्रसन्नता व साह्य संपादान करणें हें अति अवश्य आहे. कारण कीं, त्याचे प्रसन्नतेवांचून आपले जन्माचें सार्थक व त्याचे साह्यतेवांचून आपलें कोणतेंही काम सिद्धीस जात नाहीं. जरी उद्योग करण्याचीं साधनें ईश्वरानें दिलीं आहेत, व यांची योजना आपण करावी, हें ठीक आहे, तरी देवाची ' मदत असली तर आपले उद्योग सिद्धीस

जातात. आतां **ईश्वराची** प्रसन्नता कशानें मिळेल, याचा विचार केला तर पापापासून दूर राहणें, त्यानें जे नियम केले आहेत त्याच त्याच्या आज्ञा, त्यांचें पाळण करणें, सदाचारसंपन्न असणें, ह्मणजे **क्रोध, लोभ, भांडण, मत्सर, शिव्या, अमंगळपणा, ढोंग, ढौल**, इत्यादि दुर्गुणांचा त्याग करणें, सत्य मार्गानें, सत्य व्रतानें व सत्य वचनानें चालणें; याचें नांव सदाचार आहे. अशा वर्तणुकीवर आपली बुद्धि निश्चयानें टरण्याकरितां ईश्वराचें भय पाहिजे. दुराचार केला तर ईश्वर शिक्षा करितो. सदाचार केला तर ईश्वर प्रसन्न होतो. हें लक्षांत ठेवून त्याचें भय मनांत राहण्याकरितां त्याचें स्मरण करून उपासना ( प्रार्थना ) करावी.

( २ ) **वडिलांची** मर्यादा राखणें, ह्मणजे प्रथम **आईबाप** आणि **राजा** यांहून या जगांत थोर दुसरे नाहींत. याकरितां त्यांणीं सांगितलेलें ऐकावें. त्यांचा अनादर करूं नये. आपल्याहून श्रेष्ट असतील त्यांशीं लीनतेनें वागावें. कारण लीनता ह्मणजे आपल्यास लहान समजणें. आपल्यास गर्व करण्याजोगें आपल्याजवळ कांहीं नाहीं, हें खचीत आहे. तत्रापि जरी कांहीं असलें तरी तें ईश्वराचे कृपेनें आलें आहे. परंतु त्याविषयीं आपण गर्व करणें हें पाप आहे. कोणतेही प्रसंगीं गर्व करणें हें अनुचित व लोकांस त्रासदायक आहे. याजकरितां आपले मनांत आपण सर्वांहून लहान आहों, असें समजून चालावें. याचें नांव **लीनता**. ही अंगीं

असली ह्मणजे सर्व आपल्यावर दया करितात. व अनेक पापें टळतात. सासू, सासरा, नवरा, दीर ह्यां सर्व वडील माणसांचा मान राखावा. त्यांस राग येईल असें कांहीं करूं नये. यापासून बहुत फायदे आहेत.

( ३ ) आपले घरची, अन्नवस्त्राची व शरीराची स्वच्छता चांगली ठेवावी, ओंगळपणा ह्मणजे अमंगळपणा हा अनेक पापांचें व रोगांचें कारण आहे. याजकरितां, स्नान करणें, वस्त्रें निर्मळ ठेवणें, पाणी गाळून पिणें, केर काढणें, हातपाय धुणें, यांस आळस करूं नये. हें आपल्या हिताचें काम आहे.

( ४ ) संसार, ह्मणजे विनाकारण डौलाकरितां निरुपयोगी व्यय न करणें याचें नांव दक्षता. भोळसरपणानें किंवा अभिमानानें बायका फाजील खर्च करतात, दुसऱ्यास देतात, ही चाल वाईट आहे. याजकरितां आपले वडिलांचे संमतीनें थोड्या खर्चांत लौकीक फार व उपयोग फार होईल, असा खर्च करावा. बहुत खर्चाकडे अगदीं लक्ष देऊं नये. द्रव्य श्रमावांचून प्राप्त होत नाहीं, याजकरितां परोपकार किंवा स्वसंरक्षण यांजकडे मात्र तें लावावें. अन्यथा खर्च करणें हें पापच आहे. वस्त्रें व दागिने यांजवर विशेष भर नसावा. कारण मनुष्यास सद्बुद्धि, विद्या, सद्गुण, हेच अलंकार आहेत. आणि ते जसे पुरुषांस शोभवितात. तसे स्त्रियांसही शोभवितात. त्यांची बरोबरी कोणत्याही रत्नांनीं

किंवा धातूंनीं व सुंदर वस्त्रांनीं होणार नाहीं. यास्त हे नेमस्त असावें.

( ५ ) व्यासंग, ह्मणजे विद्येवर लक्ष देणें. जितका वेळ सांपडेल तो बुद्धि वाढविण्याकडे लावणें. सर्वांस रिकामा वेळ सारखा नसतो; कोणास अनेक संसार प्रपंचाचीं कामें असतात, त्यांत वेळ जातो; परंतु कोणास थोडा अवकाश सांपडणार नाहीं असें नाहीं. कितीएक गुरें राखतां राखतां विद्या शिकले, चाकरी करितां करितां विद्वान् झाले, याचें कारण काय कीं, त्यांणीं आपला वेळ फुकट जाऊं दिला नाहीं. एवढी गोष्ट लक्षांत ठेवली तर मनुष्य फार शहाणें होईल. जरूरीचीं कामें करून बाकी वेळ जो राहील तो वाचण्याकडे, अर्थ करण्याकडे, गणितपुस्तकाकडे द्यावा. गेला वेळ तो पुनः येत नाहीं, अशी ही अमुल्य वस्तु आहे. पण त्याचा उपयोग न केल्यामुळें लोक उनाड, अज्ञानी, दांडगे' दुष्टकर्मी होतात. ह्मणून जसें द्रव्य तसाच काळ. तो कसा जातो, काल मी काय शिकलें, आज आणखी काय शिकावें, याची विवंचना ठेऊन पुस्तकें वाचण्याचा बहुत अभ्यास करून त्याचा विचार करावा. असें करितां करितां बुद्धि विशाळ होऊन ज्ञान होतें.

( ६ ) आळस. हा मोटा शत्रु आहे. याला जिंकला पाहिजे. विश्रांति वेगळी व आळस वेगळा आहे. विश्रांति पाहिजे; परंतु आळस नसावा. ह्मणजे विश्रांतीचें कारण नसतां काम न करणें, रिकाम्या गप्पा मारणें, पडून

राहणें, या सर्वांचें नांव आळस. मनुष्यानें हें ध्यानांत ठेवावें कीं, आपला काळ फुकट जाऊं देऊं नये. मी काल किती शहाणा होतों, आज किती अधिक झालों, हें तपासावें. जसे सावकार व्याजाचा हिसेब पहातात, तसाच ज्ञानाचाही सर्वांनीं पहावा. त्यांत शिकणारे मुलींस तर तें अति आवश्यक आहे. मनुष्यांचें मन रिकाम्या पिशवीप्रमाणें आहे. जें जें भरावें तें त्यांत राहील आणि किती राहील याचा नेम नाहीं, एवढी मोठी ती पिशवी आहे. यास्तव त्यांत चांगल्या कल्पना भरून तें सुशोभित करावें.

( ७ ) दया, ह्मणजे दुसऱ्याचें चांगलें करण्याकरितां झटणें, यास दया ह्मणतात. जों जों ज्ञान वाढतें तों तों दया वाढते. जों जों ईश्वराचें भय व ईश्वराविषयीं ज्ञान वाढतें तों तों दया वृद्धिगत होते. याचें कारण ईश्वर परम दयाळू आहे. हा त्याचा गुण आपल्यास समजला ह्मणजे तसें चालण्याची त्याची आज्ञा समजून ती आपण त्याचे भयानें मोडीत नाहीं. तो सर्वत्र प्रकाशमान आहे असें समजलें ह्मणजे आपल्या सारखी परक्याचे ठायीं बुद्धि होऊन दृष्टीमध्यें समता येते. तसेच दुसऱ्याची हकीकत समजून घेतली ह्मणजे त्याजवर दया करावी किंवा नाहीं हें समजतें. याजकरितां सर्व प्राणिमात्रावर दयाभाव असावा, व त्यांस विद्यादिकेंकरून उंच प्राणी करावें. शाळा घालणें गायन करणें, वाचणें, विचार करणें, या सर्वांचा हेतु

एकच आहे कीं, ज्या प्राण्यास शक्ति आहे त्यास सद्बुद्धि देऊन पहिल्यापेक्षां चांगला करावा. उदारबुद्धि व्हावी या करितां मुलास लिहिण्याचें सामान देण्यांत, बुकें घेण्यांत कमती करूं नये. यथाशक्ति दुसऱ्याचे मुलासही उत्तेजन देण्यास कमी करूं नये. दरिद्री, पीडित, रोगी, अज्ञानी यांस चांगलें तृप्त, निरोगी, ज्ञानी करण्याचा कळवळा राखावा हा सामान्य धर्म आहे. दुष्टकर्मी, व धूर्त इत्यादिकांची मात्र दया करणें ठीक नाहीं, तथापि त्यांस सुधारण्या विषयीं दयापूर्वक त्यांशींही वर्तावें हें योग्य आहे.

( ८ ) अवधारणा, ह्मणजे जें वाचलें तें समजून ध्यानांत ठेवणें, त्याविषयीं विचार करणें आणि त्याप्रमाणें चालणें. सर्व शिकण्याचें फळ इतकेंच आहे कीं, सद्बुद्धि सत्कर्म, सद्गुण हे संपादन व्हावे. मन व बुद्धि मोठीं होऊन पदार्थांचें यथायोग्य ज्ञान व्हावें. बालत्वापासून अनेक प्रकारच्या भ्रांती असतात त्यांचा निरास व्हावा. सत्याची अभिरुचि लागावी. असत्याचा तिरस्कार व्हावा. लीनता, नम्रता, प्रगट व्हावी. द्वेष, मत्सर, क्रोध इत्यादि दुर्गुणांची शांति व्हावी. आणि वाईट वासना नष्ट व्हाव्या. सदुद्योगीं लक्ष जडावें. हे सर्व मुद्दे ध्यानांत ठेऊन ते आपल्या हातीं येतील अशी सर्व शिकणाऱ्यांनीं तजवीज करावी. एक किंवा दोन ग्रंथ वाचण्यानें विद्या होत नाहीं. अनेक ग्रंथांचें अवधारण झालें पाहिजे. याजकरितां जसें संसारसंबंधीं वस्त्रपात्र

संग्रह करितों त्याच प्रमाणें प्रत्येक घरीं ग्रंथांचा संग्रह करून त्याचा उपयोग करावा, हें फार अवश्यक आहे. स्वभाव एक प्रकारचा असतो पण तो अभ्यासानें दुसऱ्या प्रकारचा होतो, म्हणून त्यास विद्येची जरूर आहे. त्याचा लाभ मुलांस व मुलींस झाला नाहीं, तर तीं बुद्धिमान व विद्वान होणार नाहींत. यास्तव हा लाभ ज्या मुलींस आहे त्यांणीं आपल्यास मोठें भाग्यवान् समजावें.

---

## मुलीची सासरी वागणूक

### पद.

राग झिंजोटी–ताल–धुमाळी
( शुक चंचूतुनी–याचा० )

लहानपणा पासुनी पोशीलें ॥ दुग्ध पाजुनी मुलि वाढविलें ॥ द्वादश वर्षे तुज पाळीलें ॥ परवस्तू परि तूं ॥

सुधि सुज्ञानी कुलवान जनिता ॥ सौम्य कृपाळू वत्सल माता ॥ यांचे उदरीं जन्मा घेता ॥ बाळे तुज पति तो ॥

पतिसदनीं आनंदें रहावें ॥ श्वशुरश्वश्रु आश्रया जावें ॥ दुःख खेद ना मनिं मानावें ॥ परधन तूं बाई ॥

मातावंधूपितावियोगें ॥ दुःख मनीं तूं न

**आणी गे ॥ सर्वाग्राहि तुज जाणी पति गे ॥ सुशील वर्ति हो तूं ॥**

**नित्यं पतिच्या कुशली रहावें ॥ तदाज्ञेसी मनिं मानावें ॥ रोषित कधिं ना स्वयें करावें ॥ पति लागुनि बाई ॥**

**पतिसत्कार्यी साह्यकरी तूं ॥ धर्मानुकुला होइ सुते तूं ॥ कीं भावित प्रभुची करुनि तूं ॥ साधी मुक्तीतें ॥**

**सौम्यवृत्ति ती संतत ठेवी ॥ जेणें जनिं तुजशोभा यावी ॥ सौजन्यानें कीर्ति व्हावी ॥ मृदुमितवच वद गे ॥**

**लज्जित स्मितवदना तूं व्हावें ॥ दुष्ट अशा कोपा त्यागावें ॥ आप्तजनांसि तूं सेवावें ॥ किंकरिं ठेवि दया ॥**

एखादें राज्य काबीज केल्यावर त्या राज्यांतील प्रजेशीं ज्याप्रमाणें राजाला वागावें लागतें, त्याप्रमाणेंच किंबहुना त्याहीपेक्षां ज्यास्त सौम्यपणानें व शहाणपणानें आणि प्रेमानें **मुलीला सासरीं** वागावें लागतें. **संसार** हें एक लहानसें राज्यच आहे. तेव्हां **मुलीच्या आईबापांनीं** आपल्या विवाहित **कन्येच्या** हातीं **सासरची** पूर्ण सत्ता आल्यानंतर त्या सत्तेची तिला योग्य व्यवस्था करतां येण्याविषयीं काळजी वाहणें व उपदेश करणें अवश्यक आहे. **मुलीला सासरीं** पाठविणें हें आईबापांना दुःसह असून जन्मापासून ममतेनें व लाडिवाळपणानें वागविणाऱ्या आईबापांना सोडून परगृहीं

एकटें निघून जाणें हें मुलीलाही फार दुःसह आहे. सृष्टिक्रमाप्रमाणें ही गोष्ट अवश्य असल्यामुळें मोटमोठ्या सार्वभौम राजांनींही आपल्या लाडक्या **कन्या** सुशील व विद्वान अशा गरीब मुलांच्या स्वाधीन करून दूर देशांतील पर्णकुटींत राहण्याकरितांही पाटवून दिल्याचीं इतिहासांत उदाहरणें आहेत. तेव्हां ज्या ठिकाणीं कांहीं ओळख देखील नाहीं अशा घरीं राहून तेथील लहानापासून तों थोरापर्यंत सर्व मनुष्यांची प्रीती संपादन करणें आणि **पतीस** अंकित करून आपली त्याठिकाणीं छाप ठेवणें हें मुलीला किती दुर्घट आहे बरें ? याकरितां मुलीनें सासरच्या सर्व मनुष्यांशीं प्रेमानें वागलें पाहिजे. सर्व तरुण आणि सुशील मुलींनीं ही गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. पण जिला **सासर** म्हणजे काय व **नवरा** म्हणजे काय, हें पुरतें समजत देखील नाहीं अशा अल्पवयीं मुलीला हें दुःसाध्य होय. मुलीचें कल्याण करणें हें सर्वपरी तिच्या आईबापांच्या व **सासुसासऱ्यांच्या** हातीं आहे.

**वृक्षावरील लतेप्रमाणें बाळपणापासून आईबापास** चिकटून राहिलेली जी लाडकी **कन्या** ती एकाएकीं त्यांस सोडून परकीय गृहीं जाऊं लागली म्हणजे त्यांस किती वाईट वाटेल हें सांगण्याची जरूर नाहीं. कारण त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेलीं हजारों कुटुंबें निघतील. तरी हें मात्र खरें कीं आईबापांस जरी वाईट वाटलें तथापि तें सर्व एकीकडे ठेऊन त्या परकीय

परंतु कन्येच्या खरे मालकीच्या घरीं तिला कोणत्या रीतीनें सुख होईल, तिनें त्या ठिकाणीं कसें वर्तन ठेवावें वगैरे गोष्टींची आईबापांनीं तरतूद करून ठेवणें हें त्यांचें मुख्य कर्तव्य होय. हजार पांचशें रुपये घेऊन एखाद्या ह्मातारड्याला मुलगी दिली ह्मणजे त्याचा सर्वच प्रकार दुःखमय होतो.

अलीकडे परकीयांचे संगतीनें **स्त्रियांची** स्वतंत्रता व त्यांचे अधिकार या संबंधानें कित्येक लोकांची फार चमत्कारिक तऱ्हेची समजूत होऊन गेली आहे. सर्व लहान मुलींनीं व त्यांतून **सुनेनें** याप्रमाणें वागावें:-**वडिलांची शुश्रूषा करणें, सवतीशीं प्रियसखी प्रमाणें वागणें व पतीनें अपमान केला असतांही त्याजवर न रागावणें. स्त्रिया** जर स्वतंत्रता, अधिकार आणि योग्यता यांचे संबंधानें **पुरुषाशीं** समान आहेत तर **स्त्रियांनीं** वरील प्रकारचें ताबेदारीचें काम करावें ही एक मोठी शंका त्यांस घेण्याजोगी आहे. परंतु थोडा विचार केला तर या शंकेंत कांहीं अर्थ नाहीं, असें लक्षांत येईल. ज्याअर्थीं **स्त्रिया** या आपले आईबापांचे घरांतून निघून अगदीं अपरिचित व अश्रुत अशा घरीं येऊन त्यांस तेथील सर्व मनुष्यांची प्रीति संपादन करावयाची असते, इतकेंच नव्हे तर ती त्या घराची स्वामिनी बनते, तेव्हां अशा मनुष्यांना आपल्यास आवडतें करून घेण्याविषयीं स्त्रियांना किती जपलें पाहिजे हें सांगावयास नको. तेव्हां स्त्रियांचे अंगीं अशाप्रकारची

बुद्धि उपजण्यास त्यांच्या आईबापांनीं लहानपणापासू-न त्यांस शिक्षण दिलें पाहिजे.

हल्लीं **मुलीची सासरीं** जी वर्तणूक असते व तसें-च **सासरचीं** माणसें त्या **मुलीशीं** ज्या रीतीनें वागतात, त्याचे योगानें अनेक कुटुंबांनीं एकमेकांवर प्रीती करावी हा जो **विवाह**कर्माचा मुख्य फायदा तो एकीकडे राहून उलट त्यांच्यांत कलागती व वैमनस्यें उत्पन्न होतात. आणि या वैमनस्याचा असा भयंकर परिणाम घडून येतो कीं, त्यापासून विवाहकार्यांतील मुख्य भाग जो नवरानवरीचें ऐक्य, तें एकीकडे राहून-त्या नूतन **स्त्रीपुरुषांचें** जोडप्यांतही अप्रीति व अविश्वास उत्पन्न होतो. आणि असें झाल्यानें घरामध्यें भिन्नाचार व तंटे उपस्थित होऊन मोठें नामांकित व अनुदार घराणें असलें, तथापि थोड्या काळांत त्याची वाताहात लागून जाते. या कामीं दोघांकडूनही चुका होतात. ह्मणजे असें:-सर्वापेक्षांही उभयपक्षांकडून विशेष ही चूक होते कीं, लग्न करावयाचें ह्मटलें ह्मणजे नवरान-वरीचे फायद्याकडे, हिताकडे व सुखाकडे बिलकुल लक्ष न देतां दोनही कुटुंबांतील माणसें आपल्या मर्जी-प्रमाणें व लौकिकाप्रमाणें वागून सरासरी शोभेकरितां नवरानवरी उभीं करितात. प्रस्तुतचे विवाहाचे प्रकारास अनुसरून एका कवीनें ह्मटलें:-

**कन्या वरयते रूपं । माता वित्तं पिता श्रुतं ॥**
**बांधवाः कुलमिच्छन्ति । मिष्टान्नमितरेजनाः ॥**

लहानपणीं **मुलीला नवरा** कसा पाहिजे ह्मणून विचारलें तर चांगला **गोरागोमटा**, सुरेख हवा असें ह्मणते. कारण ज्या प्रमाणें **सुंदर स्त्रियांकडे पुरुषांचें** तद्वतच सुंदर **पुरुषाकडे स्त्रियांचें** मन स्वाभाविक ओढतें. आतां **स्त्रियांचे** नुसते स्वरूपाकडे लक्ष देणेंही योग्य नाहीं. कारण मनुष्याला मुख्य भूषण ह्मटलें ह्मणजे सद्गुण होय. परंतु सुंदरपणा हा दृष्टिरम्यतेचा एक मुख्य भाग असल्यामुळें जनांचें चित्त तिकडे लागणें साहाजिक आहे. सद्गुण आणि सुशीलपणा हीं अनुभवांतीं कळतात. आणि यामुळेंच स्त्रियांना अज्ञानपणामध्येंही समजण्याजोगा जो मुख्य भाग तेवढा आपले पतीचे अंगीं असावा असें तिला वाटतें. ही गोष्ट कन्येची झाली. आतां तिची आई असते तिला वाटतें कीं आपल्यास मिळणारें सोयरें चांगलें सधन व सुखी असून मुलीचे आंगावर चार टळक टळक डागडागिनें पडतील अशी सोय झाली पाहिजे. बापाला असें वाटतें कीं ज्यांच्याशीं आपल्याला सोयरीक करावयाची ते चांगले अब्रुदार व लौकिकवान असावे ह्मणजे आपल्याला भूषण आहे. मुलीचे बंधूंना असें वाटतें कीं, आपल्याला मेहुणे चांगले कुळांतले, हौशी, व रंगेली, असावे ह्मणजे बरी बहार होईल. ही गोष्ट मुलीच्या मुख्य आप्तांची झाली. याखेरीज ज्या आत्या, माम्या, मावश्या, काक्या, भावजई, आणि इतर सुहृत्संबंधी मंडळी राहिली त्यांस लुगडें, चोळीं, नारळ व चमचमित घीशक्कर

झाडण्यास मिळाली, ह्मणजे तीं सर्व होळीच्या होळकरां. प्रमाणें होऊन कार्य आटोपतांच चोहोंकडे पळून जातात.

## भाग पहिला समाप्त.

---

## भाग २ रा.

### ॥ पद ॥

राग—आनंदभैरवी; ताल—दादरा

( " काय मला भूल पडली " या चा. )

**दुःखद कां श्वशुरवास मुलिसि वाटतो ॥ श्वशुरगृहीं स्थिति बघुनी जीव पोळतो ॥ ध्रु ॥ विहिणी माना पमान तिजशि जाचतो ॥ पुढति तिचा पति वयस्क प्राण होइ तो ॥ दुःखद तो वाटुनि मग सौख्य अर्पितो ॥ १ ॥**

मुलाकडच्या पक्षाचा सर्व झोंक फारच मानाचा असतो. तथापि त्यांत मुलाचे आईच्या एकंदर बातबेतांत व विचारांत आणि मुलीच्या आईच्या विचारांत जमीनअस्मानाचें अंतर असतें. ह्मणजे मुलीचे आईला—हुंडी पटवायाचा प्रसंग असेल तर तो खेरीज करून बाकीचे प्रसंगीं—केवळ मुलीचे कल्याणाचीच विशेष कळकळ असते. तथापि हें खरें कीं, जर भरपूर डागिने अंगावर पडतात असें वाटलें तर मग सुखाकडे ती फारसें लक्ष पोंचविणार

नाहीं. परंतु आपला थाटमांड व बातबेत कसा राहिल याची तिला विशेषशी पर्वा नसते. कारण प्रस्तुतचे विवाहविधीमध्यें मुलीकडील पक्षाचा एकंदर मान कमी असून मुलीचे आईला तर पुष्कळच ताबेदारी सोसावयाची असते. तेव्हां सरासरी विहीण फारशी खाष्ट न मिळतां फारशा रुसण्या फुगण्यावांचून एकदां कार्य तडीस जावें, इतकेंच ती इच्छित असते. पण मुलाचे आईचा प्रकार तसा नाहीं. लग्नांतील पुष्कळ सोहोळे व ऐश्वर्य भोगण्याचा तिला अधिकार असतो. यामुळें मुलाची आई प्रथम सोयरें कसें आहे, आपले मानापानाला विहीण कितपत जपेल, रासन्हाणीं वगैरे बातबेत ठीक उतरेल किंवा नाहीं, आपण रुसून बसलों असतां आपली नीट समजावणी करून विहिणी आपल्यापुढें नाक घांसतील कीं नाहीं, पायघड्यांचा थाट जमेल कीं नाहीं, इत्यादि भिकार गोष्टींचीच विहिणींना मोठी पंचाईत पडलेली असते. आणि वरील थाटांत कांहीं बिघड होईल, याकरितां त्याजबद्दल अगाऊ ठराव करावे लागतात. हे सर्व बातबेत ठीक असले तर मग मुलीमध्यें जरी कांहीं गोम असली तथापि तिकडे कोणी विशेषसें लक्ष देत नाहीं. खेरीज वर सांगितल्याप्रमाणें जरी कितीही ठराव झाले तथापि लग्नांत शेवटीं रुसवा होऊन विहिणीविहिणींचे व होतां होतां व्याह्याव्याह्यांचे तंटे होऊन वैमनस्याची सुरवात होते. परंतु चालू कार्यांत विघ्न होऊं नये ह्मणून जमलेले वऱ्हाडी त्या

उभयतांची कशी तरी एकदां समजावणी करून मिष्टान्ना-च्या लाग जाऊं देत नाहींत. पण शेवटीं वरील सोयऱ्या-मध्यें जें एकदां वितुष्ट पडतें तें बहुधा पुढें नवरानवरी-च्या व त्या उभय कुटुंबांतील सर्व मनुष्यांचे सुखाचें वाटोळें करण्यास कारणीभूत होतें.

हा सर्व समारंभ आटोपला "ह्मणजे **मुलीनें सासरीं कसें वागावें,**" याचा तिचे आईनें तिला उपदेश करायाचा, किंवा **मुलाचे आईनें** आपले **सुनेस** सद्वर्त-नाचा मार्ग दाखवावयाचा, तो एकीकडे राहून **मुलाची आई** विहिणीवरील सर्व राग नंतर **सुनेवर** काढण्याची सुरवात करते.

ज्या गोष्टी बद्दल मुलीचे आईला फार वाईट वाटेल अशा गोष्टीचे संबंधानें नेहमी वाईट बोलणीं त्या मुली-चे समक्ष बोलावयाचीं, तिच्या खाण्यापिण्याची हेळसांड करावयाची, तिला नाहीं नाहीं तीं कामें सांगावयाचीं, ती वयांत आल्यावर तिचे संगतीं नवरा चांगल्या रीतीनें वागून आपला सूड उगवण्यांत कमीपणा येईल असें समजून मुलाचे मनांत जेणेंकरून तिजवि-षयीं अप्रीति उत्पन्न होईल अशा गोष्टी हमेषा सांगा-वयाच्या, अशा जाचणुकीनें ती मुलगी अगदी कंटाळून व फार त्रासून जाते. तिला सासऱ्यांहून कधीं एकदां माहेरीं जाईन असें होतें. पण सासुबाई तिला कुठल्या जाऊं द्यायला! कारण सुनेच्या संबंधानें तिला अनन्याधि कार व सार्वभौमसत्ता प्राप्त झालेली असते. पुढें मुलगी

फार कंटाळली असें तिच्या आईबापांस वाटलें व तिला नेहमीं होणारा सासुरवास त्यांचे कानीं आला, ह्मणजे मुलीस आणण्याकरितां ते बलावणें पाठवितात. पण सासुबाई कुठल्या एका बलावण्यानें मुलीस पाठ- वावयाला! ! इतकेंच नव्हे, पण सुनेजवळ वाचलेली कर्मकटकट पुन: त्या बलावणेकऱ्यास देखील सांग- ण्याची सुरवात होते. मिळून अशीं कित्येक बलावणीं परत गेल्यावर पुढें मुलीचा बाप किंवा आई यांस समक्ष येण्याचा प्रसंग येतो. तीं आल्यानंतरही पुनः विहिणीची सुरवात तीच. शेवटीं तीं बिचारीं आपल्या मुलीची कशी तरी नीट नांदणूक व्हावी ह्मणून विहिणीबाईची समजूत घालून एकदां मुलीला घेऊन जातात.

ही मुलगी घरीं गेल्यानंतर तिच्या आईबापांनीं तरी झाले गोष्टीकडे दुर्लक्ष करून स्वस्थ बसावें; पण तेंही नाहीं. मुलीस झालेल्या सासुरवासाची कहाणी सांग- ण्यास तींच उलट तिला उत्तेजन देतात, आणि मुलीला तरी प्रीतीचा अनादी ओढा माहेरचाच असल्या मुळें तीही सर्व इत्थंभूत हकीकत सांगण्याची सुरवात करिते. कारण, अगोदर तिचे तें मनांत असून खेरीज आईबापांकडून उत्तेजनही मिळतें. मग काय! घडलेले हकीकतीस आणखी तिखटमीठ लावून ती सांगते. जगांत असा मनुष्य विरळा मिळेल कीं, ज्यास मर्मभेदक भाषण व निंदा सहन होईल. तशांतून ऐकीव गोष्टी

वरून परस्परांविषयीं वैरभाव मनांत ठेवणें हा अशिक्षित स्त्रियांचा मोटाच दुर्गुण आहे. एकाद्या बाईस सहज जर कोणी ह्मटलें कीं, "तुमची शेजारीण तुह्मांला कज्जेदलाल ह्मणते, असें माझे मैत्रिणीला तिची शेजारीण सांगत होती, असें ती माझे जवळ बोलली" तर येवढ्या कर्णोपकर्णी ऐकलेल्या गोष्टीवर विश्वास ठेऊन जरी शेजारणीशीं तिचें सख्य असलें तरी देखील तें या निराधार व ऐकींव गप्पेवरून सर्व फुकट जाऊन, ती मनांत मोटा रोष धरून मुद्दाम होऊन त्या शेजारणीशीं तंटा करण्यास जाईल.

आतां सर्वच स्त्रिया अशा तऱ्हेच्या कज्जेदलाल असतात, असें आमचें ह्मणणें नाहीं; परंतु वरील प्रकारच्या स्त्रियांची संख्या एकंदरींत बरीच, किंबहुना शेकडा नव्याण्णव ह्मणण्या सारखी निघेल. याचें कारण अशिक्षितपणा व अज्ञान होय. आतां स्त्रियांस आह्मीं जो दोष दिला तशा प्रकारचे गुण पुरुषांतही आढळतात, हें येथें सांगणें रास्त आहे. कारण, एकतर्फी लिहिण्यानें लेखाचें महत्व कमी होतें, असें एका विद्वानाचें ह्मणणें आहे. स्त्रियांचे दुर्गुणाचें निदर्शन करतांना पुरुषांचे दुर्गुणही जगापुढें मांडून त्या परस्परांतील न्यूनाधिकपणा दाखविला पाहिजे.

स्त्रियांप्रमाणेंच पुरुषामध्येंही प्रकृत दुर्गुण असतो ह्मणून जें आह्मी वर ह्मटलें आहे, तें जरी खरें आहे, तथापि त्याविषयीं स्त्रिपुरुषांचें मान ताडून पाहि-

लें असतां जमिनअस्मानाचें अंतर दृष्टीस पडेल. ह्मणजे वरील दुर्गुण त्यांचे ठिकाणीं आहेत अशी स्त्रियांची संख्या जर शेंकडा ९९ मिळाली, तर पुरुषांची फार झाल्यास पांच मिळेल. याचें कारण सुशिक्षा होय. तशांतून सोयरगतीमध्यें तर स्त्रियांचे मनांत जो द्वेषभाव येतो, तो विलक्षण असून खेरीज ती निंदा किंवा कुटाळी मुलीचे तोंडांतून ऐकि- ल्यास मग तर बोलावयासच नको. क्षुल्लक कारणा- वरून तंटयास येणें व तंटा सुरू झाला ह्मणजे उखाळ्या पाखाळ्या काढून नेहमी मनांत आढी धरणें, हे दुर्गुण स्त्रियांत बहुधा असतात. हा अनुभव सर्वांस आहेच. मग मुलाचे आईकडे वरचढपणाचें नातें असून ती जर निंदा करील तर मुलीच्या आईला फार राग येईल हें उघड आहे. तेव्हां परस्परांमध्यें अशा रीतिनें वैमनस्य उत्पन्न होतें.

असो. अशा प्रकारें मुलीचे सासरच्या माणसांनीं तिच्या आईबापांची केलेली निंदा त्यांणीं मुलीचे तों- डांतून चांगली तिखटमीठ लावून ऐकिली ह्मणजे मुली- चे आईला जो द्वेष उत्पन्न होतो, त्या पुढें एखाद्या बादशाहाचा आपले शत्रूविषयींचा रागही तुच्छ होय. असो, तिला किती जरी राग आला तथापि ति- चे हातीं असा कांहीं अधिकार नसतो, कीं बुवा उठेल आणि मुलीचे सासूला किंवा तिच्या आप्ताला जाऊन शिक्षा करील! ! परंतु उलट तिला आपला राग विहि-

णीस न दाखविण्याजोगा तिजवर तिचा धाक असतो. कारण बिहिणीशीं तंटा बखेडा केला तर ती आपल्या मुलीला जास्तच जाच करील अशी तिला धास्ती असते. आतां असा जर प्रकार आहे, तर मुलीचे आईनें आपला सर्व राग गिळून जाऊन आपल्या मुलीची चांगली समजूत करून सासूजवळ तिला नीट रीतीनें वागण्याविषयीं उपदेश करावा. परंतु आरंभापासून सर्वच प्रकार अज्ञानपणाचा झालेला असतो त्यामुळें तिला ही अक्कल सुचणार कोठून! असो, याप्रमाणें मुलीचे तोंडांतून निंदा ऐकिल्यानें पित्त खवळून जाऊन तिला सदुपदेश करण्याचें तर एकीकडेसच राहिलें; परंतु उलट तिला सासूची अवज्ञा व अपमान करण्याविषयीं जास्त उत्तेजन मिळतें. सासूनें सांगितलेलें काम ऐकलें न ऐकलेंसें करावें; जावा, नणदा इत्यादिकांशीं उद्धटपणानें वागावें, सर्वदा रागावलेलें असावें, आपल्याला होईल तेवढें काम करून जास्त त्रास देऊं लागल्यास करीत नाहीं ह्मणून साफ सांगावें, असा मुलीस उपदेश होऊं लागतो. मग काय !! मुलगी ती तर बोलून चालून अज्ञानच असते, आणि सासूच्या त्रासदायक वागविण्यानें ती कंटाळलेली असून खेरीज आईकडून अशी फूस मिळाल्यावर मग ती कमी कशाला करते?

बायकांचे तोंडांत कोणतीही गोष्ट रहात नाहीं हें प्रसिद्ध आहे. या कामीं त्यांचा स्वभाव इतका उतावळा

असतो कीं, त्यामुळें आपलें प्रत्यक्ष नुकसान होण्याजोगें आहे असें जरी त्यांस माहीत असलें तरी ती गोष्ट त्यांस पोटांत ठेवतां येणार नाहीं. आपल्या मुलीनें विहिणीची सांगितलेली कागाळी केव्हां एकदां शेजारणीस सांगेन अशी तिला घाई होऊन तिचें पोट फुगून जातें. असो, मुलीला वरील प्रकारचा उपदेश करतांच शेजारणीस तो सर्व कावा सांगण्याकरितां ती मुद्दाम आपले घरून उठून तिजकडे जाते. तेथें गेली ह्मणजे आमचे विहिणीनें असें करावें कां? तसें करावें का? ती अशीच आहे ! ! तिची मुलगी तशी आहे ! ! इत्यादि प्रकारानें यथेच्छ निंदा करून घरीं येते, तेव्हां तिला समाधान वाटतें. पुढें तिच्या किंवा विहिणीच्या आप्तां पैकीं कोणी भेटल्यास हीच कर्मकटकट ! ! असो या प्रमाणें मुलीचे आईचे तोंडांतून अशीं ज्याचे त्याचे जवळ मुक्ताफळें निघूं लागलीं ह्मणजे एकीनें दुसरी जवळ व दुसरीनें तिसरीजवळ असी लावालावीची परंपरा लागून अखेरीस मुलीचे सासूचे कानांत तिच्या विहिणीनें केलल्या निंदेचा पाऊस पडतो. मग काय? अगोदरच ती रुद्रावतारी झालेली असते. आणि त्यांत विहिणीचे अशा चेतवण्याची भर पडली ह्मणजे, ती आपलें उग्र **भीमरूप** प्रकट करून लगेच **सुनेला** बलावण्यावर बलावणीं पाठवून घेऊन येते. कारण, त्या उग्रस्वरूपाचा प्रताप दाखविण्याला ठिकाण कायतें तेवढेंच असतें ! ! मुलीचे आईबापांचा सर्व राग

काढावयाचा मुलीवरच. कारण मलीचे आईला प्रत्यक्ष शिक्षा करण्याचा हिला कांहींच अधिकार नसतो. मिळून या उभयतां विहिणींचे कलागती पासून त्रास, दुःख, व सासुरवास काय तो त्या बिचाऱ्या गरीब पोरीला ! ! !

## भाग दुसरा समाप्त

---

## भाग तिसरा.

# मुलीची सासरी वागणूक

### कामदा.

राग अलैया बिलावल–ताल धुमाळी.

(" खेळ चांगला " या चा· )

**सासुचे गृहीं नित्य राहुनी ॥ काळ घालवी प्रेम दाऊनी ॥ आवडे जनां सून ती अशी ॥ जाण आपुली कन्यका जशी ॥**

मुलीचें लग्न होऊन ती सासरीं गेली म्हणजे दिवसेंदिवस तिणें सासुसासऱ्याला, इतर आप्तांला व आपल्या प्रिय पतीला सुख देऊन त्या सर्वांची प्रीति संपादन केली पाहिजे. तिणें माहेरचा ओढा सोडून देऊन सासर हें आपलें घर, सासू सासरे हे आपले सेव्य, व आपला प्रियपति हेंच आपलें दैवत,

अशी आपली भावना ठेविली पाहिजे; याकरितां तिणें माहेरच्या मनुष्यांवरील ममता कमी करावी, किंवा त्यांचा समाचार घेऊं नये असा अर्थ नाहीं. तिणें यथाशक्ति आपल्या आईबापांचा समाचार घेऊन त्यांस होईल तो पावेतों मदत करावी हें योग्य आहे. हें सांगण्याची देखील गरज नाहीं कारण, कारण आईबापांवर प्रीति करण्याची तिला जन्मापासून-च संवय असते. तेव्हां तें सांगण्याची गरज नाहीं. परंतु सासरचे मनुष्यांवर प्रीति करण्याचा तिला अभ्यास करावयाचा असतो. आतां मुलगी वयांत आल्या-नंतर जगाच्या नियमाप्रमाणें ती आपले पतीवर जरी प्रीति करते तथापि त्या प्रीतीमध्यें, व तिणें आपला व व पतीचा संबंध ओळखून आणि आपले व पतीचे हक्क जाणून जी पतीवर प्रीति करावयाची त्यांत अंतर असतें.

अलीकडे लहानपणीं लग्न करण्याची चाल पडल्या मुळें मुली आपला सासरच्या मनुष्यांशीं काय संबंध आहे हें समजत नाहीं. आईबापांचे आग्रहास्तव व आपल्या बरोबरीच्या लहान मोठ्या मैत्रिणींचें पाहूनच ती काय तें सासरीं राहण्याचें कबूल करते. वास्तविक सासरीं राहण्याची तिच्या अंतःकरणांत इच्छा नसल्यामुळें केवळ परकीं अशीं जीं सासरचीं मनुष्यें त्यांजवर तिणें प्रीति तरी कशी करावी? " आई गोड किंवा खाई गोड " अशी एक प्रचारांत

ह्मण आहे. तिचा अर्थ असा कीं, मनुष्याची प्रीति आईवर किंवा आई प्रमाणेंच जो आपलें संगोपन करून ममता करतो व खाण्यापिण्याची काळजी घेतो, त्याजवर असते. आईवर तरी प्रीति असण्याचें कारण, ती जन्मापासून खाणें पिणें व लालन पालन करिते हें होय. ज्या मुलांची आई लहानपणीं मृत झाली असते, तीं, आई प्रमाणेंच लालन पालन करणारी जी दाई वगैरे कोणी असते, तिजवर अतिशय प्रीति करितात. किंवा आई जिवंत असतांही एखाद्या ममताळू मनुष्या-वर मुलांची प्रीति असते. तेव्हां तात्पर्य काय कीं, प्रीति ही लालनपालनानें जडलेली असते. आतां मनुष्य ज्ञानी होऊन आपले स्वाधीन झालें ह्मणजे त्यास सारासार विचार समजूं लागून प्रीति कोठें ठेवावी व अप्रीति कोठें करावी हें जाणण्याची शक्ति येते. परंतु हें समजण्यास ज्ञानाची गरज असते. तथापि हल्लीं ज्या वयामध्यें मुलांचीं लग्नें होतात त्या वयामध्यें त्यांस वरील ज्ञान असण्याचा संभव नाहीं. यामुळें नवरा नवरी हीं उभयतांही आपापले आईबापांवर प्रीति करीत असून परस्परांचे संबंधाविषयीं अपरिचित व अज्ञानी असतात.

आतां मुलीचें लग्न होऊन ती सासरीं गेली ह्मणजे ती अल्पवयी असल्यामुळें तिचा सर्व ओढा अर्थातच आईबापांकडे असणार. तेव्हां तिला तो विसर पडून तिणें आपणावर प्रीति करावी ह्मणून सासुसासऱ्यांनीं

व त्यांतही मुख्यत्वेंकरून सासूनें विशेष काळजी घेतली पाहिजे. परंतु अलीकडे सुनबाई घरामध्यें येतांच तिजवर कामाकाजाचें व अदबीचें जे बोजें पडतात, त्यांचे योगानें तिचे मनाला जास्त त्रास व दुःख होऊन तिचे अंतःकरणांत सासरचे मनुष्यांविषयीं वाईट बुद्धि उत्पन्न होते. सर्वांहून त्या मुलीवर विशेष प्रीति करणार ह्मटला ह्मणजे काय तो पति होय. परंतु त्याणें तर तिच्याकडे पाहणें देखील अमर्यादा समजली जात असल्यामुळें, आणि अज्ञान दशेमुळें तोही बायकोशीं आपलें कर्तव्य काय आहे हें जाणीत नसल्या मुळें, तिकडून कांहींच उपयोग होत नाहीं सासूचा प्रकार तर वर सांगितलाच आहे. आतां मुलीला कामकाज सांगण्याचे संबंधानें तिच्या सासूला आह्मीं जो दोष दिला आहे त्याजवरून कित्येकांस असें वाटेल कीं, ही रीत फारच गैर आहे, सुनेला पाटावर बसवून ठेवून सासूनें हमाला सारखें खपावें हा कांहीं न्याय नाहीं.

सुनेनें सर्व कामकाम आटोपून खेरीज सासूची व नवऱ्याची शुश्रुषा केली पाहिजे. सदर स्त्रीशिक्षणामध्यें लहान मुलीस अशी फूत मिळूं लागली ह्मणजे त्याचा परिणाम फारच वाईट होईल, आणि नवरा जरी समजुतदार असला तथापि त्याणेंही आपल्या आईचे मर्जीविरुद्ध बायकोला डोक्यावर चढवून आईचा अपमर्द करणें हें योग्य नाहीं, असें दूषण देण्यास

जे कित्येक भोळसर व स्त्रीशिक्षणाविषयीं नाकें मुरडणार गृहस्थ असतील ते शेवटीं ह्मणूं लागतील कीं, आतां काळच फिरला. स्त्रिया शहाण्या व्हाव्या ह्मणून लोकांनां वाटूं लागून त्यांजवर नवऱ्यांनीं प्रीति कशी करावी याचे निबंध लिहिण्याचा प्रसंग येऊं लागला. आणि त्याचा परिणाम काय? तर सासूनें सुनेला काम सांगूं नये व नवऱ्यानें तर तिला डोईवर चढवावी. इतक्या बेतावर येऊन शेवटीं ते ह्मणतील कीं, आतां हें कलीचें माहात्म्यच असें आहे. दिवसेंदिवस बायकोचें माहात्म्य वाढून आईबापांची हेळसांड होणार, ह्मणून साधुसंतांनीं भाकित करून ठेवलें आहे, त्याचा अनुभव येणारच. कलियुगामध्यें लोकांची स्थिति कशी होईल या विषयीं तुकोबानें एके ठिकाणीं ह्मटलें आहे:—

**पलंगीं बैसवूनि राणी। माते हातें आणवी पाणी॥**
**स्त्रिये पाटावांची चोळी। माता अखंड चिंध्या गाळी॥**

आतां कित्येक ठिकाणीं वरील भोळसर लोकांची समजूत भलतीच होईल, त्याला आमचा कांहीं इलाज नाहीं. परंतु वास्तविक विचार केला असतां स्त्रीशिक्षणाविषयीं आमचें मत मुळींच तसें नसून स्त्रियेला पाटावर बसवून आईला काम करण्यास सांगावें असें आह्मीं केव्हांही प्रतिपादन केलें नाहीं.

तथापि हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मुलाचे आईबाप आपल्या मुलाचें लग्न करून देऊन आयुष्यांतील अतिशय महत्वाचा जो स्त्रीपुरुषांचा निकट संबंध

तो जोडून दिल्यावर त्यांणीं त्या उभयतांमध्यें जेणेंकरून प्रीति व विश्वास उत्पन्न होईल त्या रीतीनें त्यांस वागविलें पाहिजे. शेंकडों रुपये खर्च करून घरांत जी सून आणावयाची व जिला सर्व घरदाराची आणि कुटुंबी मनुष्याची अधिकारी, स्वामिनी आणि संबंधी बनवावयाची, तिला नाखुष करून आपणाविषयीं व आपल्यासंबंधीं लोकांविषयीं तिच्या मनांत अप्रीति व अविश्वास उत्पन्न करणें अप्रशस्त होय.

हें कामकाज करण्याकरितां व ताबेदारी बजावण्याकरितांच जर मनुष्य पाहिजे असेल, तर त्या करितां पैसे खर्च करून आपल्या घरादाराची मालकी ज्याच्या स्वाधीन करावयाची असें मनुष्य आणण्यापेक्षां एकादा नोकर ठेवला तर त्याहीपेक्षां जास्त हितावह होऊन आपला हुकूम जास्त काळजीनें व सक्तीनें तो ऐकेल असें करतां येईल. आणि इतकें करून कदाचित् तो आपल्या मर्जीविरुद्ध किंवा निष्काळजीनें वागला तर त्यास एकदम हांकून देतां येईल. परंतु सुनेचा प्रकार तसा नाहीं. तिजकडे कालांतरानें घरादाराची सर्व मालकी सोंपवावयाची असते; याजवरून तिच्या अंगीं दक्षता, सद्गुण, आणि सासरच्या मनुष्यांविषयीं प्रेम कितपत असलें पाहिजे, हें येथें सांगण्याची जरूर नाहीं. आणि तिच्या अंगीं जर प्रेम नसेल तर जोंपर्यंत तिजवर सासूचा दाब असून तिचें कांहीं चालत नसेल तोंपर्यंत ती कांहीं बोलणार नाहीं—परंतु जेव्हां संसा-

रामध्यें तिचें प्राबल्य वाढून सासू सासऱ्यादिक वडील माणसांस वृद्धापकालामुळें तिचे हाताखालीं दिवस काढण्याचा प्रसंग येईल, तेव्हां तीही पूर्वीचें सर्व उसनें काढून घेतल्यावांचून राहणार नाहीं, अशा प्रकारचीं शेंकडों उदाहरणें आपल्या अनुभवास येत आहेत.

आतां सासूनें सुनेचे हाल केले किंवा तिला सासुरवास केला ह्मणून सुनेनेंही तसेंच करावें, हें कुलीन मुलीस योग्य नाहीं खरें; परंतु त्या सुनबाईचे ज्ञानास लहानपणापासून सुशिक्षणाचा विटाळ देखील झालेला नसतो, यामुळें तें थंड पाण्यांत टाकलेल्या तुपाचे थेंबा प्रमाणें संकुचित व सारासारविचाररहित झालेलें असतें. येऊन जाऊन तिला सन्मार्गाचा कित्ता घेण्यास काय ती सासूबाई! पण तिचे तोंडांतून शिव्या. अपशब्द व कुजकट संभाषणें यां वांचून सुबोध वचनें कधींच ऐकिलेलीं नसतात, यामुळें सुनेसही पुढें तोच कित्ता लागतो.

जी सासू आपल्या सुनांपासून आपल्यास सुख व्हावें असें इच्छित असेल, तिनें स्वतःच्या सासूला किंवा वडील माणसांला सुखी ठेवून व त्यांची आज्ञा पाळून पुढील संततीस कित्ता लावून दिला पाहिजे. तसें न करितां तीच जर आपल्या सासूचा छळवाद करीत असेल तर तिची सूनही पुढें तोच कित्ता घेईल.

सद्गुणसंपन्न अशी मुलगी सासूचे दुर्गुण जरी पहा-

कू असली तथापि ती त्यांचाच आंगिकार न करितां उ-लट आपल्या सुस्वभावानें सासूचेही दुर्गुण काढून टाकिते. परंतु अशा स्त्रिया फार थोड्या; आणि तशांतून दुसरें असें कीं, मुलीला सन्मार्गास लावण्याचें ज्या आईबापां-चें व सासू सासऱ्यांचें काम, त्यांणींच जर आपल्या क-र्तव्याची हेळसांड केली. तर मग त्या मुलीचे अंतःकर-ण तरी सुप्रकाशित व्हावें कसें! आणि तिला जर सा-ंसारविचार समजला नाहीं, तर तिजपासून सासू इत्यादिकांस सुख कोठून होईल! याकरितां विशेषें-करून बायकांचीं अंतःकरणें सुशिक्षित व सन्मार्गग्राहक असलीं ह्मणजे त्यापासून कुटंबामध्यें संतोष व ऐक्य यांचीं वृद्धि होऊन परस्परांस परस्परांपासून अगणित सुखाचा लाभ होतो. व सुनेस "परगृहास अति दुः-खद" असें जें कवींनीं भाकित करून ठेविलें आहे. त्या-चा खरा अर्थ व अनुभव समजून ती सासरच्या मनु-ष्यांवर व संपत्तीवर मिळविलेल्या स्वामित्वाचा पूर्ण सुखानुभव घेतें.

एका सुशील सुनेनें आपल्या शहाणपणानें सद्गुणानें सासूच्या हेकड व त्रासिक स्वभाव ताळ्या-स आणून तिच्या पासून आपल्या आजेसासूस होणा-ऱ्या दुःखांतून फार शहाणपणानें सोडविलें आहे.

भाग १ ला समाप्त.

# भाग ४ था.

## मुलीची सासरी वागणूक

### भजनी गीत.

राग–झिंझोटी; ताल-धुमाळी.

( 'शुक चंचूंतुनी' याचा. )

छळितां सासू सुनेलागीं ॥ ती न मोजितें मग ति-
जलागीं ॥ संसारासी लावून आगी ॥ दुर्दशा करिती ॥१॥
सून काळें कर्ती होतां ॥ मग सूनें सासुसी छळितां ॥
दुःख तिचें तें वर्णन करितां ॥ मति माझी खुटते ॥२॥

एक कर्कश व खाष्ट बाई आपल्या सासवेचा पुष्कळ दिवसपर्यंत जाच सोसून पुढें मोठी झाल्यावर जेव्हां सर्व संसार तिचे हातांत आला व ती ह्मणेल तसें होईल असा जेव्हां पति इत्यादिकांवर तिचा पूर्ण अमल बसला, तेव्हां तिणें आपल्या सासूचा सूड उगविण्यास आरंभ केला. या योगानें घरांत तंटे व मारामाऱ्या होऊन कुटुंबांतील सर्व मनुष्यांस मोठा त्रास होऊं लागला. सासू फार वृद्ध व अशक्त झाली असल्यामुळें ताज्या रक्ताचे सुनेपुढें तिचें कांहीं चालेना. ती तिला हरएक संबंधांत फार दुःख देऊं लागली. तिच्या जेवणाखाण्याची अव्यवस्था करावी;

वस्त्रपात्राची वेळच्या वेळीं सोय करूं नये, व जेव्हां तेव्हां तिला हिडिसफिडिस् करून तिचा उपमर्द करावा, असा या खाष्ट सुनबाईनें क्रम चालविला. घरांत या द्वाड सुनबाईची एक सुनबाई होती. ती वयानें जरी लहान—ह्मणजे सुमारें १५।१६ वर्षांची होती, तथापि ती सुशील व सद्गुणसपन्न असून स्वभावानें फारच गरीब व ममताळू होती. तिच्या माहेरचें घराणें थोर असून तिला लहानपणापासून चांगलें शिक्षण असल्यामुळें तिची बुद्धि पोक्त झाली होती. तिलाही आपल्या सासूचा जाच कमी होता असें नाहीं, परंतु ती समजुतदार व विचारी असल्यामुळें कोणतेही तऱ्हेनें उलट जबाब न देतां सर्व गोष्टी ती निमुटपणें ऐकून घेत असे. तथापि आपल्या सासूपासून आजे सासूला होणारा त्रास पाहून तिला फार वाईट वाटत असे. परंतु बिचारी करते काय ? सासूच्या कडक स्वभावापुढें तिचें कांहीं चालत नसे. सासूच्या मर्जीविरुद्ध तिणें त्या ह्मातारीचें कांहीं काम काज केलें, कीं लगेच तिचीच खरडपट्टी निघून ह्मातारीला दुप्पट त्रास होत असे. अशा रीतीनें ती ह्मातारी तर अगदीं कंटाळून आपली कांहीं तरी तजवीज करण्याविषयीं आपल्या मुलाची प्रार्थना करूं लागली. मुलास, तिला होणारा त्रास न खपून शेवटीं त्याणें तोड काढली कीं, त्या ह्मातारीनें शे

[illegible] पडलें होते

त्यांत वेगळें रहावें, असें ठरवून बिचाऱ्या त्या म्हाता-ऱ्रीला थोडीं भांडींकुंडीं व कांहीं चिरगट पांघरूण दे-ऊन आणि सहा महिन्यांची तिची खाण्याची सोय करून ज्या घरामध्यें तिणें मालकीनें व सुखानें जन्म घालविला त्या घरांतून शेजारचे झोंपड्यांत तिचें बिऱ्हाड नेऊन ठेविलें. या व्यवस्थेनें म्हातारीला किती बरें वाईट वाटलें असेल? पण उपयोग काय! सत्ते-पुढें शहाणपण नाहीं हें उघड आहे. वृद्धापकाळा-मळें तिचे हातांतील गृहकृत्याची सर्व मालकी सुने-कडे गेल्यामुळें ती निरुपाय होऊन शेजारचे झों-पडींत जाऊन राहिली. तें तिला प्रथम सुखकारक वाटलें, पण बिचारी म्हातारी—एक तर वय झालें होतें, आणि खेरीज जन्मापासून असा एकलकोंडें राहण्याचा प्रसंग नव्हता यामुळें—अगदीं कंटाळून आयुष्याचे दिवस मोजीत बसली. हा सर्व प्रकार त्या म्हातारीची नातसून जी पूर्वीं सांगितलेली सुशील मुलगी, तिला न आवडून फार वाईट वाटलें. यामुळें सासूस न कळतां मधून मधून ती आपल्या वृद्ध सासूचे घरीं जाऊन तिच्या कामाला हातबोट लावीत असे, व आपल्याकडून होईल तितकें तिला सुख देत असे. सज्जनाची संगति कोणास नाहीं सुख देणार! अशा रीतीनें त्या सुशील नातसुनेचा त्या म्हातारीला मोठा विरंगुळा होता; परंतु तिच्या दुर्दैवानें तोही बंद होण्याचा वेळ आळा. आपली सून आपल्या

बद्द सासूकडे फार जाते येते, हें समजून ती द्वाड बायको तिला वारंवार टोंचीत असे; परंतु आपण न गेल्यास ह्मातारीचा दिवस जाणार नाहीं असें समजून ती तो सर्व जाच सोसूनही जाण्यास कमी करीत नसे. परंतु पुढें असें झालें कीं, त्या कर्कशेनें ह्मातारीकडे न जाण्याविषयीं मुलीवर अगदीं पहाराच ठेवला. तेव्हां मात्र तिचा निरुपाय होऊन कांहीं इलाज चालत नाहिंसा झाला. तेव्हां निरुपाय होऊन ती चतुर मुलगी याला काय युक्ति करावी असा विचार करीत असतां, तिला एक चमत्कारिक युक्ति सुचली. एके दिवशीं ती आपल्या सासूची नजर चुकवून त्या हतभागी ह्मातारीचे घरीं गेली. ह्मातारीनें हिला फार दिवसांत न पाहिल्यानें तिला गहिंवर आला. तें पाहून ती चतुर मुलगी ह्मणाली. " **आजीबाई मी न येण्याचें कारण सासूबाई पुढें माझा नाइलाज आहे. तथापि आपुढें सासूबाई तुमचे आज्ञेंत चालतील व तुह्माला सुख होईल अशी कांहीं तजवीज करण्याकरितां मी एक युक्ति काढली आहे. आपण जर कबूल व्हाल तर मी आपल्यास सांगेन.**" असें होण्याचा मुळींच संभव नव्हता; तथापि ही आतां आपले कल्यास अनुकूल होईल असें समजून ती ह्मणाली " **आजीबाई! आज दोनप्रहरीं जेवण झाल्यानंतर तुह्मी जेव्हां भांडीं घासण्याकरितां जाल. तेव्हां त्यांतील एक भांडें हातांत घेऊन ओंड्यावर आपटीत बसा, ह्मणजे पुढची सर्व**

तजवीज मी करून सासूबाई तुम्हाला या त्रासांतून सोडवून घरीं नेऊन तुमची नीट शुश्रूषा करील असें करितें. " हें अल्पवयी नातसुनेचें ह्मणणें फारच चमत्कारिक असून खेरीज तिला त्याचा कांहींच अर्थ कळेना, यामुळें ती वृद्ध बाई क्षणभर विचारांत पडली. ह्या वेडगळ युक्तीनें कांहीं व हित न होतां उलट जास्त फजिती आणि दुःख होईल अशी तिच्या मनाची खात्री झाली आणि वरील अविचाराचें कृत्य करण्यास मला या पोरीनें सांगतले असें जर आपण पुढें सांगूं लागलों तर लोकांस तें खरें न वाटून आपल्यासच सर्व वेडी ठरवितील आणि मग वेड्या माणसाला पाहिजे त्यानें हंसावें असा प्रकार होईल. असे चमत्कारिक विचार त्या म्हातारीचे मनांत येऊं लागले. पण यावरही तिला वाटे कीं, ही मूल फार समजूतदार व शहाणी असून तिणें ही भलतीच युक्ति सांगितली कशी? त्या अवदसेनें तर इच्या बरोबर असें भलतेंच कांहीं सांगून पाठवून माझी फजिती करण्याचा घाट घातला नसेलना? एरव्हीं अशी भलतींच गोष्ट ही शहाणी मुलगी सांगणार नाहीं. तिला असा संशय येऊन हीं आपल्यास काय युक्ति सांगते ती ऐकावी, ह्मणून तिला विचारूं लागली,

मुली, तुझे मनांत काय आहे हें मला समजत नाहीं. तथापि तुझी युक्ति फार चमत्कारिक दिसते, यामुळें तिला माझ्यानें रुकार देववत नाहीं. आतां

तूं जर पुढें तुझ्या मनांत काय आहे तें स्पष्ट सांगशील तर त्याचा एकादा विचार पाहतां येईल नाहींपेक्षां एकादें भलतेंच कृत्य करून आप जास्त फजिती करून घेण्यांत अर्थ काय? तूं माझ्य हिताकरतांच कांहीं योजना केली असशील मीही समजतें, परंतु त्याजबद्दल आपली प्रथ चांगली खात्री करून घेतली पाहिजे. आतां मल यापेक्षां जास्त दुःख येण्यास कांहींच जागा राहिलं नाहीं, तरी माझे बेटा, तूं मात्र भलती एखाा गोष्ट करून माझ्याकरितां आपल्यास जाच करू घेऊं नको. तूं माझे येथें येते जातेस येवढयावरू ती अवदसा जर तुला त्रास देते तर याहू जास्त कळकळ बाळगून तूं आपल्यास अधिक संकटांत पाडून घेऊं नको बरें ! ! मुली, माझे आतां वय झालें. ती कर्कशा मला आतां कितं दिवस त्रास देईल? मी आज आहें नि उद्या नाहीं अशी समज, याकारितां तूं बेटा आपल्या सासूचे मर्जीविरुद्ध वागूं नको. जा. आतां फार वेळ झाला. परमेश्वर सर्वदा तुझें कल्याण करो" त्य वृद्ध सासूचे तोंडचीं तीं दीन व कंटाळवाणीं भाषणें एकून त्या सुशील मुलीस फार वाईट वाटलें आपण योजिलेली युक्ति चमत्कारिकच असल्यामुळें तें सांगण्यापासून इला जास्त संकोच वाटेल असें जाणून ती ह्मणाली " आजीबाई, माझी समजूत जरी फार

केली आहे, तथापि आपल्यास जी मी सांगत आहें, त्याजबद्दल चांगला विचार केला असून आपल्यास यापेक्षां जास्त दुःखांत पडण्याची तर तर काळजीच नको, परंतु त्यापासून खचित आपल्या सुखाचाच मार्ग निघेल, अशी माझी खात्री आहे. मी आपल्यास सांगितलें तेवढें काम आपण केलें ह्मणजे पुढील सर्व तजवीज मी लावितें. पुढें काय तजवीज करावयाची तें देखील आपल्यास मी सांगितलें असतें, परंतु तें सांगण्यास संकोच वाटतो. असो, आतां फार वेळ झाल्यामुळें मी जातें."

नातसून निघून गेल्यानंतर जेव्हां तिणें सांगितलेली वेळा आली, तेव्हां तें वेडगळ कृत्य करावें किंवा न करावें, याचा विचार करतां शेवटीं त्या ह्मातारीनें निश्चय केला, कीं कांहीं झालें तरी एकदां अखेरचा उपाय करून पहावयाचा; असा निश्चय करून ती भांडीं घांसण्यास बसली व सुनेनें केलेल्या गुरुमंत्राप्रमाणें तिनें हातांत एकएक भांडें घेऊन तें धोंड्यावर आपटण्याचा आरंभ केला. तें ऐकून घरांतील मनुष्यें बाहेर आलीं, व त्या ह्मातारीचे हातांतून भांडीं घेणार इतक्यांत त्या नातसुनेनें सर्वां देखत असें सांगितलें कीं, ही आपलीं भांडीं फोडून टाकील तर उद्यां मला अडचण पडेल. कारण पुढें माझे सासूबाईस हींच भांडीं मला द्यावयास पाहिजेत. हें मार्मिक भाषण ऐकून सर्वांस च-

मत्कार वाटला, व त्या सासूस तर आपल्या कर्माचा पश्चात्ताप होऊन तिणें त्या म्हातारीला घरीं आणिलें व तिची ती सुश्रुषा करूं लागली.

भाग चवथा समाप्त.

---

## भाग ५ वा.

# मुलींची सासरी वागणूक

## स्त्रीपुरुषांचें प्रेम.

### दिंडी

राग—कानडा, ताल—दादरा.

( 'बहुत दिन नच' या चा० )

प्रीति दृढ असते पुरुषस्त्रींत साची ॥
व्यर्थस्नेहीं ती इतर त्या घरांची ॥
प्रेम दृढ तो बघ त्या हृदयांत होतो ॥
स्नेह इतरांचा बिंदु अळुवरी तो ॥ १ ॥

जगामध्यें मनुष्यें जीं परस्परांवर प्रीति करतात आपण पाहतों, त्या प्रीतीचें खरें कारण पाहूं गेलें असत आत्मसुखाशिवाय दुसरें दिसत नाहीं.

इष्टमित्रांनीं, आप्तादिकांनीं व **स्त्रीपुरुषांनीं** एक-मेकांकरितां प्राण दिल्याचें आपण पाहिलें व ऐकिलें आहे. तेव्हां एकमेकांवर प्रीति करण्याचा मनुष्याचा एक विलक्षण गुणच आहे, असें समजलें पाहिजे.

दुनियेमध्यें अति परिचयाचीं व प्रितीचीं मनुष्यें असतात, त्यां सर्वांमध्यें **पति** व **स्त्री** यांजमधील प्रीति आणि स्नेह, हीं फार बळकट व दृढ अशीं बंधन केले लीं असतात.

परस्परांवर प्रिती करतात, ती कोणाक-रितां? स्त्री जी प्रिती करिते ती **पती** करतां किंवा स्वत:करतां ? तसेंच **पतिही** आपल्या **स्त्रीवर** जी प्रीति करतो, ती आपल्या **स्त्रीकरितां** किंवा स्वतःकरितां ? आतां व्यवहारदृष्टीनें व साधारण समजुतीनें आमचें म्हणणें थोडें विपरीत दिसेल. कारण, कोणत्याही एखादे **स्त्रियेस** विचारिलें कीं, तूं आपल्या **पतीवर** एवढी प्रीति करतेस व त्याच्या जेवणाखाणाची आणि सुखाची तरतूद ठेवतेस याचें कारण का-य? तर ती या प्रश्नांवर असें उत्तर देईल कीं, “**पतीच्या सुखाकरितां मी हें सर्व करितें.**”

वरिल प्रमाणेंच एखाद्या **पुरुषांस** त्याच्या **स्त्री**-बदल प्रश्न केला असतां तोही **स्त्रियेच्या** सुखा-करितां मी झटतों, असें कबूल करील. व हीं वरील उत्तरें त्या ‘ **स्त्रीपुरुषांचें** ’ साधारण स-मजुतीस अनुसरूनच असतात हें जरी खरें

आहे. तरी वास्तविक पाहूं लागलें असतां त्या समजुतींत चूक असते. वरील उत्तरें जर खरीं मानिलीं ह्मणजे स्त्रिया आपल्या पतींवर व पतिस्त्रियांवर परस्परांचें सुखाकरितां प्रीति करितात असें मानलें, तर स्त्रीपुरुषांमध्यें जे तंटे व अप्रितीचे प्रकार होतांना आपण पाहतों, ते कधीं ही दिसले नसते.

पुरुष जर स्त्रियांचे सुखाकरितांच तिजवर प्रीति करते, तर तो प्रकार मूर्ख, कुरूप, दुराचारी वगैरे स्त्रियांचे संबधानं दृष्टीस पडला असता. परंतु तसें कधींच घडत नाहीं. " सद्गुणी, सुस्वरूप व सदाचरणी स्त्रियांवर " पुरुष जशी प्रीति करतात, तशी दुर्गुणसंपन्न स्त्रियेवर करीत नाहींत. याचें कारण येवढेंच कीं, सद्गुणी व सुंदर स्त्रियेपासून त्यांस सौख्य, विश्रांति, उत्साह व आनंद होतो; आणि दुर्गुणी स्त्रियेपासून दुःख, निरुत्साह आणि असंतोष वाढतो. तेव्हां यावरून हें सिद्ध होतें कीं, पुरुष आपल्या सुखाकरितां स्त्रियांवर प्रीति करताता हाच प्रकार स्त्रियांचे संबधानें. पति जर सद्गुणी, शाहणा, धूर्त, पराक्रमी, व विद्वान असला, तर त्याची स्त्री त्याजवर प्राणापलीकडे प्रीति करते; आणि तोच जर दुर्व्यसनी, मूर्ख, निरुद्योगी, दरिद्री आणि कज्जेदलाल असा असेल तर त्याजवर प्रीति करीत नाहीं.

आतां लौकिकार्थ, जन्मसंबधामुळें, किंवा अनन्यगतिकत्वाचे योगानें अशाप्रकारचीं स्त्रीपुरुषें एकत्र राहून एक विचारानें चालतात असें जरी आपलें दृष्टोत्पत्तीस येतें, तथापि त्यांजमध्यें खरोखर प्रीती असते असें कधींही म्हणतां येणार नाहीं. कारण खऱ्या प्रीतीचा अंकुर अंतःकरणांत उगवावयाचा असतो. बाह्यात्कारी सर्व जग एकमेकांवर जी प्रिती करतें, ती दांभिक व तूर्तातूर्त असून तिची स्थिती अळवाचे पानावर पडलेल्या पाण्यापासून उत्पन्न होणारें मौक्तिक बिंदुप्रमाणें होय. खऱ्या प्रीतीचा कालत्रयींही भंग होत नाहीं. असो. आमच्या कित्येक वाचकांस अशी शंका येईल कीं, **पतिव्रता स्त्रिया** आपले **पतीच्या** गुणाकडे बिलकुल लक्ष न देतां त्यास ईश्वर मानून त्याची सुश्रूशा वगैरे करितात, तेव्हां याचें कारण काय ? हा प्रकार स्वतःचे सुखाकरितां किंवा पतीचें सुखाकरितां ? याजवर आमचें वरीलच उत्तर होय. म्हणजे पतिव्रता स्त्रिया आपल्या **पतीवर** जी प्रीती करितात ती **पतीकरितां** नसून स्वतःचे हिताकरितां, होय. कारण, **स्त्रियांस** आपला हितकारक, कल्याणदायक जो **पतिव्रताधर्म** तो पाळावयाचा असल तर **पतीच्या** आज्ञेंत वागल्यावांचून आणि पतिची सुश्रुषा केल्यावांचून गत्यंतर नाहीं. तद्विरुद्ध आचरण केल्यानें दुर्लौकिक व नरकप्राप्ती होते.

असें जर नसतें तर मूर्ख, दुष्ट, व दुराचारी पतींवर प्रीति करणाऱ्या स्त्रिया क्वचितच दृष्टिस पडल्या.

आतां स्त्रीपुरुष, सुहृत्संबंधी व इष्टमित्र हे जरी आपल्या सुखाकरितांच यत्न करितात, तथापि तें सुख संपादन करण्याचे मार्ग कांहीं अशा तऱ्हेचे आहेत कीं, त्यांपासून सहजरीत्या दुसऱ्यांस सुखप्राप्ति होतें. वस्तुतः दुसऱ्यांस सुखी केल्यावांचून आपल्यांस सुखप्राप्ती होऊं नये अशी त्यांत कांहीं गोष्ट असते.

आतां जगांतील सर्व लोक एकमेकांवर जी प्रीति करतात, त्यांत आणि विवाहित स्त्रीपुरुषांतील प्रितींत महदंतर असतें. इतर लोकांची प्रीति जडण्यास जरी फार अवधी लागते, तथापि ती तुटण्यास कांहीं एक विलंब लागत नाहीं. आणि एकदा जर प्रीति कमी झाली, तर परिणामीं त्यांच्यामध्यें वैमनस्य वाढून तें परस्परांच्या अगदीं जन्माला पुरतें.

पति व स्त्री यांमध्येंही अशा प्रकारचे कधीं कधीं प्रसंग घडून येतात. परंतु एक तर ते फारच क्वचित् असून खेरीज त्यांचा इतर लोकांप्रमाणें बहुधा परिणाम होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, स्त्रीपुरुषांचा जडलेला संबंध, लौकिक, धर्म व व्यवहार यांचे योगानें असा दृढ बनलेला असतो कीं, प्रारंभीं जरी त्यांत प्रीतीचा भाग फारच थोडा दृष्टीस पडतो, तथापि

दिवसेंदिवस तिची वृद्धि होत जाऊन, शेवटीं कारण प्रसंगानें जरी त्या उभयतांत वैमनस्य आलें, तरी देखील इतर लोकांप्रमाणें त्यांस परस्पराचा विट मानण्यास जागा नाहींशी होते. जोंपर्यंत परस्परांपासून परस्परांचें हित होत असेल, ह्मणजे प्रत्येकास जर दुसऱ्या पासून कांहीं सुख होत असेल, तरच तो त्याजवर प्रीती करील, एरवीं करणार नाहीं. स्त्रीपुरुषां विषयींही हाच प्रकार आहे.

कित्येक अल्प समजुतीचे लोकांस असें वाटेल कीं, जगामध्यें जर खरी प्रीति कोठें दृष्टीस पडत नाहीं, तर मग एकमेकांवर व्यर्थ प्रीती करण्यांत अर्थ काय? जर कोणाची अशी समजूत होईल तर ती चुकीची आहे. कारण, मनुष्यानें स्वसुखार्थ झटणें हें जरी रास्त आहे, तरी त्यामध्येंच परमेश्वरानें अशी कांहीं योजना करून ठेविली आहे कीं, दुसऱ्याचे उपयोगीं पडल्या वांचून किंवा दुसऱ्यास सुख दिल्यावांचून कोणासही खरोखर सुख होऊं नये. याकरितां सर्वांनीं परस्परांवर प्रीति करावी हें योग्य आहे.

आतां आमच्या ह्मणण्याचा भाव इतकाच कीं, स्त्री पुरुषें आप्तसोयरें व इष्टमित्र हे ज्या मनुष्यांवर प्रीति करतात त्याच्या सुखाकरितांच त्यांचें हें कृत्य असतें अशी जी समजूत आहे ती चुकीची असून, प्रत्येक मनुष्य आपल्या सुखाकरितां हरएक यत्न करीत असतो व त्याणें तो करणेंही योग्य आहे.

प्रसिद्ध कवि '**वामन पंडित**' व त्यांची **पतिव्रता स्त्री** '**गिराबाई**' ही ऐकांतांत असतां पंडितांनीं **गीराबाईस** असा प्रश्न केला कीं, "**प्रिये! तूं जी मजवर एवढी प्रीति करतेस, याचें कारण काय?**" **पतीचा हा प्रश्न** ऐकून **गिराबाईस** मोठें आश्चर्य वाटलें, व हा प्रश्न करण्याचा हेतुही तिच्या लक्षांत आला नाहीं. तेव्हां त्या **पतिव्रतेनें** लगेच उत्तर दिलें कीं, "**महाराज! याचें कारण आपणास सुख व्हावें येवढेंच आहे. यावांचून माझा कोणताही हेतु नाहीं.**" आपल्या बोलण्याचें हें उत्तर ऐकून **पंडितांनीं** "**प्रियसुधा**" या नांवाची कविता करून तिची चांगली कान उघाडणी केली, व तिच्या अंतःकरणांतील भ्रमपट दूर करून ईश्वरभक्तिचा तेथें प्रकाश पाडला. पंडितांचा हा उपदेश फार चांगला असल्यामुळें आम्ही तो **स्त्री** वाचकांकरितां देतोः—

## पद

### राग–झिंजोटी;–ताल–त्रिवट

( "झाली ज्याची उपवर" या चा० )

**परम आवडी अपली अपणा ॥**
**वळख टाकुनी सखे मीपणा ॥ ध्रु० ॥**
**निमित्तमात्रचि पती तुला प्रिय ॥**
**सहसा प्रिय तो ह्मणतां येना ॥ १ ॥**
**आत्मसुखाचे पुरुष वा स्त्रिया ॥**

सकळाहुनि प्रिय तुज ह्मणवेना ॥ २ ॥
सदनें विविधें धनें सुवदना ॥
देहसुखार्थी असती जाणा ॥ ३ ॥
काळबळें ती आवडि तुटते ॥
परि न निर्जि विटे तो निजतांना ॥ ४ ॥
प्रिय अप्रिय तुज होति घडोघडिं ॥
परि निज-नावडी कदा येइना ॥ ५ ॥
वळखीनें प्रिय दुजें मानिती ॥
नवल कळेना प्रिय तेंचि जना ॥ ६ ॥
निजसामर्थ्यें सौख्य सांपडे ॥
बहुत प्रिय तें मात्र प्रियना ॥ ७ ॥
सौख्यसुधाकर राहु अहंकृती ॥
ह्मणुनि मानिती तेचि प्रियना ॥ ८ ॥

पांचवा भाग समाप्त.

# भाग ६ वा.

# मुलीची सासरीं वागणूक.

## कन्याविक्रय व त्याचा परिणाम.

राग–जोगी, ताळ–धुमाळी
(" शुक चंचूंतुनी " या चा.)

संपत्तीचा आशा धरुनी ॥
खोटीं निंद्यशीं कामें करुनी ॥
मनिं परहीता ना आणूनी ॥
स्वार्थ मूढ बघती ॥ १ ॥

### दिंडी

राग–लीलांबरी, ताल–दादरा.

विपत्तीती जरि सकल देश गेळा ॥
जरी कालें संसारघात झाला ॥
लोभि नच भीतो जगीं एक नाथा ॥
जाणुनी ही सकलज्ञ विश्वत्राता ॥ १ ॥

### पद

(" बळसागर तुह्मी " या चा)

आत्महीत त्या करुनी घ्याया नसते अघभीती ॥
निजधर्मानें चालेना तो कधिं ही मंदमती ॥ध्रु॥

शरम नाणुनी ध्यानीं कांहीं पशुसम ते होती ॥
आत्महितास्तव परघातातें कधिं नच ते विटती॥१॥

## पद

राग–आनंद भैरवी; ताल–दादरा.

("काय मला भूल पडली" या चा.)

परहित ना कधिं स्वप्नीं त्यांसि वाटतें ॥
निजहित पर यत्नीं ना त्याज्य राहतें ॥ध्रु०॥
कन्यकेसि अर्पितसे बघुनि धनातें ॥
स्वहितास्तव विकुनी तया काय लाभतें ॥ १ ॥

## पद

राग–शंकराभरण; ताल–धुमाळी.

(" नाहिं सुभद्रा या वार्तेतें" या चा. )

कधिं न मूढ तो आणी चित्तीं कन्या अनहीता ॥
पंकीं घाली गाई जैशी अपुली ती दुहिता ॥ध्रु॥
जनितासा तिज शोभे करितां पाणिग्रहणातें ॥
बहु हरुषे तो कन्येचें त्या धन तें मिळवीतां ॥१॥

## साकी

( राग–जोगी; ताल–धुमाळी)

कन्याजन्मीं हर्ष तयाचा चित्तामधिं नामावे ॥

बालक्रीडीं तृप्ति न पावुनि हास्ति उचलण्या धांवे॥ कडेवर घेई ॥ हर्ष न तो गगनीं माइ ॥ धु ॥

## कामदा

राग अल्हैया बिलावल; ताल–धुमाळी

( ' खेळ चांगला'' या चा० )

चुंबुनी मुखा प्रेम पाझरें ॥
त्यासि आवडे चुरुनि त्या करें ॥
चित्तिं मानितो असुहुनी जिला ॥
दुःख मानिना दुखवितां तिला ॥ १ ॥

## पद

राग–कल्याण; ताल–धुमाळी.

( " नंदगृहाच्या जवळ मुलींनीं" या चा.)

दया क्षमा तो विचार आणी प्रीति ना कांहीं ॥ अहारे ॥ चित्तिं जयाच्या गुणलेशहि तो तिळ मात्राचे नाहीं ॥ अहारे ॥ पंकीं जैशी रुतते गाई दुहिता ती पाही ॥ अहारे ॥ द्रव्याकारितां बुडवी तिज तो विपत्तिचे डोहीं ॥ अहारे ॥

## पद

राग–आनंद भैरवी ( कर्नाटकी ), ताल–दीपचंदी

( "काय परम रमणिय सखिचें" या चा० )

कोण्या विप्रा कन्या झाली हर्ष जन बघती ॥ धु० ॥

ब्रम्ह्यानें कीं चतुरपणानें वाटे घडवीली ॥
काय कथूं तुज सौंदर्याची पुतळी ती बनली ॥१॥

## पद

राग-झिंजोटी; ताल-त्रिवट.

( " मजवरती खाचित " या चा० )

जनित्यासी सुभग कन्या लाडकि ती जाहली ॥
सुगुणानें या जगीं कीं परिपूर्णा पावली ॥
रूपानें रती जैसी सुजनातें भासली ॥
मानेनें प्रीति सारी तिजवरती ठेविली ॥

## पद

राग-भुपाळी; ताल-दादरा.

( " प्रिये पहा रात्रीचा " या चा० )

किती वदूं बाळेचे सद्गुण त्या हर्षित मन होतें॥ध्रु॥
तज्जनिता माता ती ॥
श्रम घेउनि शिकवीती ॥
किति विद्या निज देती ॥
वर्णाया मति खटने ॥ १ ॥
वययोग जाण तिला ॥
यौवन भर तो भरला ॥
कुसुमानें तरु लवला ॥
कथितां सुख गमतें ॥ २ ॥

## पद

राग–कालंगडा; ताल–धुमाळी

( " सुवर्ण केतकी परि जो " या चा० )

सकल सुगुण संपन्नचि दिसली
त्या काळीं ती कौमारी ॥
तारुण्यानें द्विगुणित शोभा
जाण सुवदना तीच वरी ॥ ध्रु. ॥
चंचलता ती नयनाची कीं
लज्जित मृगबाळांसि करी ॥
बघुनी कटिला रानीं पळती
खजिल होउनी जाण हरी ॥

## पद

राग–लीलांबरी; ताल–धुमाळी

( " ब्राह्मण कन्या नव्हे " या चा० )

विप्राची ती कन्या काळें उपवर कीं जाहली ॥
चिंता जनित्यासी पावली ॥ ध्रु० ॥
धन आशा ती तज्जनित्यानें मनिं भारी ठेविली ॥
परि ना सफलद ती जाहली ॥ १ ॥
दुष्ट अशी ती इच्छा त्याची सर्व जनीं समजली ॥
परि ना कोणातें रुचली ॥ २ ॥

## पद

राग पूर्वी; ताल–धुमाळी

( " हे नरा " या चा० )

त्या जना, एरवीं कळुनिया, येति पहावया,
रम्य तिच बाळा ॥
पाहुनि हर्षती सुखवितसे जी डोळा ॥ ध्रु ॥
कुणि ह्मणें, आज साजणें, किमपिना उणें,
दावुं भूपाला ॥
वा घालुं इला मी आज काय ही माला ॥ १ ॥

## पद

राग–पिलू; ताल–दीपचंदी
( " व्यर्थ मी जन्मलें " या चा० )

हर हर नकळे ही कोण वरी ॥
बानिली सुकवींनें आजिवरी ॥ ध्रु० ॥
धन्य कळेना कोणा करितां ॥
वर माळ घे ही करी ॥ १ ॥
शैळधरा जेविं जाण मही ही ॥
नृपतीस वरिते खरी ॥ २ ॥

## पद

राग–झिंजोटी; ताल–धुमाळी
( 'दिसली पुनरपी गुप्त जाहली' या चा० )

सुकृतांबुधि कोणाचा तो न कळे आजी येइ भरा ॥
पूर्णोदय कन्या वदनेंदू बघुनीया तो करूनी त्वरा
॥ ध्रु० ॥
शैळजासी भूतेशाही पात्रे धन्यता करुनि वरा ॥
तैशी होवो खचित सुखी ही वरुनीया सद्गुणिच

## पद

राग-जिल्हा; ताल-धुमाळी

( ' असतांना यति सन्निध ' या चा० )

जेवीं धांवति मधुकर ते क्षुधितें मधु पाहुनि ॥
तेवीं येती जन त्या जागिं वरण्या तिजला गुनी
॥ ध्रु० ॥

अदय मदन पीडितही येती वृद्ध तरूणही फार ते ॥
नगरींतही गे सतत राहती मदनव्यथित त्या थोर ॥
अतिती आस ठेवुनी ॥ १ ॥

## पद

राग-पिलू; ताल-धुमाळी.

( ' मी कुमार तीही कुमरी ' या चा० )

ह्मणुनीया परिणायातें ॥ इच्छितसे तोआपणातें
॥ ध्रु० ॥

त्या नगरीं धनद परी कीं बहु रोगी वृद्धहि होता ॥
इच्छितसे परिणायातें वयशक्तिहीनही असतां ॥
त्रय वेळीं तरूणा कन्या परिणुनि त्या मरुनी जातां ॥
॥ चाल ॥ होता तो वृद्धहि फार ॥
कंपाहि त्या वारंवार ॥
झाला जो भूमीभार ॥
परि मदनें त्या पीडीलें ॥ १ ॥ ह्मणु०॥

## पद

### राग-झिंजोटी, ताल-त्रिवट

( ' झाली ज़्याची उपवर ' या चा० )

धन घेउनिया मग त्या तातें ॥
दिधलें वृद्धा त्या कन्येतें ॥ ध्रु० ॥
पावे अति तो खल हर्षातें ॥
इच्छी होवो दुहिता मातें ॥ १ ॥
एकी परि तो दुजि द्यायातें ॥
वीट न आणी कधिं चित्तातें ॥ २ ॥
कन्या ती बहु दुःखि होउनी ॥
इच्छितसे आशू मरणातें ॥ ३ ॥

## पद

### राग-झिंजोटी; ताल-दादरा.

( ' नाहिं झाले षण्मास ' या चा० )

नाहिं झाले जों चार मास लग्न होउनी ॥
प्रतिकुल त्या दैव पाडि रोग लागुनी ॥ ध्रु० ॥
कोणि न त्या साह्य काय करील कामिनी ॥
सतत राहि त्या जवळी व्यर्थ बैसुनी ॥
तातासी तेवीं त्या वदत शापुनी ॥
दुःख डोहिं ती बुडुनी ॥ १ ॥

## पद

### राग-अलैया बिलावल; ताल-धुमाळी.

( " अरसिक किती " या चा.)

दुष्ट किती गे मेला ॥
मज दुखवीयलें देऊनि याला ॥ ध्रु० ॥
द्रव्यासी तो भुलला ॥
कन्याविक्रय करण्या सज्जचि झाला ॥
वाटे न लज्जा त्याला ॥
मज दिधलें ऐशा या व्यथिताला ॥
मंतु असा काय घडला ॥
एवीं छळिती आपुली ते कन्येला ॥
देवा तूं रक्षी मजला ॥
ममसौभाग्याचा मार्ग हि खुटला ॥ १ ॥

## पद

राग—पिलू; ताल—धुमाळी.

("मज बहुतच ही" या चा.)

बाई शेवटचा काळ त्यासि हो आला ॥
असु देहा सोडूनि गेला ॥ ध्रु० ॥
सौभाग्याचा हो शेवट ऐसा झाला ॥
दुःखाचा नग कोसळला ॥
॥ चाल ॥ व्हावें कसें आतां तीचें ॥
दुष्ट कृत्य त्या तानाचें ॥
॥ चाल ॥ ऐसे द्रव्यार्थी भुलुनी या लोभाला
दुखवीती ते कन्येला ॥

# पद

राग-जोगी; ताल-धुमाळी.

( " जाते कीं मम शकुंतला" या चा.)

कन्येचा हो आईबाप ते विक्रय कीं करिती ॥
द्रव्या करितां भुलुनी तीतें व्यधितासी देती ॥धु०॥
रोगग्रस्थ हा समजूनि उमजूनी ऐसें आचरती ॥
कन्येच्या त्या सौभाग्यातें अग्नी लावीती ॥ १ ॥
कर जोडुनिया विनवीं तुह्मां ऐका मम विनती ॥
दुष्ट असे मत्तातासरिसे बहु थोडे असती ॥२॥
सुजनानों हो देऊं नका कीं ऐशा कन्या ती ॥
नातरी तुह्मां समजा येतिल दुःखें याच रिती ॥३॥

साहवा भाग समाप्त.

---

# मुलीची सासरीं वागणूक.

## भाग ७ वा.

### लहान मुलीची स्थिती.

### व सुनेचा प्रकार.

#### पद

राग-पिलू; ताल-धुमाळी

( " बायांनो द्या सोडोनि " या चा०,)

ज्या योगें गुण सासूचे ॥
किती कन्येनें वर्णावें ॥ ध्रु० ॥
बाळपणीं लग्न करीती ॥
दुःखद कीं तेंची जाणा ॥
परि बुद्धि जूनही होतां ॥
घालवे न शुद्ध वळणा ॥
कोमल ती मालति केवीं ॥
चिकटुनि या राहि तरूंना ॥ चाल ॥
तेवीं सासुश्वशुरांनीं ॥
परकन्या गृहिं आणूनी ॥
ममतेनें तिशीं बोलूनी ॥
सदयें हो तिज पाळावें ॥ १ ॥

आमच्यांत वडिलोपार्जित अशी एक समजूत पडून गेली आहे, कीं एखाद्यास मुलगी होणें हें एक महत्संकटच आहे, आमच्या सध्याच्या लोकस्थितीच्या मानानें ही समजूत अगदीं अक्षरशः अनुभवास येते.

कन्या जन्मास आल्या पासून ती परक्याची ठेव जीवापाड जतन करून नशीबानें ती ज्याची ठरविली असेल, त्यास सुरक्षितपणें पोंचती होईपर्यंत बिचाऱ्या आईबापास फार काळजी. वहावी लागते! त्यांतून आमचे लोक या लग्नाचे कामांत इतके अविचारी नसते तर त्यांस या गोष्टीची खरी किंमत कळली असती. पण तसें मुळींच नसल्यामुळें बिचाऱ्या आईबापाचा जो बोजवारा उडतो, व त्यांना जीं महत्संकटें भोगावीं लागतात त्यास पारावार नाहीं! **कन्या ही** एक परकीय धन आहे, हा अनुभव कोणाला आलेला नाहीं, व येत नाहीं असें नाहीं.

सध्यांच्या आमच्या लग्नाच्या ज्या रीति आहेत, त्याप्रमाणें पाहिलें असतां नूतन वधू ही सासऱ्याच्या घरीं कन्येप्रमाणें वागविण्यास योग्य असते. मी सून आहे एवढा भाव अंशतः तिच्या मनांत असला, तरी ती केवळ पोर असल्यामुळें निदान मुग्धावस्था किंव प्रौढावस्था होईपर्यंत तिच्या अंगाचा अल्लडपणा किंवा लडिवाळपणा जाण्याचा संभव नसतो. सासू किंवा नणंद यांनीं हा स्वाभाविक शिशुभाव तिच्या मनांतून जावा ह्मणून आपलेपरी कितीही यत्न केला तरी

त्याचा परिणाम त्या सुंदर मुखावर अश्रूचे ओघळ येणें एवढा मात्र होतो. बिचाऱ्या मुलीस सासूचा कसा मान ठेवावा, नणंदेचा शब्द कसा झेलावा, अथवा दीराचे शब्दबाण कसे सोसावे इत्यादि गोष्टी दूरदृष्टि आईनें कितीही पढविलेल्या असल्या, तरी मी लेकीची सून झालें, असं वारंवार तिच्या मनांत येऊं लागून त्याचा अश्रुपाताशिवाय दुसरा नैसर्गिक परिणाम कोणता होणार ? आईबापांनीं जी अल्पवयस्का कन्या परकीय गृहीं अर्पण केली, ती प्रौढ होऊन विवाहोद्देश जें धर्माचरण त्यासाठीं भर्ता तिचा यथाविधि स्वीकार करीपर्यंत ती 'वधू' नसून 'कन्या' च असते. फक्त तिचा बाप व आई हीं बदलून तिकडे ती जी औरस होती ती दत्तक झाली इतकेंच ! आमचे मध्यें अल्पवयांत लग्नें करण्याची चाल असल्यामुळें आपल्या मुलांचे आईबाप आपल्यावर मोठीच जोखीम घेत असतात. दुसऱ्याची मुलगी घरीं आणून कोंवळ्या वयांत तिचें संगोपन करण्याचें तें मनावर घेतात.

आमच्या लोकांत अल्प वयांत लग्नें करण्याची जी चाल आहे तिला चांगलें वळण मिळाल्यास तीच हितकारक होणार नाहीं, असें नाहीं. प्रौढवधू घरीं आणून मग तिला आपल्या कुळांतली व घरची रीतभात लावण्यापेक्षां एखादी कोंवळी वल्ली आणून तिला आपल्या गृहस्थितीप्रमाणें वळण लाविणें व ती भर्तृरूप वृक्षास साहजीक रीतीनें लपेटून जाणें हें किती हित-

कारक होणार आहे! पण तसें होण्यास वधूच्या ठि-काणीं कन्यात्व मानिलें पाहिजे.

आमच्या विवाहित कन्यांच्या, सासवा व सासरे हीं जर त्यांस चांगलें वागवितील तर आमच्या सुनांच्या हाल अपेष्टांस, किंवा माझ्या कन्येचें काय होईल, या आईबापांच्या काळजीस कोठें जागा राहणार नाहीं.

दुसऱ्याची मुलगी जी आपण घरांत आणिली आहे, ती आपण होऊन आपल्या मुलाची ठेव आपल्या जवळ ठेविली आहे; तिला कीड लागून तिचा अंश कमी होऊं नये. अथवा ती ठेव नुस्ती निर्जिव नसून सजीव बोलती चालती असल्यामुळें तिचे ममतेनें पालन पोषण व्हावें; व एखाद्या द्रव्यरूप ठेवीची एकादा इमानी सावकार जशी मालकास परत करते वेळीं दिढी किंवा दुपटी करून देतो, तशी ही ठेव मुलाच्या स्वाधीन करितांनां ती, गुणांनीं, विद्येनें, शरीरप्रकृतीनें, सौंदर्यानें व उपयुक्तपणानें सर्वथा वृद्धि पावली आहे, अशी त्याच्या स्वाधीन करावी. इतक्या गोष्टींची जर सास सासरे धर्म स्मरून काळजी घेतील तर मुलगे त्यांचे केवढे उतराई होतील?

यासाठीं एकंदरींत आमच्या मुलींच्या सासरच्या आईबापाचें प्रथमचें कर्तव्य वधूला मुलगी समजणें हें होय. तसें समजल्यावर मग तिचें लेकीप्रमाणें संगोपन करणें, सवडी प्रमाणें विद्यादि देऊन ती आपल्या भर्त्याची योग्य सहचरी होईल अशी व्यवस्था ठेवणें; तिच्यामध्यें

गुणागुण काय आहेत, हें पाहून गुणांकुरांस मुळींच ममतेच्या उदकानें सिंचन करून, दुर्गुणांस अनेक प्रकारें मनांतून मोठ्या नाजूक रीतीनें काढून टाकणें, व एकंदरींत साऱ्या आईबापांप्रमाणें किंबहुना जास्त प्रमाणानें आपणावर हीं नवीं जोडलेलीं आईबापें ममता करितात असें मुलीला वाटूं देणें, या सारखीं आमच्या मुलींच्या सासूसासऱ्यांचीं दुसरीं कोणतीं कर्तव्यें आहेत!

हे सर्व विचार आमच्या लोकाचे मनांत मुळींच नसतात. मामंजींस बाहेरच्या कामामुळें घरीं स्नुषेचें संगोपन कसं चाललें आहे हें पाहण्यास ह्यांस फुरसत नसते, सासूकडे लक्ष दिलें, तर परक्याच्या पोरीस गांजणाऱ्या सास्वांची संख्या जरी प्रमाणानें कमी, तरी अंशात तरी सासुरवास करणाऱ्या पुष्कळ असतात. मुलीमध्यें एखादा दुर्गुण असल्यास तो काढून टाकण्याचा यत्न एकीकडसच राहतो, पण ती वाईट खोड जितकी सुप्रसिद्ध करवेल, व त्यामुळें आपल्या सुनेची जितकी टिमकी वाजेल तितकी, वाजविण्याकडे पुष्कळ सास्वांचे नेहमीं लक्ष असतें! बरें एकादा अलौकिक गुण मुलीमध्यें असला, तर त्याच्या अंकुरास पाणी घालून तो विस्तृत करण्याचा यत्न तरी होत असेल, छे— तोही थोडके वेळांच! जर का असा सद्‌गुण आपले! स्वतःचे मुलीमध्यें नसेल, तर मग सुनेचा मत्सर व हेवा सुरू होतो. मग त्या बिचाऱ्या मुलीस तशा

प्रकारें जाच करणारा तो सद्गुणही झाकून ठेवण्याची पाळी येते.

आमच्या मुलीच्या तांसवांस सून ही आपली कन्या न वाटतां परकी मुलगी वाटते. आपल्या घरीं आलेल्या सुनांवर स्वतांची मुलगी समजून लोभ करावा. मुलगी प्रौढ झाल्यावर जर लग्न केलें असतें, तर तें भर्त्याकडे पाहून केलें असतें. पण लहान कोंवळ्या पोरीचें लग्न करून तुमच्या हातीं त्यांचें सारें आधिपत्य येतें तर तुह्मीं तो पोटच्या गोळा समजणें अगदीं जरूरीचें आहे. यासाठीं प्रत्येक सासू सासऱ्यानें सुनेच्या संबंधानें फार काळजीनें वागावें. जोंपर्यंत भर्ते स्वतः बाल्यावस्थेत आहेत, तोंपर्यंत त्यांच्या मनांत ही आपली सहचरी, व हिची माझी जन्माची गांठ हें कोठून येणार ? पण मुलास थोडें समजूं लागल्यावर त्याचें लक्ष इकडे जाऊं लागतें. हा प्रसंग मोठा नाजूक असतो. जर का आईबापें ममताळू व मुलाचें खरें हित पाहणारीं असलीं, तर मग आपल्या मुलास व बंधूस कळूं लागल्यावर उभयतां मधील प्रीति जेणें करून वृद्धिंगत होईल, असे उपाय करण्याचें आपलें कर्तव्य तीं बजावितात. पण हा विचार जर नसेल, तर सासू, नणंदा, दीर, व इतर माणसें मध्यें बिब्बा घालून उभयतांच्या सुखांत माती कालविण्यास कधींही कमी करीत नाहींत ! तेव्हां प्रौढ दशेप्रत येणाऱ्या आमच्या मुलांनीं याविषयीं जपलें पाहिजे. विधीनें आपली

व या परकी कुळांतल्या कन्येची जन्माची ईश्वरानें गांठ तर घातली आहे, मग ती आमरण पक्की बसून 'ब्रह्मगांठ' या शब्दाची सार्थकता कशी होईल यांच्याकडे नेहमी त्यानें नजर ठेवावी. अशा रीतीनें आमच्या मुली, सासू, सासरे व भर्ते जर नेहमीं आपल्या कर्तव्याविषयीं जागृत राहतील, तर मग आमच्या गृहसुखाचा हेवा कोण करणार नाहीं !

## भाग ७ वा समाप्त.

## समाप्त.

---

## ईशविद्वज्जनप्रार्थना.

### पद

राग-झिंजोटी, ताल-त्रिवट.

( " मजवरती खचित आहे" या० चा० )

झडकरि तूं धांव देवा करि मजला साह्य तें ॥
श्वशुराचे गेहवासीं बहु येती विषय ते ॥
त्यांतिल कीं, दोष त्यागा गुण घ्यावे गोड ते ॥
ज्यायोगें बहुत ग्रंथ मज रचण्या स्फुरण तें ॥

---

॥ श्री ॥

# मन्मथजाल

किंवा

## मोहनिरसन.

लेखक,

बिहारी.

प्रकाशक,

दत्तात्रय गोविंद सडेकर.

" धनंजय " छापखान्याचे मालक.

किंमत १२ आणे.

# प्रस्तावना



एखादा होतकरू चितारी ज्याप्रमाणें नामांकित चितान्यांचीं मनोहर चित्रें पाहून व त्यांची कीर्ति ऐकून आपणही एखादें चित्र करण्याविषयीं उत्सुक होतो, त्याप्रमाणेंच उत्तमोत्तम लेखकांचे सुगम विचार, ग्रंथ, कादंबऱ्या व भाषांतरें पाहून माझ्याही मनांत तशी एखादी कृति करावी असा विचार आला व तदनुरूप 'इन क्युपिड्स नेट' या आंग्ल भाषेंतील कथानकाचें ( शब्दशः नव्हे पण बऱ्याच अंशीं ) भाषांतर करून तें आज वाचकांपुढें ठेवलें आहे. मूळ कथानक फार मनोहर आहे, पण तें रस माधुर्य माझ्या या कृतींत कितपत उतरलें आहे, हें पहाण्याचें काम मी सर्वस्वी वाचकांवर सोंपवितों. बहुतेक ठिकाणीं मुळांत असलेल्या चाली रीतींकडे दुर्लक्ष करून, त्या आपल्या इकडच्या घालण्याविषयीं प्रयत्न केला आहे, पण तेवढ्यानें हें पुस्तक चालीरीतींविषयीं निर्दोष झालें असेल असें माझ्यानें म्हणवत नाहीं.

भाषांतर करून तें पुस्तक रुपानें वाचकांपुढें मांडण्याचा माझा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें चालीरीतींसंबंधींचसें काय पण इतर पुष्कळ बाबतींत हें पुस्तक जसें वठावें तसें वठलें नाहीं असें माझें मलाच वाटतें; परंतु केलेली कृति दडपून ठेवण्यापेक्षां उजेडांत आणावी, एवढ्याच हेतूनें मी ही कृति आज वाचकांपुढें मांडली आहे. हिचा हंस–क्षीर–न्यायानें माझे प्रीय वाचक स्वीकार करतील अशी मला बळकट आशा आहे.

चित्रांतील व्यंगें काढण्याचें काम पुष्कळ लोक करतात पण तीं व्यंगें कशीं सुधरावीं तें सुचविणारे मात्र फारच थोडे सांपडतात. आणि त्याच प्रमाणें या पुस्तकांत अमुककडे अक्षरच उठलें नाहीं, अमुक कडचा अनुस्वारच उडाला आहे, अमुककडे ओळच वांकडी आहे हे व असे प्रकार क्षुल्लक दोष काढणारे टिका-कार पुष्कळ असून वास्तविक दोष कोणते व ते कसे सुधा-

रावे हें सुचविणारे, खऱ्या कळकळीचे लोक विरळा, असें मला मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. माझी ही समजूत खोटी ठरून यदाकदाचित् सुज्ञ लोकांनीं मला जर योग्य त्या सूचना केल्या तर त्यांचे अनंताभार मानून, या पुस्तकाची द्वितियावृत्ति निघाल्यास तींत त्या सुचनांचा अवश्य विचार करीन.

रांगणारें मूल एकेक पाऊल पुढें पुढें टाकूं लागतें, तेव्हांच त्याला हातांत धरून फिरविणारा एखादा कळकळयाचा मनुष्य हवा लागतो आणि तसा मनुष्य असला तरच मूल नीट चालायला शिकतें. यावरून माझ्या या प्रथम प्रयत्नास प्रोत्साहन देण्याचें काम कोणावर आहे त्याचा विचार वाचकांनींच करावा अशी माझी विनंति आहे.

माझ्या या कृतीनें रसिक वाचकांचें अल्पमात्र कां होईना पण मनोरंजन झाल्याचें ऐकून, मला मोठें समाधान वाटेल हें मीं सांगावें असें नाहीं.

रा० रामभाऊ कुलकर्णी. मधुमक्षिकाकार यांनीं मला हें मूळ कथानक दिल्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहे दुसरे माझे परममित्र रा० द० कृ० आंबेवाडकर यांनींहि मला हें पुस्तक लिहितेवेळीं बरीच मदत केली ह्मणून त्यांचे आभार मानल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

शेवटीं माझी ही अल्प व प्राथमिक कृति प्रेमपूर्वक प्रसिद्ध केल्याबद्दल रा० लोकमित्रकर्ते यांचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करतों.

खानापूर. } आपला परम नम्र
ता० १८।९।१९००. } बिहारी.



# मन्मथजाल

किंवा

## मोह-निरसन.

## प्रकर्ण १ लें

### पूर्व स्मरण.

दसरा असो अगर दिवाळी असो, मला आपले सर्व दिवस सारखेच वाटत असत. मला वाटे कीं, माझ्यासारखी दुःखी व दुर्दैवी मुलगी या अधम दुनियेंत शोधल्यास काय ती मीच होतें. काळ्याभोर आकाशाच्या गोलार्धांत जे सतेज तारे चमकतात, ते पूर्वींही माझ्या दृष्टीस पडले होते, पण तेव्हां मी या प्रदेशांत नव्हतें. तो प्रदेश याहून अगदीं निराळा होता. त्या ठिकाणीं चोहोंकडे गुलाबाचीं फुलें सर्व ऋतूंत सारखीं प्रफुल्लित होत असलेलीं मी पाहिलीं होतीं, तेथें एक अवाढव्य तलाव होता. त्याच्या त्या भव्य स्वरूपावरून त्याला रत्नकांत हें नांव दिलें होतें. त्याचें पाणी रुप्यासारखें पांढरें शुभ्र होतें. वारा कितीही सोसाट्यानें सुटो, त्याच्या योगानें रत्नकांताचें पाणी क्वचितच खालींवर होत असे. मी ज्या [illegible] त्याच्या

सभोंवार तट होता. त्या तटाच्या फटींतून मला हा सर्व देखावा दिसत असे. तें ठिकाण पहातांच मला वाटे कीं, परमेश्वराची एकमनानें आराधना करण्याकरितांच जणुं हें एकांतस्थळ निर्माण केलें असावें.

पुढें मग हाच देखावा जुन्या पण भव्य अशा तुवरगडच्या तटावरून दिसूं लागला. आकाशांतील नक्षत्रें पहाण्याची मला अति हौस. माझ्या बाळपणींच्या दुःखमय कालांत ह्मणजे प्रेमरवीच्या किरणांनीं माझें मन-कमल प्रफुल्लित होण्यापूर्वीं मला हे तारे जिवलग सहचराप्रमाणें भासत होते.

माझ्या लहानपणीं एकानें मला ध्रुव बाळाची फारच गोड कथा सांगितली. त्यानें अढळ पदावर आरुढ झालेलें, त्याचें चकचकीत नक्षत्रही मला दाखविलें. अहाहा! काय त्या बाळाचा निग्रह आणि भक्ति! राजाला, राणीला व नागरिकांना त्या बाळानें किति बरें आश्चर्यचकित करून टाकलें! व शेवटीं अरण्यांतील एका गर्द भागांत दृष्टीआड होईतोंपर्यंत त्या सर्वांनीं त्याच्या करितां कितीतरि मैदानांचीं मैदानें उल्लंघन केलीं! तें ध्रुव नक्षत्र बघण्याची मला मोठी हौस वाटे. पांढरें शुभ्र चांदणें पडलें ह्मणजे या नक्षत्राकडे पहात मी खुशाल पटांगणांत रात्रीचीरात्र बसत असे. बाळपणचे ते दिवस, माझे विचार पोक्त असे कोठून असणार? त्या ताऱ्याजवळ एकेरात्रीं जाण्याचा मी निश्चय केला व निघालें ही. मला वाटलें कीं, आपल्याप्रमाणें मलाही हा अखंड सुखांत ठेवील. तो तारा मला कसा लाभणार! माझा देवतारा चमकायाला अद्याप पुष्कळ

अवकाश होता. सरतेशेवटीं त्याचा उदय झाला व त्यानें मला माझ्या सुखाच्या ठिकाणीं नेलेंही. तें सुखाचें ठिकाण कोणतें तें माझ्या पुढील गोष्टीवरून कळेल.

रानावनांतून झालेल्या माझ्या प्रवासाचें, तद्वत फार दुरून ऐकूं आलेल्या वन्य-पशूंच्या कर्कश शब्दांचें मला स्वप्नांतील एखाद्या गोष्टीप्रमाणें स्मरण होत आहे. मला पोटाशीं धरून एक मनुष्य डोळ्यांतील अश्रुबिंदु माझ्या-वर ढाळी, त्याची देखील मला साधारण आठवण आहे, कदाचित् नाहींच म्हटल्यास चालेल. मी या तुवरगडा-वर आलें तेव्हांपासूनचीं मात्र मला चांगली आठवण आहे. या वाड्याच्या दुसऱ्या मजल्यावरील खिडकींत जी उभी राहून सभोंवतालचा देखावा पहात असे; ती अंधार गुडुप पडल्यावर मी माझ्या खोलींत परत येई; या गोष्टी मला अद्याप पूर्ण आठवतात. एवढा मोठा तुवरगडचा वाडा परंतु माझ्या मनाला आनंद देणारी अशी एकही वस्तु त्या ठिकाणीं नव्हती. जें पहावें तें आपलें मला कंटाळवाणें व नावडतें असेंच वाटे.

वाड्यापासून जवळच **अंबाजीचें** जागृत देवस्थान होतें. त्या ठिकाणीं नवरात्रापासून सतत दोन महि-नेपर्यंत महोत्सव होत असे. देवीची पंचारती नित्य मोठ्या थाटानें व्हावयाची, दारावर प्रति दिवशीं चौघडा हा झडायचाच. दसरा संपला दिपवाळी आली तरी नित्य नियमानुरूप चौघडा झडत होताच. घंटारवांतून ‘ दिपवाळीचा सण आला. दिपवाळीचा सण आला ’ अशीं अक्षरें बाहेर पडत असल्याचें ऐकूं येई. तीं ऐकतांच मला आश्चर्य वाटलें. त्या वाड्याची व्यव-

स्थापकीण हिरा नामक एक बाई होती. तीच काय ती माझ्या जिवाभावाची मैत्रीण ? मी तिला ह्मटलें.

' देवळांतील या घंटा खरोखरी काय बरें ह्मणतात. '

माझ्या या प्रश्नाचें तिला हंसें येऊन ती ह्मणाली

' कमले ! हा चौघडा व या घंटा बोलत नसतात. '

' तर मग त्या मुक्या आहेत असें तरी तुमचें मत नाहींना ' मी ह्मटलें. ' हिराबाई ऐका. '

नंतर मी त्या घंटारवांतून ' दिपवाळीचा सण आला. दिपवाळीचा सण आला ' असें सुंदर गाणें ह्मटलें. हिराबाईस माझा मोठा राग आला. ती ह्मणाली ' कमले ! तूं मोठी थट्टेखोर आहेस. थट्टा कुणाची करावी नी कुणाची करूं नये याचा तुला विचारच नाहीं. मी ह्मटलें,

' थट्टा ह्मणजे काय तें मला मुळींच माहीत नाहीं ' आवसेच्या रात्रीं काळोख भिन्न पडतो व पुर्णिमेस चंद्र आपल्या सोळा कळांनीं प्रकाशतो. असें ह्मटलें तर ती देखील मी थट्टाच केली काय ? देवाळयाच्या शिखरावर वाजणाऱ्या घंटांच्या मंजूळ व गंभीर स्वरांत मी खरोखरीचें गाणें गायिलें तर ती देखील तुह्मांला थट्टाच वाटली काय ?'

हिराबाईस माझा फारच राग आला. तिनें मला निक्षून सांगितलें.

कमले ! बाहेर रात्र झाली. तुझें भाषण पुरे कर, व खोलींत जाऊन नीज जा कशी.

' मला निजायला ह्मणून आपल्या पासून दूर करूं नका. माझ्या खोलींत काळोख. भिन्न पडला असून

थंडी ही अगदीं कडक पडली आहे. या उबाऱ्याच्या व उजेडाच्या जागींच मला राहूं द्या. उत्तरेकडे चकाकणारें ध्रुव नक्षत्र पहात बसण्याची मला मोठी हौस वाटते'

माझी ही कळकळीची विनवणी ऐकून तिला वाईट वाटलें 'परमेश्वर या मुलीचें कल्याण करो व इचें चोज पुरवो' असें ती आपल्याशीं गुणगुणली. या वेळीं तिच्या मनांत मुळींच राग नव्हता.

मी ह्मटलें.

'अहाहा! आजचा हा दिवाळीचा पहिला दिवस, आजच्या या आनंदाच्या रात्रीं कितितरि आया आपल्या मुलांचे कौतुकानें मुके घेतील! माझेंही कोणी निर्मळ प्रेमानें चुंबन घेईल काय? जुने पुराणे मित्र कितितरि कडकडून आज एकमेकांस भेटतील! माझा या जगांत एखादा तरी मित्र असेल काय? एखाद्या अपराध्यास किति उत्साहानें आज क्षमा मिळेल! माझ्या अपराधाची क्षमा कोण करणार! आज कितितरि आया आपल्या मुलांस सुगंधी तेलें, उटणीं व चूर्णें लावून न्हाऊं घालतील! मला तितक्या प्रेमानें कोण न्हाऊं घालणार?'

माझें हें भाषण हिराबाईनें ऐकलें. ती ह्मणाली 'कमले! तुझें प्रेमानें मी चुंबन घेतें; तुला कडकडून भेटतें; तुझ्या अपराधाची क्षमा करते व तुला सुगंधी तेल लावून आज न्हाऊं घालतें; मग तर तुझ्या मनाचें समाधान होईल ना?'

'समाधान? तें तर कधींच व्हायचें नाहीं.'

'तुला या ठिकाणीं सुख होत नाहीं काय?'

'माझें असें या ठिकाणीं कोणी नाहीं. या ठिकाणींचमें काय पण सर्व जगांत माझा मित्र अगर माझ्या गोतवळ्याचा कोणीच नाहीं इतकेंच नव्हे तर मला माझें सगळें नांव देखील माहीत नाहीं, मग मला येथें सुख तें कसलें होणार ?'

'तुला रहायला सुंदर वाडा आहे; नेसायला घालायला तुझ्या आवडीप्रमाणें तुला लुगडीं व चोळ्या मिळतात; फार काय सांगूं लहान मुली ज्या ज्या पदार्थांची इच्छा करितात ते सर्व तुझ्यापुढें तयार आहेत.'

'मला त्या पदार्थांपैकीं एकाचीही आवड नाहीं. माझ्यावर प्रेम करणारें एखादें मनुष्य जर मिळेल तरच मला खरें सुख होणार.'

माझ्या मनांतील हे विचार बदलावेत ह्मणून कीं काय नकळे.

'कमले' हिराबाई ह्मणाली 'तुझें हें बोलणें ऐकून माझें अंतःकरण दुःखानें भरून येतें. हें हृदयद्रावक भाषण पुरें कर ह्मणजे दिवाळीच्या सणाकरितां केलेल्या उत्तमोत्तम पक्वान्नापैकीं तुला कांहीं देईन.'

'मला त्यांची मुळींच गरज नाहीं, मला तीं आवडतही नाहींत.'

'तर मग तुला काय आवडतें सांग पाहूं ?'

'मला ? चंद्राचा शीतळ व फिकट प्रकाश, झुळझुळ वाहणारा वारा, व ध्रुवनक्षत्राचें दर्शन हीं फार आवडतात. मी कोण हें समजून घेण्याकरितां मला तुवरगड टाकून दूर जावेंसें वाटतें. 'दिपवाळीचा सण आला. दिपवाळीचा सण आला' असा जो

देवालयांतील घंटामधून ध्वनि निघतो, तो [illegible] ऐकण्याची मला उत्कटेच्छा आहे.'

तटाच्या भिंती व उत्तमोत्तम गुलाब प्रफुल्लित होत तें ठिकाण, हीं दोन्ही माझ्या दृष्टीआड कशीं झालीं तें माझ्यानें सांगवत नाहीं. येथें आलें तेव्हां मी दहा वर्षांची मुलगी होतें आणि माझ्याविषयीं कोणा एकालाही माहिती नव्हती. तुवरगड येथें मी कशी व कां आलें ? माझ्या आईबापाचें व माझें नांव काय ? माझें कुलगोत कोणतें ? यांपैकीं एकाही गोष्टीची कोणास माहिती नव्हती. मी एखाद्या कुण-बटाची अगर बादशहाची देखील मुलगी असेन असें मला वाटे. माझा एकही मित्र नव्हता. या सर्व जगांत माझ्या सारखी पोरकी पोर दुसरी कोणीच नव्हती.

हिराबाई, म्हातारा मानसिंग, माळी, अंबालाल त्याची बायको व मुलगी प्रत्येक मनुष्य मला कमला या नांवानेंच हांक मारी. मला दुसरें नांवच नव्हतें. रागानें कोणी कमला, कमला, कुणाची कमला ? असें म्हणाला तर माझ्यानें उत्तर देववत नसे. कमला अगदींच एकेरी नांव. कमला या तीन अक्षरांशिवाय कोणाला व मला स्वतःला देखील कांहींच माहिती नव्हती. जीं जीं दुःखें माझ्या मनाला डंवचत होतीं त्या सर्वांत-मला नांव नाहीं-हेंच दुःख विशेष झोंबत असे. वाड्यांत ज्या तसबिरी, पुतळे, लेणीं वगैरे होतीं तशां-पैकींच मी एक होतें असें म्हटल्यास चालेल.

राजस्थानांत जुन्या पद्धतीचीं जीं घरें होतीं तशा

भासल्याचाच तुवरगडचा वाडा होता. ऐष आराम व लक्ष्मी हीं या वाड्यांत पूर्णपणें नांदत होतीं. हें ठिकाण चंबळा नदीच्या कांठीं होतें. उदेपूरच्या राण्यानें आपल्या स्त्रीयेच्या सुखाकरितां हा वाडा व किल्ला बांधविला होता. त्यानें नंतर या ठिकाणीं एक लहानसें गांव वसविलें. हें स्थळ फारच मनोहर असून पुष्कळ कवींनीं तें सौंदर्य आपल्या कवितांत वर्णिलें आहे, व उत्तमोत्तम चित्रकारांनीं ते देखावे रेखून ही ठेवले आहेत. चंबळा नदीच्या प्रवाहानें त्या प्रदेशास फारच शोभा आली होती. तुवरगडचा आधीं वाडाच मोठा दर्शनीय होता, व नंतर मुळच्या इमारतीच्या पूर्वपश्चिमभागीं दोन सोपे काढले होते. वाड्याच्या समोरील बाजूस एक लांबलचक अष्टकोनाकृति नुस्ता चबुतरा होता. येथूनच खालीं बगीचांत उतरण्याकरितां पायऱ्या केल्या होत्या. पूर्वींच्या वेळचें सौंदर्य व अर्वाचिन काळचें ऐषआराम हीं दोन्हीं त्या वाड्यांत जिकडे पहावें तिकडे दिसून येत. त्या वाड्यांतील खोल्या मोठ्या उंच, प्रशस्त व सुप्रकाशित अशा होत्या. कांहीं खोल्या चंदनी लांकडाच्या फळ्या बसवून केल्या होत्या. इतरांस नूतन शोभा आणिली होती. बगीचांतील झाडांच्या मुळांतून पाटाचें पाणी झुळझुळ वहात होतें, व जुन्या पद्धतीचीं फुलें फुललीं होतीं. स्वतः राजाच्या बसण्याच्या ज्या खोल्या होत्या त्या मोठ्या भव्य व सुशोभीत होत्या. या खोल्या वाड्याच्या पूर्व पश्चिम भागीं होत्या. त्या फारच प्रेक्षणीय होत्या. या वाड्यांत कारागिरानें आपलें

सर्व कसब खर्चून तयार केलेले अनेक सुंदर पुतळे व तशाच तसबिरी होत्या. या तसबिरी व हे पुतळे **विजयसिंग** ( जो पुढें या वाड्याचा मालक झाला ) यानें करविले होते.

तुबरगड व त्याच्या सभोंवतालचा प्रदेश, कांहीं नाजूक काम केल्यावरून विजयसिंगास उदेपूरच्या राजानें इनाम दिला होता. विजयसिंग मोठा लढवय्या होता. त्याचें नांव भाटांच्या कवितेंतून अद्याप ऐकिवांत येतें. त्याच्या पासूनच हें ठिकाण पुढें त्याच्या वंशाजाकडे चालत आलें. विजयसिंग व त्याचे वंशज यांना आपल्या सरदारी बाण्याचा मोठा अभिमान होता. आजू बाजूच्या लहान संस्थानांनीं या घराण्यास पुष्कळ पदव्या दिल्या परंतु त्या सर्व सरदार या पदवी नंतर-ते लावीत असत. आपल्या पूर्वजांनीं मिळविलेल्या-**सरदार** या पदवीचे ते मोठे अभिमानी असून ती पदवी न टांकण्याचा त्यांनीं विडाच उचलला होता.—

"जरी कोणी उदेपूरची गादी दिली तरी देखील हे मानी सरदार तिचा अव्हेर करतील व आपली पूर्वापार चालत आलेली सरदारी राखतील" असें हिराबाई एकदां ह्मणाली व मला तें खरें वाटलें.

मी या ठिकाणीं आलें तेव्हां या जहागिरीचा उपभोग सरदार जगतसिंग घेत होता. पण तेव्हां मात्र तो दूर देशीं गेला होता. जगतसिंगाची एक चमत्कारिक गोष्ट सांगतात ती अशी:—अगदीं तरुण असतेवेळीं हा आपला कांहीं काळ, उदेपूर शहरांत घालवीत

असे. या ठिकाणीं वेडेपणानें त्याचें मन एका राजघराण्यांतील मुलीवर जडलें. त्या प्रांतांतील सर्व कन्यावर्गांत ही लावण्यवती श्रेष्ठ असल्याबद्दल सर्वत्र ख्याति होती. त्याला ती मिळण्याचा यत्किंचित्‌ही संभव नव्हता. कारण त्या राजकुलांत उत्पन्न झालेल्या मुलीस या सरदाराच्या गळ्यांत माळ घालणें आवडेना. ती स्वरूपानें जितकी सुंदर दिसे तितकीच आंतून मत्सरी स्वभावाची होती. वरपांगी प्रेम व्यक्त करण्याची कला तिला फार चांगली साधली होती. एखाद्या तरुणाचें मन प्रथम आकर्षण करून मग त्याचा धिःक्कार करण्यांत तिला मोठी मौज वाटे. जगत्सिंगानें तिची देवीसारखी सेवा केली. त्यानें तिला आवडणाऱ्या सर्व वस्तु आणवून दिल्या, तथापि त्याच्याशीं लग्न करण्याचा तिचा मुळींच मनोदय नव्हता. फराळाला तीं दोघें एकत्र जमत तेव्हां मात्र ती त्याची थोडी बहुत थट्टा मस्करी करी. तेवढ्या विनोदी भाषणानेंच जगत्सिंग मोहून गेला होता. रागानें अगर अनुरागानें त्याचा चेहरा लाल झालेला अगर विरहानें म्लान झालेला पाहून ती मोठा आनंद मानी. तिचें हें वरपांगी प्रेम जगत्सिंगास कळलें नव्हतें. तिचें तें गोड गोड भाषण, कृत्रीम प्रेम व हावभाव हीं पाहून जगत्सिंगाचें भोळें मन आनंदानें भरून गेलें, परंतु हा आनंद फार वेळ टिकत नव्हता. त्याची लगेच निराशा होई. तिच्या मनाला आल्हादकारक असे जे तरुण पुरुष तिला वाटत होते त्या सर्वांत जगत्सिंगावर तिचें प्रेम जास्त होतें, पण त्याच्याशीं विवाह करण्याची कल्पना तिच्या मनांत कधींच आली नव्हती. त्याची

दौलत फार प्राचीन काळापासून चालत आलेली होती. त्या प्रांतांतील जुन्या लोकांत त्याचें नांव मोडत असे. त्याची संपत्ती मोठी होती यांत संशय नाहीं. परंतु तो किति झालें तरी जहागीरदार असून ती राजकुलोत्पन्न मुलगी होती. त्याच्या नजराण्याचा तिनें प्रेमानें स्वीकार केला. आपल्या स्वरुपावर अनुरक्त होऊन तो अगदीं वेडा होईपर्यंत ती त्याच्याशीं हासली, त्यानें पाठविलेल्या सुगंधी पुष्पमाळा तिनें माळल्या, तथापि याच्याशीं लग्न करण्याचा तिचा विचार, दृष्टांत तर राहोच पण स्वप्नांत ही नव्हता. कोणी तशी गोष्ट काढली तर तिला वाईट वाटे. ती रागानें त्याच्या अंगावर जाई. शेवटीं जगत्सिंगानें जेव्हां तिची मागणी केली तेव्हां तिनें त्या मागणीचा अव्हेर केला एवढेंच नव्हे पण त्याचा खूप पाणउतारा केला, तेव्हां जगत्सिंगास फार वाईट वाटलें. पुढें उदेपुरांत पाय न ठेवण्याच्या निश्चयानें तो तडक माघारा फिरला. नंतर आपल्या जुन्या वाड्या बाहेर तो दृष्टीस पडेनासा झाला. स्त्रियांच्या वरोपचारी प्रेमास कंटाळल्यामुळें त्याला आपलें जिणें नकोसें झालें होतें. उपभोगाचे पदार्थ त्याला विषतुल्य वाटूं लागले.

या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर त्यानें पद्मिनी नामक एका सरदार कन्येशीं विवाह केला. जगत्सिंग पद्मिनीसह तेथेंच मोठ्या आनंदानें नांदत होता. पण हाही त्याचा आनंद त्याच्या खडतर दैवास रुचला नाहीं. त्याच्या आनंदार्काचा अस्त लवकरच झाला. त्याच्या त्या लाडक्या पद्मीनीस आकस्मिक मरण आलें.

सरदाराच्या मनास मोठा धक्का बसला. त्यानें इतःपर स्त्रियांचें नांव घ्यावयाचें नाहीं असा निश्चय केला. लोक त्यास स्त्रियांचा द्वेषी असें ह्मणूं लागले व लोकांनीं आपणास तसें ह्मणावें ह्मणून तो स्त्रियांशीं मोठ्या कटाक्षानें वागूं लागला. स्त्रीयांचा द्वेषी हे शब्द ऐकण्याची त्याला फार आवड होती.

पुढें कांहीं दिवसांनीं त्याच्या मनांतून बाहेर गांवीं फिरावयास जाण्याचें आलें. त्याला एकेच जागीं बसून चैन पडेना, तेव्हां वाड्यांत सर्व व्यवस्था ठेवणारी मोहना नामक एक वृद्ध बाई होती. हिच्यावर जगत्‌सिंगाचा पूर्ण विश्वास होता. हिच्या स्वाधीन वाडा वगैरे करून सरदारानें जाण्याची सर्व व्यवस्था केली व आपण परदेशांत निघून गेला. जयसिंग नामक एक महाराजांचा मित्र होता. तो जवळच्याच शहरीं रहात असे. वाड्याची वहिवाटमुखत्यारी महाराजांनीं त्याच्याजवळ दिली होती. तो वर्षांतून दोन वेळ येथें येई व दर खेपेस सरासरी ८।१० दिवस राही. तितक्या अवधींत तो सर्व वाड्याची तपासणी करी. वाड्याची तोडजोड करवी. जमाखर्च पाही व पुढील सामाहीची सर्व व्यवस्था लावून परत जाई. महाराजांचा सर्व पत्रव्यवहार जयसिंगाशींच होत असे.

एके दिवशीं मोहनाबाईच्या नांवानें एक पत्र आलें असावें असें वाटतें. तें कोणाकडून व कोठून आलें याचा दुसऱ्यांस पत्ता नव्हता. मोहनाबाईस कधींच पत्रें येत नसल्यामुळें या पत्राचें सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें.

पत्र वाचतांच तिनें वाड्यांतील एकंदर चाकर माणसांस आपल्याजवळ बोलावलें, ती ह्मणाली ! .

'माझ्या मित्रांपैकीं एकजण अगदीं अत्यावस्थेंत आहे. त्याची थोडी बहुत तरी सेवा माझ्या हातानें घडलीच पाहिजे ह्मणून मला आतांच्या आतां जाणें भाग आहे.'

मोहनाबाईनें आपली सर्व व्यवस्था केली. आपल्या पश्चात् लागणाऱ्या वस्तु तिनें काढून ठेवल्या व नंतर आपण गांवास गेली.

इकडे महाराजांस तुवरगड सोडून बरेच दिवस झाले, तेव्हां त्यांच्याविषयींची आठवण लोकांच्या मनांतून कमी कमी होत चालली होती, व नंतर नंतर तर त्यांचें कोणी नांवही काढीनासें झालें, तेव्हां मोहनाबाई मला घेऊन परत या ठिकाणीं आली. मी येथें आलें तेव्हां गुलाबाचीं मनोहर फुलें सर्वत्र फुललीं होतीं. मी या वेळीं सहा वर्षांची होतें. माझ्या विषयीं इतर चाकर नोकरांजवळ ती एक चकार शब्द देखील बोलली नव्हती. ती मला कमला ह्मणत असे. मग माझें नांव तेंच कीं, दुसरें कांहीं होतें तें, दुसऱ्या कोणास व मला स्वतःलाही माहीत नव्हतें. माझ्या आठवणी पासून मी पाहतें, मोहनाबाई मला जीव कीं प्राण करीत असे.

तुवरगड येथें रत्नसिंग नामक एक वृद्ध गृहस्थ राजाश्रयानें रहात होता. हा तंतुवाद्य वाजविण्यांत मोठा प्रख्यात असून गाणाराही होता. यानें मला बीन वाजवायला व त्यावर गाणें ह्मणायला शिकविलें होतें.

यानें मला लिहावाचायलाही शिकविलें. मी इकडे आ-ल्यानंतर थोड्याच दिवसांनीं माझी पालन कर्ती व मानीव आई मोहना मरण पावली.

ती मोठ्या चमत्कारानें मेली. पुस्तकालयाच्या एका पायरीवर उभी राहून ती कांहीं महत्वाच्या पुस्तकां वरील धुरळा झाडीत होती. तेथून ती धाडकन खालीं फरस बंदीवर पडून तात्काल मरण पावली. हकीमाला आणविलें होतें. तो ह्मणाला 'तिचें रोगानें काळीज फुटलें व हा रोग तिला फार दिवसां पासून होता.'

माझ्या विषयीं इत्थंभूत माहिती असलेली काय ती ही एकच बाई होती व तिचा अशा रीतीनें अंत झाला. मी कोण हें सांगण्याविषयीं तिची मी पुष्कळ-वेळ विनवणी केली होती, पण तिनें मला कांहींच सांगितलें नव्हतें.

तिच्या आकस्मिक मरणानें वाड्यांत सर्व धांदलच झाली. मोहनाबाईच्या देखत जीं जीं कामें करावयास लोक वचकत तीं सर्व तिच्या पश्चात् अर्थात् मरणानंतर ते निर्धास्तपणें करूं लागले. 'मला कशाची आठवण आहे? मी काय काय पाहिलें आहे? मी पूर्वी कोठें होतें? कोणत्या गांवीं? मोहनाबाई माझी आई कीं आन?' असे एक का दोन त्यांनीं मला शेंकडों-गणती प्रश्न केले, परंतु गुलाबाचीं फुलें व किल्याच्या तटाच्या भिंती याशिवाय कशाचेंच मला स्मरण नसल्यामुळें माझ्यानें त्यांची जिज्ञासा पुरी करवली नाहीं. मोहनाबाई माझी आई, असें लोक ह्मणत पण, माझी मानी नैसर्गिक बुद्धि मला तसें ह्मणूं देईना. माझ्या

जवळ एक छदाम नव्हता का मला कोणा मित्राची मदत नव्हती. मी तुवरगड येथें दुःखांत दिवस कंठीत होतें, तरी पण एखाद्या राजाच्या मुलीप्रमाणें मला अभिमान होता. मी कधीं कोणाला जी ह्मटलें असा एकही दिवस मला आठवत नाहीं.

मोहनाबाई मरतांच माझ्यासंबंधीं वाडाभर चळवळ उडाली. त्यांनीं ही गोष्ट जयसिंगास कळविली. मोहनाबाईच्या वारसदारास त्यानें माझ्याविषयीं विचारलें, त्यांनीं मला पाहिलें परंतु, त्यांपैकीं एकालाही माझी माहिती नव्हती.

मला मोल-मजुरीस अगर अनाथ-गृहांत पाठविण्याची त्यांनीं जयसिंगास सुचना केली, पण ती सुचना त्याला मुळींच आवडली नाहीं.

तो ह्मणाला 'महाराजांच्या आश्रयानें वाढलेली मुलगी आज जर मोल-मजुरी करील तर लोक काय ह्मणतील ? खुद्द महाराज काय ह्मणतील. इतक्या जणांत ती. तिच्याकरितां ह्मणून कांहीं खर्च जास्त येणार नाहीं. सध्यां तिला इकडेच असूं द्या. मला महाराजांचा पत्ता बरोबर माहीत नाहीं, नाहींतर हिची तजवीज कशी काय करावयाची हें त्यांना लगेच विचारलें असतें.'

नंतर मोहनेच्या जागीं हिराबाईची नेमणूक झाली. हिला देखील इतर सर्व मंडळीप्रमाणें माझा वीटाळा पडला. ती प्रसंगातीं माझ्यावर खूप रागावे, तथापि ती मुळची रागीट नव्हती. तिचा स्वभाव ममताळू होता. वाड्यांतील माणसांचा मी मोहनेचीच मुलगी असा समज झाला होता व मग ते मला तशा रीतीनें वागवूंही

लागलें. माझा त्यांच्याशीं इतका परिचय नव्हता. तरी त्यांची मजवर पूर्ण कृपा होती व ते सर्व मला आपल्यासारखीच समजूं लागले. मी मोठमोठाल्या पोथ्या पुस्तकें वाची ह्मणून ते मला हंसत असत.

मी अशीही माझ्या आयुष्यापैकीं कांहीं वर्षे घालविलीं. मला मान हा नव्हताच ह्मटल्यास चालेल. फक्त हिराबाई व अंबालाल हीं मात्र माझ्याशीं थोड्या गौरवानें वागत. अंबालाल हा मनुष्य महाराजांचा उपाध्याय होता. त्याची स्त्री माझ्याबरोबर कधीं बोलली नाहीं कां हंसली नाहीं. तिच्या मी खिजगणतींतच नव्हतें. ती स्वरुपानें सुंदर होती पण तिला त्या सौंदर्याचा अतोनात गर्व झाला होता. तिची मुलगी तर काय थेट आईचीच प्रतिमा. ती मला सदोदीत मत्सरानें बघे. आईसारखा तिलाही आपल्या सौंदर्याचा अभिमान झाला होता. ती तारुण्यानें मुसमुसलेली होती. तिच्या मनांतून पाणीदार व सुस्वरूप नवऱ्याच्याच गळ्यांत माळ घालण्याचें होतें अशा त्या सुंदर व अभिमानी स्त्रियांपुढें माझा तो काय पाड. माझ्यासारख्या मोहनेच्या पोरीविषयीं त्यांच्या मनांत घटकाभरही विचार येत नव्हता. नाहीं ह्मटल्यास अंबाजीच्या देवळांत आह्मी सर्वजणीं एकत्र जमून गाणीं ह्मणूं तेव्हां मात्र त्यांना माझी आठवण होई. माझा गळा नाजुक, गोड, उदात्त व सफाई होता, याबद्दल मी परमेश्वराचे आभार मानतें. रत्नसिंगानें मला फार सुरेख रीतीनें गाणें व बीन शिकविलें माझ्याविषयीं तो खुप अभिमान बाळगी.

' कमले ! तुझा आवाज व कोकिळेचा आवाज अगदीं सारखे आहेत. तूं गाऊं लागलीस ह्मणजे मला कोकील पक्षाची आठवण होते. ' असें तो वरचेवर ह्मणे.

मी सर्व बायकांत बसून गोड गोड गाणीं ह्मणे तेव्हांच काय तें मला थोडें सुख व अभिमान वाटे. एरवीं मी कोणत्या झाडाचा पाला ह्मणून मला अभिमान वाटणार !

मी विसरलें—आतां देखील त्याची आठवण होतांच माझे डोळे पाण्यानें भरून येतात. मी गाणीं ह्मणूं लागलें ह्मणजे देवळांतील एकंदर बायका तटस्थ होत. गाणाऱ्या मंडळीचा ताफा तर माझ्याकडे साश्चर्य दृष्टीनें अवलोकन करीत असे. गोड गोड रसाळ शब्दांचीं देवावरील गाणीं ह्मणूं लागलें ह्मणजे माझा मलाच अनावर आनंद होत असे. अशा वेळीं नीलवर्ण आकाशांतील ध्रुवादिक नक्षत्रांकडे दृष्टी ठेवून त्यांना माझें गोड गाणें मी ऐकवीत आहे कीं काय असा मला भास होई.

मी गाणें ह्मणूं लागलें ह्मणजे अंबालालची बायको व मुलगी हीं उभयतां, माझ्याकडे रागानें, मधुन मधुन पहात असत. गाणीं ह्मणण्यांत आपण निष्णात असें त्या मानीत व पहिल्या प्रथम सर्व बायकाही तसें ह्मणत, पण मी गाणीं ह्मणूं लागल्यापासून त्यांचें कोणी नांवच घेईना. त्यां दोघींनां त्याचें वाईट वाटूं लागलें. त्यांनीं मला देवळांत येऊं न देण्याचा प्रयत्न चालविला. व त्यांत त्यांना यशही आलें. ' ही हीनकुलांतली मुलगी, हिला माझ्या पवित्र गाभाऱ्यांत येऊं देऊं नका. हिचें मला गाणें

नको ' असा आपणास अंबाजीचा दृष्टांत झाला ह्मणून त्या बायकोनें सर्वांस सांगितलें. या उपाध्याच्या बायकोवर सर्वांचा विश्वास होता. त्यांनीं तिच्या वचनानुरूप मला देवळांत जाण्याची मनाई केली.

माझ्या सुखाचा अशा तऱ्हेनें ऱ्हास झाला तथापि मी मुळींच डगमगलें नाहीं. वाचनगृहांत एक जुनें बीन होतें. तेंच मला माझ्या उत्तम मित्राप्रमाणें वाटूं लागलें. मी तें वाजवायला शिकूं लागलें, व माझ्या वयाला सोळा वर्षें संपतात न संपतात तोंच मी लोकांच्या आवडीचीं सर्व साधारण पदें वाजवायला शिकलें. नियमित पदें वाजविण्यांत तर मी अगदीं निष्णात झालें होतें.

हिराबाईला माझी गाण्याबजावण्याची उत्सुकता दिसून आली तेव्हां ती ह्मणाली.

' कमले ! तूं जें थोडें बहुत घरचें काम करतेस तें करुं नको. कारण त्यानें तुझा हात जड होईल. बीन वाजविणाऱ्याचा हात हलका असला पाहिजे. '

ती कांहीं वेळानें पुन्हां ह्मणाली.

' कमले ! कदाचित् तूं कोणाची हें तुला कळेल. तुझे आईबाप व आप्तइष्ट असल्यास बरेंच, नाहीं तर तुला पोटाकरितां खपावें लागेल. तेव्हां तूं ह्या गाण्या बजावण्यावर आपलें पोट भरशील. '

बोलतां बोलतां ती एवढेंही ह्मणाली.

' कमले ! तुला आज अंबालालच्या घरीं जावें लागणार.

' तें कां ? '

'त्यांना आज कांहीं वाण द्यावयाचें आहे !'

'बरें मग जातें.'

'मग जा, पण त्या ठिकाणीं अंबालालची मुलगी भेटेल, तिच्या पुढें ताठ्यानें वागूं नको. तिला योग्य तो मान दे.'

हें भाषण ऐकून माझे डोळे रागानें लाल झाले. तथापि उपाध्येबुवांच्या मुलीस मान न देतां अहंकृतेनें चालण्याइतकी मी कोणाची कोण ? खरोखरीच या प्रश्नाचें उत्तर देण्यास मी तेव्हां असमर्थ होतें.

---

## प्रकरण २ रें.

### मुकें प्रेम.

मला सतरावें वर्ष लागलें, तेव्हां माझें सौंदर्य अगदीं पूर्णतेस पोंचून माझ्या रूपांत न्यूनता नाहीं असें माझें मलाच आरशांत पाहिलें ह्मणजे वाटे. वाड्यांतलीं एकंदर चाकर माणसें संध्याकाळीं सहल करावयास जात. तीं मला ही बरोबर बोलावीत, पण मी त्यांच्या सामगमें कधींच गेलें नाहीं. नंतर त्यांनीं मला हांक मारण्याचेंच सोडलें. मी बहुतेक वेळ पुस्तकालयांतील पुस्तकें वाचण्यांत व बीन वाजविण्यांत घालवीत असे. मला आठवड्यांतून तीन वेळ वस्तादजी शिक्षण देत असत. माझ्या पुढील स्थिति संबंधीं मनोराज्य करणें

माझें आवडतें माणूस कोणी नाहीं म्हणून डोळ्यांतून अश्रु ढाळणें, करमणूक करणें, निजणें, बसणें जें काय मला करावेंसें वाटे, तें मी त्या पुस्तकालयांतच करीत असे.

माझ्यावर प्रेम करणारें एखादें मनुष्य मिळेल काय? ज्या अनाथ मुलीस पुरें नांवही नाहीं तिची कोणाला तरी कींव येईल काय? माझा हा एकांत-भंग कोणी प्रेमानें करील काय? असे तरंग माझ्या मनांत केव्हां केव्हां उद्भवत असत. वीरपत्नीप्रमाणें सजून एखाद्या अरण्यांत जाऊन वनशोभा बघत स्वस्थ बसावें. नंतर 'मृगया करण्या करितां त्या ठिकाणीं एखादा राजपुत्र येईल. मला पहातांच तो मोहून जाईल. अर्थात तो मग मला आपली पट्टराणी करील, नंतर मला अशा परतंत्रावस्थेंत रहायला नको' असे ही विचार-तरंग केव्हांतरी माझ्या मनांत येत असत. अहाहा! हें जर सर्व घडून येईल तर माझ्या सुखाची तुलना कशा बरोबर बरें करितां येईल? प्रेमाच्या गोष्टी मी पुस्तकांत वाचल्या होत्या तेवढ्याच, एरवीं मला प्रेमाचा अद्याप गंधही नव्हता.

एके दिवशीं मी वाचनालयांत बीन वाजवून गात होतें व गाणें मोठ्या बहारींत आलें होतें अशा वेळीं एक दासी धांवत माझ्याकडे आली.

'हं कमलाबाई!' ती म्हणाली 'गाणें पुरें करा व हें बीनही जागच्या जागीं ठेवून आतांच्या आतां बाहेर या' माझा उत्सव-भंग झाला. मला तिचा भारी राग आला. पण काय उपयोग? मी तो सर्व गिळून तिला विचारलें.

'कां आज बरीचशी घाई दिसते?'

' बाई ह्मणजे ! नुक्तीच जयसिंगाची स्वारी वाड्यांत आली आहे. त्यांना तूं वाचनालयांत असलेलें आवडणार नाहीं ह्मणून हिराबाईनें तुला तिकडे येण्याविषयीं सांगितलें आहे. '

मग मात्र माझा उपाय हरला. माझे विचार, व गाणें बजावणें जेथल्या तेथें राहिले. हिराबाईच्या सांगण्याप्रमाणें मला वागलेंच पाहिजे होतें. तिचेंही बरोबरच. माझ्यासारख्या पोरक्या पोरीचें त्या विशाल व सुशोभीत पुस्तकालयांत काय काम? मी माझ्या हातांतील बीन जागच्या जागीं ठेवलें व निमूटपणें बाहेर पडलें.

मी दिवाण खान्यांतून जात होतें, इतक्यांत जयसिंगाची माझ्यावर दृष्टी गेली. मी त्याला ओळखत असे पण त्याला मात्र माझी ओळख नव्हती.

' तूं कोण? ' त्यानें मला विचारलें.

खरोखरीच जो तो मला हाच प्रश्न प्रथम करी याचें आश्चर्य वाटतें.

' कमला ' मी ह्मटलें.

कमला हीं अक्षरें त्यानें जरा हेलकावा देऊन उच्चारिलीं. मी त्याच्याकडे पहात होतेंच. त्याच्या चेहऱ्यांत आनंदाश्चर्याची झांक मारूं लागली.

' कमले ! ' तो पुन्हां ह्मणाला ' मोहनाबाईची मुलगी ह्मणतात ती तूंच काय? '

मी कांहींएक उत्तर न देतां मान खालीं घातली. लगेंच तो ह्मणाला.

तूं मोहनेची मुलगी असशील असें मला तरि

निदान वाटत नाहीं' तथापि तूं कोणाची कोण याचेंच मला मोठें कोडें पडलें आहे.

मला त्याच्या शब्दांचें कौतुक वाटलें, व मी मोहनेची मुलगी नव्हे ह्मटल्याचा मला भारी आनंद झाला.

तो ह्मणाला ' महाराज आतां इकडे येणार. ते अमुकच दिवशीं येतील ह्मणून सांगवत नाहीं, परंतु पुढच्या आठवड्यांत त्यांची स्वारी इकडे येईल असा अदमास आहे. '

मी उत्सुकतेनें ह्मटलें

' मग मला इकडे रहायला मिळेल असें तुह्मांला वाटतें काय ? माझी त्यांनां आपण हकीगत कळविलीच असाल. '

' मला तुझ्या दोन्हीं प्रश्नांचीं उत्तरें देतां येत नाहींत '

' तीं कशीं ? '

' महाराजांचीं इतकीं पत्रें आलीं पण त्यांत तुझ्या विषयीं एक अक्षरही त्यांनीं लिहिलें नव्हतें. मोहनेच्या मरणानंतरची सविस्तर हकीगत मी त्यांना कळविली होती, पण त्यांच्याकडून त्याविषयीं कांहींच लिहून आलें नाहीं. '

' तर मग माझी काय वाट ? मी कसें करूं ? '

' तूं कांहीं करूं नकोस फक्त थोडे दिवस यांच्या दृष्टीस पडूं नको ह्मणजे झालें. महाराज आल्यावर मी ४।२ दिवस इकडे येणारच, तेव्हां त्यांना मी तुझी हकीगत सांगेन. आतां मात्र मला काश्मीर देशांत गेलें पाहिजे. मला तिकडे महिनाभर राहावें लागेल. महा-

राज तुझी काहींना कांहीं तजवीज करतील अशी माझी खात्री आहे.'

त्याच्या शेवटच्या सांगण्यानें मला थोडा धीर आला. माझा जन्म चांगल्या कुळांत झाला असावा असेंही मला वाटूं लागलें. पण मी कोण याचा मला मोठा गोंधळ पडला. महाराज येणार ह्मणून वाड्यांत एकच चळवळ उडाली. जयसिंग फक्त त्या खेपेस ४।२ तासच होते. हिराबाईनें माझ्या गाण्या बजावण्याची त्यांच्याजवळ तारीफ केली तेव्हां, त्यांनीं मला बोलावूं पाठविलें. मी जातांच ते मला 'गाणें ह्मण पाहूं' ह्मणाले. मी बीन वाजवून गाणें ह्मटलें. नंतर माझ्याकडे विचारयुक्त मुद्रेनें पाहून . ते ह्मणाले.

'अशा सुंदर गाणाऱ्या मुलीस भिण्याचें मुळींच कारण नाहीं. कमले ! तुझा कंठ अत्यंत मधुर आहे. इतकें सुंदर गाणें मी कधीं ऐकलें नव्हतें. तूं कोठेंही स्वतंत्रतेनें पोट भरशील. '

स्वतंत्रतेनें हे शब्द मला फारच आवडले. महाराज इतक्यांतच येतील ह्मणण्याची कल्पना देखील कोणाला नव्हती. गाड्या, घोडे, शिपाई, गाडीवाले, मोत्तदार, स्वैंपाकी इत्यादि सर्व परिवार एकदम दाखल झाला. राजमहालाच्या खोल्या खुल्या केल्या. तसबिरी नीट व्यवस्थेनें बसविल्या; त्यांतच मी महाराजांची तसबीर पाहिली. ती त्यांच्या तरुणपणांत काढलेली होती. त्यांचा चेहरा हांसरा, बाणेदार व फारच मनोहर रीतीनें खुल-विला होता. पद्मिनी जिवंत असतेवेळीं ही तसबीर काढली असावी असें मला वाटलें. त्यांची छाती विशाळ

होती. गाल उन्नत असून त्यांवर कळे गळले होते. त्यांच्या दृष्टींत करुणा भरली होती, व या सर्व गोष्टीं वरून मला ते दूर लोटणार नाहींत असें वाटलें.

महाराज दोन तीन दिवसांनीं गडावर यावयाचे होते. ह्मणून त्या वेळीं त्या ठिकाणाला फारच सौंदर्य आणलें होतें. जो वाडा पूर्वी तेजोहीन दिसत होता तोच नंतर श्रीमंतांस राहण्यायोग्य ऐषआरामाच्या जिनसांनीं परिपूर्ण भरलेला दृष्टीस पडला. माझ्या करितां ह्मणून खालच्या मजल्यांत एकही खोली रिकामी नव्हती. चौसोपींत जागा होती, पण त्यांत सर्व चाकर नोकर निजत असत; त्यांच्यांत मिळून मिसळून असण्याचा मला कंटाळा असे. नवीन खोलींत निजावयाचें मोठें भय वाटे, अर्थात खालीं माझ्या सोयीनुरूप जागा नसल्यामुळें मला अगदीं शिखरावरील खोलींत राहणें भाग पडलें. मला पुस्तकालयांत जाण्याची मनाई झाली.

शेवटीं एकदाचे महाराज आले. मी त्यांची तसबीर पाहिली होतीच. तींत कितितरी आनंदाची झांक मारत होती. महाराजांच्या पूर्वीच्या व तेव्हांच्या रूपांत जमीन आस्मानाचा फरक पडला होता. त्यांचा चेहरा त्या वेळीं फारच उतरलेला दिसला.

महाराज आल्यानंतर कांहीं दिवस माझ्यासंबंधीं त्यांच्या जवळ कोणी एक चकार शब्द देखील काढला नव्हता, व त्यांनींही कांहीं चौकशी केली नव्हती. एके रात्रीं घरांतलीं सर्व माणसें गाढ निजलीं असें पाहून मी खालीं वाचनालयांत गेलें. तेव्हां तेथें कोणीएक नव्हतें. मला तेथील एक पुस्तक पाहिजे होतें, तें घेऊ

पस्त मी माझ्या खोलींत आलें. येतेवेळीं माझ्या बुचड्यांतील लोंकरीचें गुलाबाचें फूल मला नकळत त्या वाचनालयांत पडलें. दुसरे दिवशीं महाराज आपल्या खोलींतून त्याच वाटेनें दिवाणखान्यांत येत होते, तेव्हां त्यांच्या दृष्टीस तें फूल पडलें. ते तें वर उचलून घेणार इतक्यांत तेथें एक दासी आली. तिला 'हें फूल कोणाचें?' असें महाराजांनीं विचारलें.

ती ह्मणाली. 'कमलेचें'

माझें नांव ऐकतांच त्यांचें मन घोंटाळ्यांत पडलें. त्यांनीं हिराबाईस धाडून देण्याविषयीं तिला सांगितलें. हिराबाई आपली वाहवा करितात का दोष देतात नकळे, या संशयांतच तिकडे गेली. महाराज यावेळीं खिडकींतून बाहेर पहात होते, ते झरकन् मागें वळले. त्यांनीं हिराबाईस विचारलें.

'कमला नांवाची एक तरुण मुलगी या वाड्यांत आहे ह्मणून मी ऐकतों ती कोण?'

'ती कोण हें मला माहीत नाहीं. मी आलें तेव्हां ती येथें होती व अद्याप इकडेच असते.'

'आणि तिला इकडे कोणी आणली?'

'मोहनाबाईनें.'

'कधीं?'

'तें मला माहीत नाहीं. ती कांहीं दिवस परगांवीं गेली होती. तिनें येतांना हिला आणलें असें चाकरलोक सांगतात, परंतु त्यांतील एकालाही हिची कची हकीगत माहीत नाहीं.'

मोठेंच आश्चर्य! माहिती ही कोणाला तरी असा-लीच पाहिजे. तुला कांहींच माहीत नाहीं काय?'

'नाहीं. मोहनेच्या मरणानंतर मीच तिचें पालन-पोषण करतें. आह्मीं प्रथम तिला अनाथ बालगृहांत अगर कारखान्यांत मोलमजुरी करण्याला पाठविण्याचा विचार केला, पण ती गोष्ट जयसिंगास रुचली नाहीं, व आपणासही तें आवडणार नाहीं असें ते ह्मणाले. मग आह्मी तिला येथेंच ठेवलें. ती मुलगी अगदीं स्वतंत्र आहे. तिच्यावर ताबा असा कोणचाच नाहीं.'

महाराज ह्मणाले.

'तर मग तुला अगदींच माहिती नाहीं. सर्व चाकर लोकांस इकडे पाठवून दे पाहूं.'

रांधपाकी, माळी वगैरे जुनी जुनी मंडळी महाराजां समोर आली. महाराजांनीं त्यांना 'कमला कुठली कोण' असा प्रश्न केला. ते ह्मणाले.

'मोहनाबाई कांहीं दिवस परदेशांत गेली होती. तिनें येतांना हिला आणलें.'

कोठून मला आणलें हें कोणा एकालाही माहीत नव्हतें. त्यांचा चेहरा या वेळीं आनंदानें फुलला नव्हता कां रागानें लाल झाला नव्हता ते कांहीं विचारांत मग्न झाले त्यांनीं सर्व चाकर-नोकरांस जाण्यास सांगून मला स्वतःच धाडून देण्याविषयीं आज्ञा केली. हिराबाई तो निरोप घेऊन माझ्याजवळ आली. ती ह्मणाली

'कमले! तुला महाराजांनीं बोलावलें आहे. जा. भिऊं नको. तुझें मनोहर गाणें त्यांनीं ऐकिलें ह्मणजे ते

तुझ्या पोटापाण्याची तजवीज मोठ्या आनंदानें करतील. पोरी! तुझें दैव उदयास येईल. जा.'

या तिच्या भाषणानें मला बराच धीर आला, पण माझ्यानें महाराजांपुढें एक पाऊल टाकवेना. अंगास थरकांप सुटला. महाराज स्त्रियांचा तिरस्कार करतात, व त्यांना नकळत मी या वाड्यांत लहानाची थोर झालें या दोन कारणांनीं मला त्यांच्यापुढें जाऊं नयेसें वाटलें, पण काय करणार? निरुपायानें मी त्यांच्यापुढें जाऊन उभी राहिलें. त्यांची आंगलट साधारण होती. ते बरेच उंच होते. त्यांचे केश बर्फाप्रमाणें पांढरे सफेत होते. तोंडावर दुःखाची छाया भासत होती तथापि, तें मोठें मोहक दिसत होतें. तसबीरींतील दृष्टींत प्रेम ओतप्रोत भरलें होतें, पण आतां तींत कोपानें लाली चढली होती. ती निखाऱ्यासारखी लाल दृष्टी माझ्याकडे लागतांच माझी अवस्था काय झाली हें माझ्यानें सांगवत नाहीं. महाराजांनीं ती दृष्टी माझ्यावर आश्चर्यानें लावली, कां भय दाखविण्याच्या उद्देशानें लावली अथवा प्रेमानें लावली हें मला समजेना.

प्रथम आह्मीं दोघेंही स्तब्ध जागच्या जागीं उभीं होतों. नंतर महाराज माझ्यापुढें एक-दोन पावलें आले, पण पुन्हां मागें सरून त्यांनीं मलाच पुढें येण्याविषयीं सांगितलें. त्यांनीं दुःखाचा उसासा टाकला व बारीक रीतीनें माझ्याकडे टक लाविली. माझ्या हृदयांतील एकूनएक विचार हे समजून घेत होते असें मला वाटलें.

ते ह्मणाले 'एकंदरींत तुझा कमला हेंच नांव ना?'

'होय' मी ह्मटलें.

'याहून जास्त कांहीं माहिती आहे काय?'

मला यावेळीं खालीं मान घालून स्वस्थ रहावें लागलें. माझ्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. त्यांच्या त्या प्रश्नानें माझें अंतःकरण खळबळून सोडलें. इतक्यांत ते म्हणाले.

'कमला लहान मुलगी असेल असें मला वाटलें होतें.'

'कांहीं दिवसांपूर्वी मी लहानच होतें आतांच वाढलें आहे, पण अर्भकवत् मी निराधार आहे तशीच आहे.'

'तर मग तूं कोणाची कोण?'

मेला हा प्रश्न मला सदोदित लोक करीत. माझे डोळे पाण्यानें डबडबले होते. ते मी तसेच वर केले व म्हटलें.

'मी कोण हें मला स्वतःला व इतर कोणालाही माहीत नाहीं. गुण्यागोविंदानें रहाणाऱ्या पक्षांस घर असतें पण मला तेंही नाहीं.'

'तूं रहातेस तें घर नव्हे काय?'

'घर कां वाडा आहे, पण आप्तइष्ट अथवा मित्र असल्याशिवाय तें घर असें कोणालाच म्हणतां येणार नाहीं निदान पूर्ण नांव तरी असलें पाहिजे पण मला त्यापैकीं एकही नाहीं'

'तुझें वय किती?'

'सतरा.'

'तुला या ठिकाणीं येण्यापूर्वीची काय काय हकीगत माहीत आहे ती सांग पाहूं!

' ती अगदींच महत्वाची नाहीं. मला इतकें आठ वतें कीं, मी प्रथम ज्या प्रदेशांत होतें, त्या ठिकाण गुलाबाचीं फुलें अगदीं तलावाच्या तीरास देखील होत त्या प्रदेशाभोंवतीं किल्याचा तट होता. मी निज ह्मणजे एक मनुष्य मला आपल्या पोटाशीं घेऊ माझ्याकडे पाही व डोळ्यांतून धाय धाय आंसवें ढाळी.

' एवढीच तुला माहीती आहे काय ?

' होय '

' बरें, मोहनेस तरी तुझी कांहीं जास्त माहि होती काय ?

' छे ! मला नाहीं वाटत. तसें असतें तर तिनें म सांगितलें असतें. '

नंतर ते आपल्याशींच कांहीं पुटपुटले. ' गरी बिचारी मुलगी ' हेही शब्द त्यांच्या तोंडून निघाले. ते ह्मणाले

' मी पुष्कळ दिवसांनीं घरीं आलों असून वाड्यां लहानाची थोर झालेल्या मुलीची हकीगत मला दुसऱ्या कोणालाच माहित नसावी ही मोठी चमत्का रिक गोष्ट नव्हे काय ? '

' चमत्कारिक तर खरीच. इतरांप्रमाणें माझे आई बाप असलेच पाहिजेत. माझी अशी हयगय केली याबद्दल त्यांना देवाकडे तरी जाब द्यावा लागेल.

ते माझ्याकडे बघत होतेच. ते ह्मणाले.

' तूं सुंदर आहेस हें तरी तुला ठाऊक आहे काय ? मला फारच आनंद झाला. मी ह्मटलें.

' मला यापूर्वी असें कोणी विचारलें नव्हतें का

सांगितलें नव्हतें. जगातील एकंदर वस्तूंविषयीं मी इतकी अज्ञान आहे कीं, 'मी सुंदर आहे' असें मला कचितच ह्मणवेल?'

'असो–मुली तूं फार सुंदर आहेस. बरें पण तूं एथें राहून काय काय शिकलीस?'

मला या विचारण्यानें भारी आनंद झाला. त्यांच्या पुढें मी शिकलेल्या विद्येची एक यादीच करून ठेवली. व ह्मटलें

'मला या सर्व विद्या रत्नसिंगांनीं शिकविल्या.'

पुढें बऱ्याच दिवसांनीं माझ्या गुरूजींना महाराजांनीं पांचहजार रूपये बक्षीस दिल्याचें मी ऐकलें पण ते कां व कशासाठीं दिले हें त्यानां त्यांनीं मुळींच सांगितलें नाहीं.

मला थोडें गाणेंही येतें' मी ह्मटलें.

'कमले' महाराज ह्मणाले–'तर मग उद्यां तूं त्यावरच आपला चरितार्थ चालविणार वाटतें.'

'होय.'

माझें भाषण ऐकून महाराज [illegible] अहाहा! या वेळचा त्यांचा चेहरा पाह[illegible] होता.

'कमले!' ते ह्मणाले '[illegible] पाहूं.'

त्यांनीं लगेच माझ्या [illegible] व सूर काढायला सुरवात केली. नंत[illegible]

'तुला गाणें कोणी शिक[illegible]

'ज्यांनीं इतर विद्या [illegible] ह्मणून ह्मटलें त्यानींच मला हें गाणें शिकवि[illegible]

नंतर मी एका विरहिणीचे [illegible] दर्शक पद ह्मटलें.

पद.

हाय ! हाय ! चैन नाहिं मन्मनांतरी । व्याध-जालि मृगकिशोर
गति तशीच गे झाली, शोक करित घावरी ॥ ध्रु० ॥
सुख न गमे मुळीं कशांत, विरस तेंवि चित्त होत
विकल अखिल जगतिं दिसत, स्वसुख संहरी ॥ १ ॥
तळमळ करि तनु अनुदिन, स्वजन सुमति कुपित पूर्ण
गरल गमत अशन शयन, वृत्ति झालि खचित बावरी ॥ २ ॥

'हे कोणाचे बरें शब्द आहेत ?'

'माझ्यासारख्या अनाथ अबलेचे.'

'आणि हें गाणें कोणी केलें ?'

अहाहा ! यावेळीं माझें अंतःकरण किति तरि आनंदानें भरलें ह्मणून सांगूं. मी मोठ्या अभिमानानें ह्मटलें.

'तें गाणें होय, मी-मीच केलें.'

'तर मग तूं मोठी हुशार आहेस. कमले ! तूं केल्यापैकीं दुसरें एखादें पद ह्मण पाहूं.'

यावेळीं मी रचलेल्या प्रणय विलोभन नाटकांतील एक पद ह्मटलें.

पद ( गुलचमन्मे ) या० चा०

घे करीं कुमारा तीर, ढाल, धनु तलवार
हें घाल कवच, मंदील शिरीं, पादिं पैंजार ॥ ध्रु०
खंजीर प्रखर घे भाला बिचवा तय्यार
हा झगा चिलखतावरुनि घाल हिरवागार
गुप्ति ही ठेव गुणधामा । कटितटीं
येईल संगरीं कामा । संकटीं

हे वीरकुमारा! समर–वाजिवर हो स्वार
जा लढावया मग करुनि मनाचा निर्धार ॥ १

माझा शेवटचा चरण ह्मणून पुरा होतो न होतो इतक्यांत महाराजांच्या तोंडून प्रोत्साहनोत्पादक शब्द निघाले. ते ह्मणाले—'शाबास! शाबास! जी मुलगी अशा सुंदर कविता करते तिला निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं?

मला बराच धीर आला. मी त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागलें. त्यांना पाहिल्यापासून माझी हकीगत त्यांना विचारावी असें मला वाटे, पण तशी संधी नव्हती ती आज मिळाली. मी ह्मटलें 'महाराज! माझ्यासंबंधीं कोणालाच कांहीं माहिती नाहीं. मी कोणाची कोण हें तुह्मांला तरी माहीत आहे काय?'

मी त्यांच्या तोंडाकडे पहात होतेंच. माझ्या प्रश्नाचा त्यांनीं क्षणभर विचार केला, व आठवलेंसें करून ते ह्मणाले.

'काय? तुझी हकीगत मला मुळींच माहीत नाहीं-- तसें असतें तर चाकर नोकरांस व स्वतः तुला मी इतके प्रश्न विचारलेच नसते.'

त्यांनीं झटकन होय अथवा नाहीं ह्मटलें असतें तर माझें मन संशयांत पडलें नसतें. त्यांच्या त्या सांगण्यावर विश्वास ठेवून मी स्वस्थ बसलें असतें, परंतु माझ्या प्रश्नाचा त्यांनीं कांहीं वेळ विचार केला ह्मणून मला संशय आला. त्यांनां माझी माहिती असलीच पाहिजे असा माझा पक्का ग्रह झाला.'

ते एकदम ह्मणाले?

'तुझ्यासंबंधीं मला थोडा विचार केला पाहिजे. मला वाटतें कीं तुझें वाचन बरेंच झालें असलें पाहिजे.'

मी जरा तोऱ्यानें वाचनालयांत सभोंवार पाहिलें व ह्मटलें

'यांपैकीं बहुतेक पुस्तकें मी वाचलीं असून कित्येक २।२, ३।३ वेळां ही वाचलीं आहेत'

'या विषयीं आपण एक दिवस बोलूं. मी पुष्कळ दिवस इकडे नव्हतों या मुळें कोणतीं पुस्तकें आहेत व कोणतीं नाहींत हें मला माहीत नाहीं.'

मी तुवरगडाला आजच मुकलें नाहीं, माझे अजून कांहीं दिवस इकडे जातील असें मला वाटलें. व मला थोडा धीर आला.

मी त्यांना ह्मटलें

'तर मग तोंपर्यंत मी कोणीकडे राहूं व काय करूं? मला राहायाला धड जागा नाहीं. गड्या-माणसांत मि-ळून असणें मला आवडत नाहीं. आपल्या खासगीपैकीं एखादी खोली मिळेल काय?'

ते ह्मणाले 'मी त्याविषयीं विचार करून सांगेन तोंपर्यंत धीर धर. कमले! अशी उतावीळ होऊं नको. मी तुला पुनः एकवेळ भेटेन.'

महाराजांच्या मनांतून आतां मी जावें असें होतें. ह्मणून कांहींएक न विचारतां निमुटपणें मी खोली बाहेर पडलें.

---

# प्रकर्ण ३ रें.

## चुकीची दुरुस्ती.

"कमले तुझ्याविषयीं महाराज काय ह्मणाले? तूं आतांच गड सोडून जाणार काय? त्यांना तरी तुझी कांहीं माहिती आहे काय?' असे एक का दोन? थोरांपासून लहानांपर्यंत एकंदर चाकर नोकरांनीं मला हजारों प्रश्न केले. महाराजां नकळत मी वाड्यांत लहानाची थोर झालें ह्मणून त्यांनीं काय ह्मटलें? तें ऐकण्याची सर्वांस उत्कंठा लागली होती. स्वतः हिराबाईनें देखील मला हा प्रश्न विचारला, यांत नवल वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. मला देखील मोठें आश्चर्य वाटलें. महाराजांस माझी हकीगत ठाऊक आहे अशी त्यांच्या दृष्टीकडे पहातांच माझी खात्री झाली. यदाकदाचित् मी त्यांच्या एखाद्या जुन्या मित्राची मुलगी असेन, पण मग इतकी गुप्तता राहिली नसती व ठेवण्याचीही गरज नव्हती, 'मी कोण' या महत्वाच्या प्रश्नाचा विचार करून माझें डोकें दुखूं लागलें, दुःखानें गळा भरून आला, महाराजांना माझ्या लुब्रेपणाचा राग येईल, ते मला बाहेर घालवतील, असें मला प्रथम वाटलें; पण दुसरे दिवशीं ती माझी कल्पना अगदीं खोटी ठरली. त्यांनीं मला पुन्हां वाचनालयांत बोलावणें पाठविलें. यावेळीं माझें मन आनंद व आश्चर्य या दोहोंनीं भरून गेलें. नंतर मी वाचनालयांत गेलें. महा-

राजानीं मला आज काल्च्या इतके प्रश्न केले नाहींत इतकेंच नव्हे तर माझ्याकडे त्यांनीं पाहिलेंही नाहीं;

'कमले!' ते ह्मणाले 'तूं या वाचनालयांतील बहुतेक पुस्तकें वाचलीं आहेस असें मला वाटतें. होय ना?'

'होय,' मी ह्मटलें 'महाराज! माझ्या विश्रांतीचें काय तें हें एकच स्थान होतें.'

'आणि तें मी आज तुझ्यापासून काढून घेतलें?'

'हरकत नाहीं आपण मुखत्यार आहां आपला या ठिकाणीं अधिकार आहे.'

'असें काय? तर मग मलाही तो अधिकार व ती मुखत्यारी उदारपणानेंच चालविली पाहिजे!' 'कमले!' ते ह्मणाले 'मी या वाचनालयाचा सर्व अधिकार तुझ्याकडे दिला आहे.'

मला या भाषणाचा मोठा अचंबा वाटला. मी हलक्या कुळांत निपजलें नव्हतें असेंही माझें मन मला सांगूं लागलें, कारण तसें असतें तर आपल्या आप्त स्नेह्यांस, चाकर नोकरांस व खुद्द हिराबाईसही आंत ढवळाढवळ करण्याची परवानगी नसलेल्या खोलींत त्यांनीं मला बसण्याउठण्याची परवानगी दिली नसती. महाराज माझ्याशीं मोठ्या प्रेमानें बोलले, याचा मला मोठा अभिमान वाटूं लागला.

'कमले!' ते ह्मणाले 'तुझ्या अभ्यासांत व्यत्यय आणणें मला प्रशस्त वाटत नाहीं. मुख्यत्वें करून तुझ्या मनांतून जर वादन विद्या वाढवावयाची असेल तर आपण अशी तजवीज करूं'

'ती कशी?'

'मी सकाळीं सहल करावयास जातों व दोनप्रहरीं येथें वाचत बसतों हें तुला माहीत आहेच. तेव्हां तूं सकाळीं येथें येऊन पाहिजे तितका वेळ बसत जा, व वीन वाजवायला शीक.'

मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानले. ते माझ्याशीं कधींच ताठ्यानें वागले नाहींत. सारखे दोन तीन दिवस ते मला भेटत होते. त्यांचा चेहरा उदास दिसत होता. त्यांचे डोळे खोल गेले होते. ते कांहीं गहन विचारांत गर्क झाल्याचें दिसलें. त्यांचे घट्ट पाय धरावे व त्यांना माझी हकीगत विचारावी असा माझा निश्चय ठरला. विशेष निग्रह पाहून ते ही ती सविस्तर हकिकत सांगतील असें मला वाटूं लागलें. ते दररोज मी केलेल्या पदापैकीं कांहीं पद्यें ह्मणवीत. माझी कविता ऐकून त्यांना आनंदाच्या लहरी येत. एके दिवशीं ते ह्मणाले:

'कमले! तूं मोठी चमत्कारिक मुलगी आहेस! तूं लवकरच नांवालौकिकास येशील.'

'तुह्मांला खरोखरीच असें वाटतें काय!'

'तूं उदयाला येणार हें अगदीं खचित, फक्त तो दिवस पहायाला मी मात्र जगणार नाहीं.'

तुमचे केस पांढरे झाले ह्मणून तुह्मी असें ह्मणतां काय! केस पिकले ह्मणून आपण ह्मातारे झालां असें नाहीं. तुमची प्रकृती सदृढ दिसते.'

'प्रकृति सदृढ दिसते एवढेंच, एरवीं दुःखाग्नीनें माझें काळीज करपून गेलें आहे व जात आहे यामुळें माझा मला भरंवसा नाहीं. आज मरण आलें तर देखील माझी तयारी, इतका मी त्रासून गेलों आहे.'

त्यांच्या बोलण्याचें मला वाईट वाटलें. मला ते माझ्या बापासारखे वाटत होते. तेही मला कधीं कधीं मुली ह्मणून हाक मारीत. माझ्यामध्यें व महाराजांमध्यें जमीन आस्मानाचा फरक पण, मला तसें पुढें पुढें मुळींच वाटेना. आह्मी आमच्या वेळाची व्यवस्था केलेल्या दुसऱ्या दिवशीं मीं वाचनालयांत एक सुरस नाटक वाचीत बसलें होतें, इतक्यांत महाराज तेथें आले. ते माझ्या मागें उभे राहिले. मला त्याचा पत्ताच नव्हता. त्यांनीं आपल्या हातांनीं माझे हात वर केले व त्यांकडे ते पाहूं लागले.

कमले! ते ह्मणाले 'तुझे किति तरी सुरेख हात हे? बीन वाजवायला असेच हात पाहिजेत.'

ते माझ्या हाताकडे इतक्या बारीक दृष्टीनें पाहूं लागले कीं, शेवटीं त्यांचे ते विशाल नेत्र पाण्यानें डब-डबले. त्यांना पाहिल्यापासून क्षणोक्षणीं मला माझ्या स्थितिविषयीं आश्चर्य वाटूं लागलें. एके दिवशीं बागेंत मी एक फूल पहात उभी होतें, इतक्यांत महाराज तिकडे आले. ते ह्मणाले.

'कमले! तुझा या फुलाची मारी आवड दिसते.'

'होय' मी ह्मटलें. 'मला तें मनःपूर्वक आवडतें.'

एके दिवशीं दिवाणखान्यांतील मी चित्रें बघत होतें अशा वेळीं महाराज तेथें आले.

"कमले!' ते ह्मणाले 'तुला आतां जर कोणी पैसे दिले तर ते तूं आनंदानें घेशील काय?

मला या प्रश्नाचें मोठें गूढ पडलें.

मी ह्मटलें 'माझ्या हातांत कधींच पसा न आल्या-मुळें.मला आपल्या प्रश्नाचें उत्तर देववत नाहीं.'

आपला दर्जा व मानमरातब वगैरे कांहीं एक मनांत न आणतां त्यांनीं आपला हात माझ्या खांद्यावर ठेवला.

ते ह्मणाले 'तुला श्रीमंत होणें आवडेल काय? घरें-दारें, जमीनजुमला व पैसाअडका यांचा उपभोग घेण्याची तुला हौस आहे काय?'

'महाराज' मी ह्मटलें 'खरेंच विचारतां काय? मा-झ्यावर प्रेम करणारें एखादें मनुष्य मात्र मिळालें पाहिजे मग मला पृथ्वींतील एकंदर दौलत जरी कोणी अर्पण केली तरी ती देखील तुच्छच वाटेल.'

त्यांना माझ्या या भाषणाचें वाईट वाटलें.

ते ह्मणाले 'तुझ्यापुढें प्रीति व वैभव या दोन वस्तु जर मांडल्या तर तूं प्रीतीचाच स्वीकार करशील नाहीं बरें?'

'अर्थात' मी ह्मटलें 'माझ्या वयाला आज सतरा वर्षें झालीं, तरी देखील माझ्या ममतेचें असें एकही मनु-ष्य माझ्या दृष्टीस पडलें नाहीं; मग मला वैभवाहून प्रीति कशि बरें अधीक वाटणार नाहीं? माझें अंतः करण प्रेमाविषयीं आतूर झालें आहे.'

माझें भाषण ऐकतांच 'गरीब बिचारी' असे त्यांनीं उद्गार काढले. यावेळीं त्यांचें मन पूर्वी पेक्षां विशेष विचारांत गर्क झालें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी वाचनगृहांत गेलें, तेव्हां महाराजांची स्वारी तेथेंच बसली होती. त्यांनीं मला बघतांच स्मितहास्य केलें.

ते ह्मणाले 'कमले! तुला नेमून दिलेल्या वेळीं मला एथें रहावें लागलें याबद्दल मोठें वाईट वाटतें. कमले! तूं आज मला माफी कर. अगदीं जरूरीचें एक काम मला आज करावयाचें आहे, त्यांत तूं व्यत्यय आणणार नाहींस अशी माझी आशा आहे.'

मी तशीच मागें परतलें तें पाहून ते ह्मणाले 'छे-छे-कमले तूं बाहेर जाऊं नकोस. तूं पुढें असल्याखेरीज माझ्या हातून हें लिहिण्याचें काम होणार नाहीं. तूं येथेंच एखादें पुस्तक वाचीत बैस.'

त्यांच्या आज्ञेनुरूप मी कपाटांतील एक पुस्तक घेऊन तें वाचीत एका प्रशस्त उजेडाच्या खिडकींत बसलें. माझें सर्व लक्ष महाराजांकडे होतें. त्यांनीं आपल्या चौरंगाचे कप्पे उघडे करून त्यांतून कित्येक पत्रें काढलीं. तीं वाचून ते पुन्हां कांहीं लिहूं लागले. त्यांचें एकंदर लिहिणें आटपलें तेव्हां ते ह्मणाले,

'कमले!' या कागदावर साक्षी पाहिजेत, ह्मणून हिराबाईस व रत्नसिंगास इकडे धाडून दे. ते गेल्यावर पुन्हां तूं येथें ये.

तो कागद कसला व त्याच्यावर त्या दोघांच्या साक्षी कशाकरितां हाच विचार माझ्या मनांत घोळूं लागला. मी तशीच त्यांना बोलावण्याकरितां जाऊं लागलें. जातां जातां माझी दृष्टि सहजरित्या त्या चौरंगाकडे गेली. महाराजांनीं तो कागद बारीक अक्षरांनीं अगदीं खेंचून लिहिला होता.

पुढें तीं दोघेंहीं साक्ष घालून परत आलीं. मी त्यांच्या तोंडाकडे पाहिलें. ते गहन विचारांत गर्क अस-

त्याचें दिसलें, परंतु; त्यांनीं तो विचार मला कळविला नाहीं. मी नंतर पुन्हां वाचनालयांत गेलें, तेव्हां महाराज त्या चौरंगापुढें उभे होते. त्या चौरंगावर एक लहानसा चर्मपट होता. दोन तीन छापील कागद व एका शेंदरीरंगाच्या पुडक्यांत गुंडाळलेलीं पुष्कळ पत्रें होतीं. तो रंग मला पक्का आठवतो. तो थेट शेंदरी नव्हता. जरा फिका होता. दुसरें एक पुडकें गुलाबी दोरीनें बांधलेलें होतें. तिसऱ्यावर लालसर लाखेची मोहोर केली होती. त्यांनीं हीं तिन्हीं पुडकीं व नुकतेंच संपविलेलें पत्र अशीं सर्व घेऊन एकीकडे बांधलीं. पुन्हां त्यांनीं त्या पुडक्यावरील कागदावर पुष्कळ वाक्यें लिहिलीं पण तें काय होते तें मला माहीत नव्हतें. त्यांनीं तें पुडकें घट्ट बांधून दोरीचीं दोन्हीं टोंकें कापलीं व तीं लाखेनें बंद केलीं. माझें मन आश्चर्यानें चकीत झालें. त्या लहानशा पुडक्याची मी पक्की आठवण ठेवली होती. कितीही जिनसांत कां असेना, मी तें डोळे झांकून घेईन असें मला वाटत होतें. माझें वाचन चाललेंच होतें. माझी मध्येंच महाराजांकडे दृष्टी गेली, त्या वेळीं ते कांहीं विचारकरीत बसलेले दिसले, ह्मणून मी वाचनालयांतून बाहेर पडलें. पुढें थोड्याच वेळानें, हिराबाई मी रहात असे, त्या शिखरावरील खोलींत आली.

'कमले!' ती ह्मणाली 'महाराजांनीं तुला कांहीं अश्वासन दिलें काय?'

'त्यांनीं मला मुळींच अश्वासन दिलें नाहीं. आतां इतकें मात्र खरें कीं त्यांना माझें गाणें बरेंच आवडलें.

'तर मग तुला मी एक युक्ति सांगतें, त्या प्रमाणें वाग.'

'हो वागेन, पण युक्ति कसली?'

'महाराजांस तूं आपली खरी स्थिति सांग. ते फार उदार व कोमल मनाचे भले गृहस्थ आहेत. तुझी ही गायनवादनकला पूर्ण करणेस तुला दिल्ली सारख्या शहरीं राहिलें पाहिजे व मला वाटतें कीं जर तूं विचारशील तर, महाराज तुला आनंदानें मदत करतील.'

'हिराबाई' मी ह्मटलें 'मला या गोष्टीचा थोडा विचार केला पाहिजे.'

'विचार कर, पण कमले! पुन्हां अशी वेळ येणार नाहीं हें लक्षांत ठेव.'

हिराबाई निघून गेल्यानंतर तिच्या बोलण्याचा मी पुष्कळ वेळ विचार केला पण, अमुकच रीतीनें वागावें असा मनाचा निर्धार होईना. माझ्यांत व महाराजांत तिसऱ्याला न कळण्याजोग्या कांहीं गोष्टी असाव्यात, असें मला वाटूं लागलें, तथापि मी माझ्या पुढील स्थिति बद्दल आज संध्याकाळीं महाराजांकडे गोष्ट काढण्याचा निश्चय केला.

ते दिवशींची दोन प्रहर मोठ्या आनंदांत गेली. या वेळीं वारा शांत वहात होता. कांहीं फुलें पानें आणून पुष्पगुच्छ करण्याच्या हेतूनें मी बागेंत गेलें होतें. महाराज ही तेथें सहज फिरत आले. त्यांनीं मला पाहिलें नंतर माझ्या जवळ येऊन.

'कमले!' ते ह्मणाले 'तुला भेटावेसें वाटलें

ह्मणून मी तुझ्याकडे निघालों होतों, इतक्यांत तूंच येथें आलीस. बरें झालें. देवळांतील घंटानादाकडे मी लक्ष देऊन ऐकत होतों. त्या घंटा माझ्याशीं काय बोलल्या असाव्यात असें तुला वाटतें बरें! त्या 'पुष्कळवेळा-पासून—पुष्कळवेळापासून असें मला सांगूं लागल्या. ते शब्द ऐकतांच माझा उत्साह-भंग झाला. तथापि तुझें मधुर भाषण व स्मित हास्य हीं मला पुन्हां आनंद देतील अशी आशा वाटून मी तुझ्याकडे यावयाला निघालों होतों.'

'कमले' ते पुन्हां ह्मणाले.

'तुझ्याशीं चार शब्द मला बोलावेसे वाटतात. तूं ही मोकळ्या मनानें माझ्याशीं बोलून माझा शीण घालविशील ना?'

'माझ्या हातून होईल तितका प्रयत्न करून मी आपला शीण घालवीन.'

मला असे प्रसंग कधींच आले नव्हते. समोंवताल-च्या कुरणावरून पुन्हां घंटा-नाद ऐकूं येऊं लागला, त्यानें माझा देखील उत्साह-भंग केला. 'पुष्कळ-वेळापासून—पुष्कळवेळापासून' असें घंटा ह्मणतात असा मला भास होऊं लागला. पुन्हां घंटा-नाद ऐकून ते झर्कन माझ्याकडे वळले. व ह्मणाले.

'एकदां चुकून घडलेली गोष्ट पुन्हां दुरुस्त करतां येईल असें तुला वाटतें काय?'

'हो-हो-तसें होऊं शकेल पण चुकीची दुरुस्ती होण्यापूर्वी मरण मात्र येतां कामा नये.'

महाराज क्षणमात्र स्तब्धच राहिले. त्यांच्या प्रश्नांस

उत्तरें देत देत मी फुलें व पानें खुंटीत होतेंच. नंतर एकाएकीं त्यांचा गळा दुःखानें भरून आला. ते मोहें-वरून ह्मणाले.

'बाळे! कमळे! चुकीची पुन्हां दुरुस्ती करावी असा माझा उद्देश आहे. मला दुरुस्ति केलीच पाहिजे. मनावर दुःखाचें ओझें पडल्यामुळें तें आधींच उदास झालें आहे, तशांतून या घंटा तर अधिकच उद्विग्नता उत्पन्न करितात.'

त्यांनीं आपल्या हातांनीं माझें तोंड वर करून कपाळाचें चुंबन घेतलें,

ते पुन्हां ह्मणाले 'कमळे! खरोखरीच आज मी चुकीची दुरुस्ती करणार. या जवळच्या शहरीं माझ्या ओळखीचा एक वकील राहतो, तो घरीं आहे कीं काय हें मी आतांच घोड्यावरून जाऊन पाहून येतों. तो असल्यास जयसिंगास ही बोलावण्याकरितां सांडणी स्वार पाठवितों.

माझी स्थिति या वेळीं कशि झाली असावी बरें! माझा यांत कांहींतरी संबंध असला पाहिजे, अशि माझी पक्की खात्री झाली. मला धीर धरवेना. शेवटीं मी मोठ्या काकुळतीनें ह्मटलें.

' महाराज ' या सर्व गोष्टींसीं माझा कांहीं संबंध आहे काय ? '

ते माझ्याकडे उत्सुकतेनें पाहूं लागले. माझ्या प्रश्नास उत्तर देण्याचा देखील त्यांचा विचार होता, पण इतक्यांत काय झालें नकळे, ते माझ्याशीं एक शब्दही बोलले नाहींत. ते मला काय बरें सांगणार

होते? मी त्यांच्या एखाद्या मृत मित्राची मुलगी असून त्यांनीं माझ्या बापाचा घात केला व आतां ती चूक माझें अंगोपन करून हे दुरुस्त करणार, हें तर ते सांगणार नव्हते ना?

ते ह्मणाले.

'आज रात्रीं मी परत आल्यावर वाचनगृहांत तूं मला मुद्दाम भेट ह्मणजे तूं कोणाची कोण ती सर्व हकीगत कळेल.'

हकीगत कळेल, ह्मटल्यावर मला धीर कोठून असणार?

'महाराज!' मी ह्मटलें 'मला ती सर्व हकीगत आतांच सांगा. मी हात जोडतें. ती कथा ऐकण्याकरितां मी फार आतूर झालें आहें. आजपर्यंतचे दिवस निराशेंत गेल्यामुळें मला त्राण राहिलें नव्हतें तें आतां येईल.'

माझा चेहरा अगदीं बदलला. ओंठ इतके कांपूं लागले कीं, माझ्यानें पुढें एक देखील शब्द नीट सरळपणें बोलवेना. मी पुन्हां ह्मटलें,

'महाराज! मला अशा संशयांत ठेऊं नका. कृपा करून मला माझी हकीगत सांगा.'

'कमले! अशी उताविळ होऊं नको. सर्व कांहीं तुला आज रात्रीं कळेल. तुला सर्व सांगण्यापूर्वीं पुष्कळ गोष्टींविषयीं विचार केला पाहिजे मुख्यत्वें—अगोदर वकीलास भेटलेंच पाहिजे.'

'रात्रींपर्यंत मला कसा बरें धीर धरवेल! तुह्मी माझ्या आईबापाची व माझी सविस्तर हकीगत सांगणार ना?'

'कमले! विश्वास ठेव व धीर धर. मी तुला तें सर्व सांगणार.'

पुन्हां त्यांनीं माझ्या कपाळाचें चुंबन घेतलें. माझ्या नजरेशीं नजर लावून ते कांहींवेळ उभे राहिले व नंतर लवकरच ते तेथून निघून गेले. यावेळीं माझ्या मनांत इतका आनंद, भीति व घोटाळा उत्पन्न झाला कीं, मी तात्काळ खालील गवतांत पडून माझें तोंड झांकून घेतलें. मी ती घटका कधींच विसरणार नाहीं. मनाला झालेला उद्वेग, भय व आशा यांपैकीं कोणती गोष्ट ते मला सांगणार होते व माझ्या कानीं काय पडणार होतें ? तुझे आईबाप जिवंत आहेत. तूं चांगल्या कुळांत निपजलीस, तुझ्या आवडीप्रमाणें तुला घर मिळालें आहे. तुझे मित्र आहेत, आप्तइष्ट आहेत असें ते मला सांगणार कां याच्या अगदीं उलट—छे: पण माझ्यानें त्याचा उच्चारही करवणार नाहीं. मला तें सोसवणार नाहीं. मला मोठी भीति वाटून मी माझें तोंड झांकून बसलें होतें.

माझ्या मनांत मी विचार करीत होतें इतक्यांत, घोड्यांच्या टापांचा आवाज मला ऐकूं येऊं लागला ह्मणून मी पाहिलें तों ते महाराज आपल्या तबेल्यांतील एका घोड्यावर बसून जात होते. ते अंबराईंत दृष्टी आड होईतोंपर्यंत मी त्यांच्याकडे पहात होतें. ते अगदींच दिसेनात तेव्हां माझा उपाय खुंटला.

सरते शेवटीं मी माझी गोष्ट ऐकणार असें मला वाटलें. पण ती ऐकायला अजून कांहीं तास गेले पाहिजे होते. त्या दुःखाच्या मला वेदना सोसवेनात. ‘ माझी आई जिवंत आहे व मला राहायला-कोठेंही कां होईना-सत्तेची जागा आहे ’ या दोन गोष्टीच

ऐकण्याची मला उत्कंठा लागली होती. प्रेमविरहित, आनंदशून्य व दुःख परिपूर्ण असें जें माझें आयुष्य त्यांत फेरबदल होऊन मला सुखाचे दिवस दिसतील, अशी माझी बळकट आशा होती.

ती वेळ दोनप्रहरची होती. त्या वेळच्या मंद-मंद वाहणाऱ्या वायूची व पुष्पांच्या सुवासाची मला मरेपर्यंत आठवण राहील. मी थोर व चांगल्या कल्पना मनांत आणून कशाप्रकारें मनोराज्य करीत तृणांकुरावर बसलें होतें, त्याचें मला पक्कें स्मरण आहे. शेवटीं मला घरदार व आप्तमित्र असून मी इतरांसारखीच आहे ह्मणावयाची. घरीं चैन पडणार नाहीं ह्मणून मी तिकडे गेलेंच नाहीं. उघड्या हवेंत डुलत असलेल्या वृक्षछायेंतच बसणें मला विशेष आवडलें. माझें मन भारी उत्कंठित झालें होतें.

*　　*　　*

अजून कांहीं तास-छेः कांहीं घटका व पळें गेलीं पाहिजेत, मग मला माझी हकीगत कळणार, असा विचार करीत मी बागेंत हिंडत होतें. नंतर मी अंबराईतील बंगल्याकडे गेलें. येथूनच नदीला वाट गेली होती. बंगल्याच्या कट्ट्यावर उभी राहून मी नदीकडे पाहिलें. त्या ठिकाणीं कांहीं मनुष्यें एकत्र जमून हातांत दोरखंडें घेऊन कांहीं करीत होतीं. पण तीं कोणत्या उद्योगांत होतीं तें मला समजलें नव्हतें. तीं आपापसांत हळूहळू बोलत होतीं. मी तिकडे लक्षच दिलें नाहीं. फक्त कांहीं वेळ तो देखावा दुरूनच पाहून मी संध्याकाळीं घरीं आलें.

---

# प्रकर्ण ४ थें.

—:*:—

## आशाभंग.



मी वाड्याजवळ आलें आणि पहातें तर, पटांगणांत कांहीं मंडळी जमली होती. मला मोठें आश्चर्य वाटलें. पश्चिमेकडील आकाश अगदीं निरभ्र होतें व सूर्याचा तो सायंकाळचा तांबूस प्रकाश वाड्यावर, चौसोपीवर व बागेंत वगैरे सर्वत्र पसरला होता. मी तो प्रकाश पहात उभी होतें, इतक्यांत हिराबाई माझ्याकडे मोठ्या गडबडीनें आली. ती घाबरून गेली होती.

'कमले!' ती म्हणाली 'तुला ठाऊक आहे? तूं ऐकलेंस काय?'

तिचे हे प्रश्न ऐकतांच माझा धीर खचला. मला वाटलें कीं, माझ्यावरच दुःखाची ही गदा आदळणार! पण कशा तऱ्हेचें दुःख येणार तें मला कळेना. मी एका झाडाला टेंकून उभी होतें, ती तेथेंच आपली मान टेंकून उभी राहिलें.

'कमले' ती म्हणाली 'उगी राहण्याची ही वेळ नव्हे. चल—मला वाटतें कीं खात्रीनें ते तुझ्याशीं दोन शब्द बोलतील

'हिराबाई, मी म्हटलें' माझ्याशीं कोण? कोण बोलणार दोन शब्द?'

' महाराज. '

' कमले! तुला अजून पत्ताच नाहींवाटतें. ' ती पुन्हां ह्मणाली.

' कसला ? '

कसला ह्मणजे? महाराज घोडा उधळून नदींत पडले व त्यांची आतां वाचा बंद असून अगदीं प्राणां-तुक स्थिति झाली आहे. '

मी घाबरून गेलें व ह्मटलें.

' काय महाराज प्राणांतुक असून वाचा बंद झाली? ' हाय! हाय! परमेश्वरा! काय हा प्रसंग!!

सूर्याचा तो तांबूस प्रकाश, व गारेगार वृक्ष-छाया हीं मला त्रासदायक वाटूं लागलीं. मी मूर्च्छा येऊन धाडकन् खालील गवतांत पडलें. दुःख व भय या दो-होंचा परिणाम माझ्या मनास जाचूं लागला. महाराज आज रात्रीं मला हकीगत सांगणार ह्मणून मी धीर धरून होतें, पण त्यांची वाचाच गेली. मग कुठली गोष्ट नी काय? मी कांहीं वेळानें सावध झालें व उठून उभी राहिलें. माझी अशी दशा पाहून हिराबाईच्या डोळ्यांतही पाणी आलें तथापि, रागाचा आव घालून ती ह्मणाली.

' तुझी कांहीं मला मदत होईल ह्मणून मी इकडे आलें तर तूं आपली तुझींच रडगाणीं गात बसली आहेस हें चांगलें नव्हे. कमळे! चल. तुला माझ्या बरोबर आलेंच पाहिजे. '

' मी येतें पण आतां काय उपयोग ? '

'मुली!' ती ह्मणाली 'तुझाच तेथें मोठा उपयोग आहे. महाराजांचें व तुझें पूर्वी पुष्कळ संभाषण झालें आहे, तेव्हां, ते काय ह्मणतात हें आह्मांपेक्षां तुला चांगलें कळेल असें आह्मांस वाटतें.'

मला थोडा धीर आला. मी हिराबाईचा हात घट्ट धरला. महाराज मरणोन्मुख नसावेत अशी माझी खात्री झाली. मला माझी हकीगत सांगितल्यावांचून महाराज मरणार नाहींत, असें मला वाटत होतें. मी त्यांच्या वचनावर विश्वास ठेवून होतें पण, त्याचा आतां काय उपयोग? कारण महाराज जास्तच आजारी असल्याचें मला कळलें.

मी अशी अनाथ, असून माझ्या इच्छा अशा भयंकर रीतीनें दडपण्याची वेळ आली—खरोखरीच अशी निराशा होण्यापेक्षां मरण आलेलें पत्करलें—अहाहा! मी काय काय मनोराज्यें केलीं? मला माझे आईबाप लवकरच भेटतील. ते मला प्रेमानें पोटाशीं घट्ट आवळून धरतील व वात्सल्य प्रेमानें माझें चुंबन घेतील, माझ्यानें तें पहाववणार नाहीं. मग मी त्यांनां आनंदाश्रूंनीं न्हाऊं घालीन अशा एक का दोन हजारों कल्पना माझ्या मनांत आल्याहोत्या पण, त्या सर्व आतां पाण्यांत मातीचें ढेंकूळ विरघळतें तद्वत विरघळून गेल्या.

मी महाराजांकडे निघालें. हिराबाई बरोबर होतीच. तिला मी महाराज कोठें व कसे पडले ह्मणून विचारलें तेव्हां ती ह्मणाली:—

प्रथम ही कोणालाच बातमी नव्हती. पुलावरून येण्याचें सोडून महाराजांनीं आपला घोडा नदींतील खडकावरून

आणला, तेव्हां घोड्याचा पाय निसरून ते खाली पडले असावेत असा लोकांचा अदमास आहे—कसेंही ह्मटलें तरी तें पडले एवढी गोष्ट खरी—ते निदान दोन तास तरी पाण्यांत पडले होते, असें वैद्याचें मत आहे. महाराज खाली पडल्यानंतर घोडा उधळला. तो भिजून चिपचिपीत झाला होता. तो तसाच उडत बागडत घरीं आला, तेव्हां मात्र आमच्या मनांत वाईट कल्पना आली. लगेच महाराजांच्या शोधार्थ मी कांहीं चाकर माणसें पळविली. त्यांना एक मजुरदार वाड्याकडेच धांवत येत असलेला भेटला. त्यानें महाराज पाण्यांत पडल्याची त्यांना बातमी दिली. नंतर ते सर्व नीट नदीकडे गेले, व पहातात तों त्यांना बरीच दुखापत झाली होती. उगीच कोठें प्राणाची टुकटुक होती ह्मणून, त्यांनीं त्यांना सावकाश उचलून वाड्यांत आणलें. वैद्यराजास ताबडतोब आणविलें. ते अद्याप महाराजांजवळच आहेत. महाराजांची आतां आशा नाहीं, असें ते ह्मणतात. त्यांना बरें करण्याचें काम मानवी शक्ति बाहेरचें आहे असें त्यांचें मत आहे.

प्रथम हिराबाई खोलींत गेली. नंतर वैद्याशीं कांहीं बोलत ती बाहेर आली. यावेळीं महाराजांची दृष्टी फारच खोल गेली होती.

'हिराबाई' वैद्य ह्मणाले 'यांची आतां कांहीं आशा नाहीं. आमचा इलाज अगदीं खुंटला. आतां आह्मी येथें रहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं, तथापि आपला आग्रहच असल्यास मी राहतो.

रघुनाथसिंग' ती ह्मणाली—' कांहीं होवो

तुह्मी आजचा दिवस इकडे रहाच. आप्तइष्टांपैकीं जवळ कोणीच नसून महाराज केवळ अनाथवत् पडले आहेत. त्यांच्या अंतकाळीं आह्मी तरी जवळ राहूं या. '

' काय? त्यांचे आप्त-इष्ट कोणीच नाहींत? '

' दूरचे-ते फारच दूरचे आहेत. '

' पण ते तरी इकडे आहेत ना? '

' छेः, इकडे नव्हे या देशांतही नाहींत. हल्लीं ते कोठें असतात नकळे. '

वैद्यांनीं खोलींत महाराजांकडे पाहिलें. ते कांहीं बोलण्याचा प्रयत्न करीत होते, तेव्हां **रघुनाथसिंग** ह्मणाले.

' महाराज कांहीं सांगण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यांना काय पाहिजे तें तुह्मांला माहीत नाहीं काय? '

' नाहीं-तें आह्मांला कसें कळणार? '

' त्यांनीं आपलें मृत्युपत्र तरी केलें आहे काय? '

' होय त्यांनीं तें आजच सकाळीं केलें आहे. त्याच्यावर माझी व **रत्नसिंगाची** साक्ष आहे. '

' तर मग, ते काय बरें बोलण्याचा यत्न करीत असतील? '

' वैद्यराज ' मी मध्येंच ह्मटलें ' बहुतकरून ते मला बोलवा असें ह्मणत असतील, कारण ' आज रात्रीं वाचन गृहांत तूं मला भेट, तुझ्याशीं मला कांहीं महत्वाच्या गोष्टीवर बोलावयाचें आहे ' अशी त्यांनीं मला आज दोनप्रहरींच सूचना दिली होती, त्यांना माझी हकीगत माहीत आहे व ती सर्व रात्रीं सांगण्याचें त्यांनीं मला वचन दिलें होतें. '

'बिचारे मुली!' रघुनाथसिंग ह्मणाले 'तुझी ती हकीगत आतां त्यांच्याबरोबर परलोकांत जाणार त्यांना तुझी तेथें बिलकूल आठवण होणार नाहीं.'

माझी अगदीं निराशा झाली तथापि, मी नम्रतापूर्वक ह्मटलें. 'वैद्यराज! ते आज आपल्या हातून घडलेल्या चुकीची दुरुस्ती करणार होते. त्यांना कसेंही करून माझी हकीगत सांगेतोंपर्यंत वांचवा.'

'मुली!' ते ह्मणाले 'आतां ही वेळ नव्हे. चुकीची दुरुस्ती आतां ते कशी करणार? इतकें कांहीं नाजुक काम होतें काय?'

'माझा ते जन्मवृत्तांत सांगणार होते. मला माझें पुरतें नांव देखील माहीत नाहीं. महाराजांना तें ठाऊक आहे. माझी सविस्तर माहिती असलेले काय ते एकटे महाराजच या सर्व दुनियेंत आहेत.'

'असें काय? तर मग खोलींत ये पाहूं. कदाचित् तुझ्याविषयींच बोलण्याचा ते प्रयत्न करीत असतील.'

नंतर वैद्यराजासह मी खोलींत महाराजांच्या बिछान्याजवळ गेलें. हिराबाई आह्मांमागून आली.

ती खोली उंच, भव्य व सुशोभित केलेली होती. महाराज परदेशांत होते तेव्हां, मी याच खोलींत असे. मला त्याची चांगली आठवण आहे. येथून बाहेरचा देखावा फारच मनोहर दिसत होता. तेथून त्याच अंतरावर आकाश पृथ्वीस लागल्या प्रमाणें दिसत होतें; कांहीं सुंदर तसबिरी भिंतीवरून लटकत होत्या; त्या सर्वांत काश्मीर देशामधील पर्वतांचे व नद्यांचे देखावे काढले होते. राजकीय पद्धतीच्या मऊ

मऊ अशा पराच्या गादीवर महाराजांस निजविलें होतें. त्यांची मला प्रथम ओळख देखील लागली नाहीं. त्यांच्या सकाळच्या व आतांच्या चेहऱ्यांत विलक्षण फरक पडला होता. त्यांच्या निळसर डोळ्यांवर झांपड पडली होती, व तोंडावर प्रेतकळा आली होती. हाय! हाय!! त्यांना पहातांच माझें अंतःकरण कां बरें विरघळलें असावें? रघुनाथजी व हिराबाई यांची मला स्मृति राहिली नाहीं, माझी सविस्तर हकीगत माहीत असलेले व मृत्यूची मार्ग प्रतिक्षा करीत असलेले, जे सरदार जगतसिंग त्यांच्याशिवाय मी सर्व कांहीं विसरलें. मी त्यांच्या अगदीं शेजारीं बसलें व धळधळ रडूं लागलें तेव्हां, हिराबाई ह्मणाली—

'कमले! हें तूं काय आरंभलें आहेस? महाराजांस तुझ्या या रडण्यानें त्रास नाहीं कां होणार?'

त्यांनीं तें बोलणें व माझें नांव ऐकलें असावें कारण त्यांनीं लगेच आपले डोळे उघडले. ते मोठ्या उत्सुकतेनें व प्रेमानें माझ्या तोंडाकडे पाहूं लागले. त्यांची ती अंतकाळची नजर मी माझे डोळे झांकेपर्यं कधींही विसरणार नाहीं. माझें मन दुःखानें विव्हळ झालें होतें; लगेच मी माझें तोंड तिकडे फिरविलें. त्या वेळचा तो देखावा पाहून, कोणाचें अंतकरण विरघळणार नाहीं बरें!

वैद्यराज ह्मणाले 'तुझी त्यांना ओळख आहे वाटतें?' 'त्यांच्याशीं कांहीं बोल पाहूं.'

मी खालीं वाकलें व म्हटलें ' महाराज ! तुम्ही मला ओळखतां काय ?

खरोखरीच त्यात तिळमात्र शंका नव्हती. कारण त्यांनीं आपली दृष्टी माझ्याकडे फिरविली व संज्ञेनें होय म्हटलें. त्यांच्या तोंडावर आनंदाची किंचित् झांक मारूं लागली. माझ्या हातांत हात घालण्याच्या इच्छेनें त्यांनीं तो वर केला, पण शक्ति नसल्यामुळें लगेच तो बिछान्यावर पडला. मला हें पाहवलें नाहीं. त्यांचा तो हात उचलून मी आपल्या मांडीवर घेतला. तो अगदीं गार होता, त्यांना माझी ओळख लागली. माझ्याशीं दोन शब्द बोलण्याचा हेतूनें ते आपले ओंठ हालवूं लागले पण, शब्दच फुटेना. आम्ही सर्वजण त्यांच्या भोंवतीं होतों.

सरतेशेवटीं मी धीर करून त्यांच्या अंगावर अंतराळी कलंडलें. त्यांच्या कानाशीं माझें तोंड लावलें व म्हटलें ' महाराज ! ' ' तुम्हाला इतका कसला त्रास होतो ? तुम्ही माझ्यासंबंधीं—या कमलेसंबंधीं—कां बोलण्याचा प्रयत्न करीत आहां ? मी कोणाची कोण हें तुम्हांला सांगावेंसें वाटतें काय ? '

त्यांनीं आपल्या हातून खूप प्रयत्न केला पण, शब्दच फुटेना, फक्त ओंठ मात्र हालत. कांहींवेळ गेल्यानंतर, पुन्हां त्यांनीं बोलण्याचा यत्न केला पण व्यर्थ. त्यांना असह्य श्रम मात्र झाले. नंतर ते बिछान्यावर स्वस्थ पडले, तथापि त्यांच्या निराशेहून माझी निराशा फार मोठी होती. महाराजांच्या तोंडून जर माझी कीमत कळणार नाहीं, तर मग मला या जगांत कुणाचाच

आधार रहाणार नाहीं व मला माझ्या आयुष्याचे सर्व दिवस रडून घालवावे लागतील असें वाटलें. मी वरचेवर येणारे रडण्याचे हुंदके मनांतल्या मनांत दाबून रघुनाथजीकडे वळलें.

'रघुनाथजी' मी ह्मटलें 'महाराजांस शब्द फुटण्याजोगें एखादें देखील औषध तुह्मांजवळ नाहीं काय?'

'नाहीं. महाराज चांगले शुद्धीवर आहेत पण त्यांना आतां बोलतां ह्मणून येणार नाहीं.'

मी निराशेनें गयावया करूं लागलें. मला वाटलें खरोखरीच मी मेल्यानंतर परमेश्वर देखील इतका निष्ठूर होईल कीं तो माझ्या प्रार्थनेकडे क्वचित्च लक्ष देईल. मी महाराजांकडे पहात होतेंच. मला कांहीं नीटसें लक्षण दिसेना, मग मी वैद्यराजांकडे पाहिलें तेव्हां ते ह्मणाले.

'तूं माझ्याकडे वरचेवर डोळ्यांत आसवें आणून बघतेस याचें मला फार वाईट वाटतें. तुला पुष्कळ त्रास होतो.'

'त्रास?' मी ह्मटलें 'मृत्यूचा देखील मला इतका त्रास होणार नाहीं.'

माझें हें भाषण महाराजांस ऐकूं गेलें असावें, कारण त्यांनीं पुन्हां एकवार बोलण्याचा यत्न केला व आपला हात माझ्या अंगावर टाकला.

हाय! हाय! त्यांचा हात माझ्या तोंडाकडे व केसाकडे कां वरें गेला? त्यांच्या मनांत माझें चुंबन घ्यावेंसें तरी आलें नसेल ना? माझ्या डोळ्यांतून अश्रु चाललेच होते. ते त्यांच्या [illegible]

मला त्यांनीं ते दिवशीं रात्रीं माझी हकीगत सांगण्याचें वचन दिलें होतें. महाराज माझ्याशीं एकच शब्द बोलतील तर, तेवढ्यानें मला एकंदर जग परतल्या प्रमाणें होईलसें वाटलें, पण काय करणार ?

नंतर माझी मलाच लाज वाटली. लोक मला अप्पलपोटी ह्मणतील असें वाटूं लागलें. माझ्याप्रमाणें दुःखानें तळतळ करीत असलेलें, तेथें एकही मनुष्य नव्हतें तथापि, मी तें सर्व दुःख गिळलें. प्रीतीचें माणूस जवळ कोणी नव्हतें, अशा वेळीं महाराज आयुष्याचे शेवटचे दिवस—छेः—तास व घटका घालवीत होते.

महाराजांच्या थंडगार व निशक्त हाताचें मी चुंबन घेतलें व त्यांचे अस्ताव्यस्त झालेले केश, मी हातानें साफ केले. मी माझा गुलाबी गाल त्यांच्या पांढऱ्या फटीक गालावर टेंकला. तेव्हां रघुनाथजी हिराबाईस ह्मणाले.

'महाराज या मुलीचे कोण ?'

'कोणी नव्हेत.'

महाराजांना हें भाषण ऐकूं गेलें नाहीं. मी त्यांच्या पायाशीं मांडी घालून बसलें, तेव्हां ते अगदीं स्तब्ध पडले होते. त्यांच्या डोळ्यांतून सारखी पाण्याची धार चालली होती. ती पहातांच

'रघुनाथजी' मी ह्मटलें 'पाहिलेंत काय ? महाराज घळघळ रडताहेत. त्यांनीं आपलें भाषण ऐकलें. खास ऐकलेंच. एरवीं ते अशीं दुःखें काढणार नसते.

महाराजांनीं नंतर आपला हात माझ्या अंगावर टाकला. माझें मस्तक आपल्या उराशीं धरलें. त्यांनीं

माझ्या कानांत कांहीं सांगण्याचा यत्न केला, पण त्यांचा मला एक देखील शब्द समजला नाहीं. फक्त ध्वनि घुरमटत असलेला मात्र ऐकूं आला. ते चटकन् उठून बसले पण त्यांना बरेच श्रम झाले असावेत. त्यांच्या तोंडावर तेजी आली. 'प्रिये पद्मिनी! पद्मिनी! असें ते दोन वेळ आकांतानें ह्मणाले व एखाद्या अपूर्व वस्तुकडे पहात असल्याप्रमाणें त्यांनीं आपली दृष्टी केली व धाडकन् ते माझ्या मांडीवर पडले, तेथेंच त्यांचा प्राण गेला.

हाय! हाय! माझी शेवटची आशाही महाराजां बरोबरच मृत्तिकेंत मिसळून जावयाची होती, ती मिसळली व माझा आशाभंग झाला.

## प्रकर्ण ५ वें.

### पुढील हकीगत.

रघुनाथजींची माझ्यावर पूर्ण कृपा होती. त्यांना मी माझी गोष्ट सांगितली, तेव्हां त्यांनीं त्या संकटसमयीं माझ्यावर दया केली. अशा त्या घोरतर प्रसंगीं मला आनंदीत ठेवण्याविषयीं त्यांनीं फार प्रयत्न केले.

'कमले' ते ह्मणाले 'फार वाईट गोष्ट झाली. महाराजांच्या मनांतून खचीत तुझ कांहीं सांगावयाचें होतें व तसें जर घडतें तर मग, हें सर्व जग तुझ

महाराजांच्या बिछान्याकडे मी दीनवाणी उभी राहिलें तेव्हांच, मला वाटलें कीं, मला आतां पुरतें नांवही कळणार नाहीं व ज्या घरांत मी लहानाची थोर झालें तें घर मला सोडावें लागेल.

माझी आई जिवंत असल्यास तिला माझी व मला तिची ओळख नव्हती, याचें मला विशेष दुःख झालें. प्रथम कांहीं वेळ माझा असा तर्क होता कीं महाराज वकीलाला भेटले असतील व त्यांनीं माझी थोडीबहुत हकीगत त्यांना सांगितली असेल, पण, शेवटीं मला असें कळलें कीं तसा प्रकार मुळींच घडला नसून वकीलाकडे जात असतांच मध्यें हा अपघात झाला.

स्मशानांत नेण्यापूर्वी, मी महाराजांचें शेवटचें दर्शन घेतलें, तेव्हां त्यांची मूर्ती डोळे झांकून स्वस्थ पडली होती. त्यांचा चेहरा हांसरा होता. त्यांच्या मनांतील सर्व मनोविकार कायमचे नष्ट झाले होते. दुःख व सुख या दोहोंच्याही भोक्तृत्वांतून ते सुटले होते. स्त्रियांचें सौंदर्य व प्रेम यांचा त्यांना तिळमात्र त्रास होण्यासारखा नव्हता, प्रीतीनें अगर दुःखानें त्यांच्या डोळ्यांतून इतःपर एक बिंदूही गळण्याजोगा नव्हता व त्यांच्या त्या मिटलेल्या ओठांतून दुःखाचा सुस्कारा किंवा प्रेमाचा एखादा शब्द कधींच निघण्यासारखा नव्हता.

मला त्यांचाच आश्रय होता. त्यांनींच मला लहानाची थोर केली होती. माझ्या काळजीचीं अगर ममतेची म्हणून जीं जीं माणसें मला वाटत, त्या सर्वांत महाराजांचें प्रेम माझ्यावर विशेष होतें. माझी जन्मकथा "[illegible] होती [illegible] माझ्या" पोटांत

गदगदून आलें. मी महाराजांच्या अगदीं प्रेताजवळ बसलें व त्यांच्या विकल मुखाचें चुंबन घेतलें. मी मुका घेतांच ते गालातल्या गालांत हासल्याचा मला भास झाला.

पुढे जयसिंग आले, तेव्हां मी त्यांना महाराजांनीं मला दिलेल्या वचनाचा वगैरे सर्व मजकूर कळविला. माझा वृत्तांत ऐकून ते जरा घोटाळ्यांत पडले. ते म्हणाले

‘ मला यांतील जरी कांहींच इंगित कळत नाहीं, तथापि, मी तुला एवढें मात्र आश्वासन देतों ’

‘ तें कोणतें ? ’

‘ या ठिकाणचे सर्व कागद माझ्याच सहीनें जात असतात, तेव्हां त्यांत जर तुझ्याविषयीं महाराजांनीं कांहीं लिहिलें असेल तर, मी तुला तें अवश्य कळवीन. ’

मी त्यांचे आभार मानले एवढेंच, बाकी माझ्या मनाला कांहीं समधान झालें नाहीं. महाराजांच्या मृत्युपत्रांत माझ्याविषयीं कांहीं लेख असतील ही गोष्ट साधारण—साधारण कां—बरीच असंभवनीय वाटली.

महाराजांचा उत्तरविधी आटपल्यावर सर्व मंडळी परत वाड्यांत आली व त्यांचेंमृत्युपत्र पाहूं लागली. तें कोठेंच मिळेना. मग मात्र सर्व एकच गर्दी उसळली. मृत्युपत्रच केलें नव्हतें म्हटल्यास तें विश्वासनीय वाटेना. कारण हिराबाईनें व रत्नसिंगानें त्याच्यावर साक्षी घातल्या होत्या. महाराजांनीं‘ हें माझें मृत्युपत्र आहे, याच्यावर तुम्ही आपल्या साक्षी घाला ’ असें त्यांना सांगितलें होतें प्रथम त्यांनीं आपली सही केली व नंतर [illegible] दोघांच्या [illegible] घेतल्या [illegible]

हिले होतें हें त्यांनीं पाहिलें नव्हतें. महाराजांदेखत मृत्युपत्र वाचून पाहणें त्यांना आवडलें नाहीं.

वाचनालय, निजायची खोली, दिवाणखाना वगैरे संभवनीय तितकीं सर्व स्थळें, मृत्युपत्राकरितां शोधलीं पण, कांहिमात्र उपयोग झाला नाहीं.

' जयसिंगजी ' मी ह्मटलें ' त्यांनीं तें आपल्या स्वतःच्या हातानें लिहिलेलें मृत्युपत्र व इतर कांहीं पत्रें एकत्र गुंडाळून ठेवलीं आहेत. '

पुष्कळ शोध केला तथापि तें पुडकें कांहीं मिळालें नाहीं. कचऱ्याच्या टोपलींत कांहीं पत्रें पडलीं होतीं पण, तीं सर्व फाडून चूर चूर केलेलीं अशीं होतीं. त्या पत्रांतही महाराजांच्या हातचीं कांहीं पत्रें होतीं. ते चूर धुंडाळतां धुंडाळतां त्यांतच त्या चर्मपत्राचे चूर पडलेले दिसले, तेव्हां सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें.

वकील ह्मणाले ' या गोष्टीचा उलगडा आतां अशा रीतीनें करावा लागला.

' कसा ' जयसिंग ह्मणाले.

' महाराजांनीं प्रथम मृत्युपत्र केलें असेल व कांहीं पत्रेंही लिहिलीं असतील पण पुन्हां कांहीं वाटून त्यांनीच तीं नंतर फाडलीं असावीत. '

' हो अशी कल्पना केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. '

जयसिंग कांहीं दिवस वाड्यांत होते. त्यांना माझ्याशीं बोलणें फार आवडे. बीन वाजवून गाणें ह्मणायला ते मला वरचेवर बोलावीत असत, त्यांच्याशीं

[illegible]

एके दिवशीं आह्मी दोघेच दिवाण खान्यात होतों. अशावेळीं—

'जयसिंग!' मी ह्मटलें 'महाराजांच्या पैशा अडक्याची व इष्टेटीची आतां काय बरें वाट होणार!

'ती सर्व त्यांच्या भाऊबंदास मिळणार.'

'त्यांना भाऊबंद आहेत ह्मणावयाचे तर.'

'होय—आहेत, पण ते फार दूरचे. महाराजांच्या आतेची ताराबाई ह्मणून एक मुलगी आहे. तिचाच हक्क महाराजांच्या इष्टेटीवर ठरतो. ताराबाई ही घरची श्रीमंत पण, विधवा स्त्री आहे. तिला कुमार-सिंग नांवाचा एक तरुण मुलगा आहे. तोच हल्लीं तिकडे घरची व्यवस्था पाहतो. ही मंडळी उज्जयनीस असते.

कुमारसिंग हें नांव मला भारीच आवडलें.

'जयसिंग' मी ह्मटलें 'उज्जयनी सारखें शहर सोडून ते उद्यां इकडे येऊन राहतील काय? त्यांना तुवरगड हें ठिकाण आवडेल काय?'

'त्यांना इकडे रहावेंच लागेल असें मला वाटतें.'

'बरें पण कुमारसिंग विवाहित आहेत काय?'

'ते अद्याप अविवाहितच आहेत तथापि, त्यांचें मन तेथीलच एका श्रीमान् कन्येवर जडलें आहे अशी दाट वंदता आहे.'

'असें काय? तर मग मला हें ठिकाण सोडावेंच लागणार?'

इतकेंच सांगणें आहे कीं तूं, ताराबाई येईपर्यंत कोठेंच जाण्याचा विचार करूं नकोस.'

कांहीं वेळ थांबून ते पुन्हां ह्मणाले.

'कुमारसिंग आज काळच्या नामांकित मनुष्यांत मोडतो. ताराबाईची त्याच्यावर खूप प्रीति आहे. ती त्याला नकळत कोणतीही गोष्ट करीत नाहीं व तोही तिच्या आज्ञेविरुद्ध कधीं वागत नाहीं. तो मोठा हुशार आहे, दयाळु आहे. त्याला तुझी कींव येईल. व तो तुझी योग्य ती व्यवस्था करील.'

ते पुन्हां कांहीं वेळ स्तब्ध राहिले व ह्मणाले—

'तुझ्या एकटीच्या प्रयत्नानें तूं जगांत उदयास येणार नाहींस. जगांत सुख व्हावें असें तुला वाटत असल्यास ताराबाईची मैत्री संपादन कर. इतके दिवस तूं इकडे आहेस, तेव्हां आजच घाई करून बाहेर जाण्याचें कारण मला दिसत नाहीं.'

मला मग जयसिंगाच्या इच्छेविरुद्ध वागणें इष्ट वाटेना. मी तुवरगड येथेंच रहावें असें ठरलें. मलाही त्याबद्दल वाईट वाटलें नाहीं, कारण तें ठिकाण मला मनःपूर्वक आवडलें होतें. तटाच्या भिंतींत एक भव्य कमान होती. तेथें मी मग बीन वाजवत व त्या सुरावर गात बसूं लागलें.

पुढें कांहीं दिवसांनीं जयसिंगाकडून निरोप आला कीं, ताराबाई परिवारासह वर्तमान तेथें अदमासें दिपवाळीच्या सणास येतील. तसबिरी, पुतळे, उत्तम उत्तम नक्षीदार वस्तु वगैरे दररोज त्यांच्याकडून कांहीं

ना कांहीं सामान येऊं लागलें; पुढें लवकरच तुवर-गडाला अगदीं निराळी शोभा आली

ताराबाई आतां लवकरच येणार हीच गोष्ट लोक जिकडे तिकडे बोलूं लागले. वाड्यांत एक कुणबीण होती, तिनें ताराबाईला पाहिलें होतें. ती सांगूं लागली कीं, 'ती बाई राजकीय थाटाची व फारच सुंदर आहे. ती फार अभिमानी आहे. लोकांनीं आपल्या आज्ञेंत वागावें असें तिला वाटतें. हा जुना वाडा ती आल्यावर असाच रहाणार नाहीं.'

आश्विन महिना आला, तेव्हां हिराबाईस उज्जयनीहून परस्पर पत्रें येऊं लागलीं. त्यांत काय काय लिहिलें होतें?

'वाड्यांतील प्रत्येक खोली चांगली उबदार असली पाहिजे, कारण ताराबाईला थंडी बिलकूल सोसत नाहीं. फुलांचे झुबक्यांचे झुबके जागोजाग कुंड्यांतून प्रफुल्लित असले पाहिजेत, ताराबाईसाहेबांना त्यांशिवाय चैन पडत नाहीं. बाईसाहेब अमुकच दिवशीं गडावर दाखल होतील ह्मणण्याचा नेम नाहीं; तथापि, दिवाळीच्या आदले दिवशीं अगर तेच दिवशीं तरी, त्या तेथें येतील असा अदमास आहे.

ताराबाईच्या येण्यानंतर माझ्या आयुष्याचा दुसरा अंक सुरू होईल. पहिल्यासारखें मग कांहीं रहाणार नाहीं, ह्मणून धीर धरून शांत मनानें मी त्यांची मार्गप्रतिक्षा करीत होतें.

# प्रकरण ६ वें.

## नवीन मालक.



दिपवाळी उद्यांवर ठेपली तरी ताराब आल्या नाहीत. त्यांच्याकरितां सर्व तयारी केली होती. बहुतेक खोल्यांतून आगट्या पेटवून उबारा राखला होता. जागोजाग फुलांच्या कुंड्या ठेवल्या होत्या, त्यांचा घमघमाट सर्व वाड्यांभर पस-ला होता. प्रत्येक वस्तु अगदीं चकचकीत व नवीकोर ाटत होती.

मला वाटलें ताराबाईसाहेब फारच दैवाच्या असल्या पाहिजेत. दिपवाळीचा दिवस उजाडला. थंडी ़डक पडली होती. जमीन, झाडें, फुलें, वेली वगैरे ाहेरील प्रत्येक वस्तु दवानें डवडवली होती. मी शी थंडी पूर्वी कधींच पाहिली नव्हती. हा देखावाही ोठा रमणीय होता. हिरव्यागार पानांतुन जांबाचीं ळें झळकत होतीं. कोमळ तृणांकुरावर सूर्याचा लाल-ार प्रकाश पडला होता. डोंगराच्या कडद्यावरील कचकीत पाषाणावर हा प्रकाश पडल्यामुळें तो प्रदेश त्नपुंजाप्रमाणें शोभत होता.

दिपवाळीच्या दिवशीं पहांटेस एक स्वार पत्र घेऊन ाला. त्या पत्रांत खालील मजकूर होता—

'ताराबाई व कुमारसिंग आपल्या परिवारासह आज सायंकाळीं तुवरगडावर दाखल होतील व त्यांचें तेथें रात्रीं आठवाजतां जेवण होईल.'

शेवटीं नवीन मालक आज येणार इतकें ठरलें. मला त्यांच्या येण्यानें काय बरें फायदा होईल? तो दिवस कितितरि उशीरानें मावळला. आकाशाचा जमिनीवर ते दिवशीं इतका सुंदर प्रकाश पडला होता कीं, तो एकदां पाहून माझी तृप्ति होईना. मला घरांत राहवेना, थंडी कडकडीत पडली होती. सुर्यास्त होतांच हा सर्व देखावा दृष्टि आड झाला. वारा सोसाट्याचा होता. तो वहात असतां झाडांच्या पानांचा होणारा आवाज व नदीच्या प्रवाहाचा खळखळाट यांवांचून दुसरा ध्वनि ऐकूं येत नव्हता. काळोखमिण्ण पडला होता परंतु, मला ती वेळ कंटाळवाणी वाटली नाहीं, कारण मी ध्रुवाच्या ताऱ्याकडे तो माझा दैव-तारा चमकवितो कीं नाहीं, याची मार्गप्रतिक्षा करीत बसलें होतें.

रात्रीच्या काळोखाच्या वेळीं आकाश नीलवर्ण दिसत होतें. तो दिपवाळीचाच दिवस, त्यांतून ताराबाई येणार होत्या ह्मणून आनंद प्रदर्शनार्थ जिकडे तिकडे दिपोत्सव केला होता. वाड्यांत, सज्ज्यावर, गच्चीवर, बागेत, जवळच्या अंबराईत, जागोजाग दिवेचदिवे होऊन गेले होते. तो देखावा मोठा रमणीय होता. तो पाहून मला कविता रचण्याची स्फूर्ति आली. आकाशांत तारे चमकत होते व ताऱ्यांत थेट उत्तरेस माझ्य आवडीचा ध्रुवाचा तारा प्रकाशित झाला होता.

रात्रीं येणाऱ्या मागसांची मला आठवण राहिली

नव्हती. ध्रुवनक्षत्रावांचून दुसरी कल्पनाच माझ्या मनांत नव्हती. मी अंबराईतील बंगल्यापर्यंत धांवत गेले. परंतु मी माझ्या पायानेंच गेलें कीं काय तें मला आठवत नाहीं. त्या बंगल्यासभोंवतीं तटाची भिंत होती; तिला एका बाजूस एक मला दांडगा दरवाजा होता; त्याच्यावर मोठमोठे लोखंडी कांटे बसविले होते व ते सर्व दवानें अगदीं भिजून गेले होते. नक्षत्रांचा ही त्यांच्यावर प्रकाश पडला होता, त्यामुळें ती शोभा मोठी रमणीय दिसत होती.

त्या दरवाजावर दिव्यांचा अंधुक प्रकाश पडला होता. त्या ठिकाणीं कोणी उभें असल्याचा मला भास झाला. ही आकृति पुरुषाची होती. तो माझ्याप्रमाणेंच आकाशांतील नक्षत्रांकडे बघत होता. मला त्याचें भय वाटलें नाहीं, अर्थात मी भिऊन किंकाळीही फोडली नाहीं. मला वरचेवर असें वाटे कीं हा ध्रुवाचा तारा एखादेवेळीं मला अशा ठिकाणीं घेऊन जाईल कीं, तो देश मला रमणीय दिसेल. तेथें मला एक मनुष्य भेटेल, तो माझ्यावर प्रेम करील व माझीही त्यावर प्रीति बसेल. मी साश्चर्य-दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागलें. ती मूर्ति मला राजपुत्राप्रमाणें दिसली. त्याचें मस्तक विशाल होतें. केश काळे कुळकुळीत असून दृष्टींत आनंदाची झांक मारत होती. भिवया कमानदार होत्या. तोंडाची ठेवण मनोहर होती. तो जातीचा पुरुष पण सौंदर्यानें रूपवान् स्त्रियांचा गर्व हरण करण्याजोगा होता. ध्रुवनक्षत्रानें मला या ठिकाणीं

आणून सोडलें. हा मनुष्य मध्यम उंचीचा असून सशक्त होता. या पुरुषानें माझें मन वेधलें.

माझीं स्वप्नें व आशा यांचा अतिरेक झाला. मला चैन पडेना. ज्या भुवनसत्रानें माझें मन मोहित केलें, तो माझी इतरांहून फारच कळकळ बाळगतो, असें मला वाटूं लागलें. मी बागेंत फुलांची माळ गुंफित बसलें होतें, इतक्यांत माझ्या समोर एक दिव्य पुरुष येऊन उभा राहिला. त्यानें आपल्या गळ्यांतील हार मला अर्पण केला. माझ्या खांद्यावर आपला गोंडस हात टाकून त्यानें मी नको नको ह्मणत असतां, माझें चुंबन घेऊन आपलें प्रेम व्यक्त केलें. मी मग रागानें—छेः— अनुरागानें लाल होऊन घरीं आलें, अशा प्रकारचीं चमत्कारिक स्वप्नें मला हल्लीं हल्लीं पडूं लागलीं होतीं. आतां तर माझी अशी समजूत झाली कीं, त्या ताऱ्या-नेंच मला त्या दाराशीं नेलें, तो ताराच पुरुष वेशानें उभा होता, कसेंही असो. मी लवकरच कोणाच्या तरी अंकित होणार व माझ्या स्थितींत फरक पडणार, अशी माझी खात्री झाली.

वाऱ्यानें झाडांचीं पानें हालूं लागलीं, तेव्हां त्यांच्या वरील दंव त्या रम्य पुरुषावर पडलें. तो तेव्हां इकडे तिकडे पाहूं लागला. मी त्याच्या समोरच पण आम्र-वृक्षास टेंकून दिव्याच्या मंद प्रकाशांत उभी होतें. त्यानें मला पाहिलें. तो जरा भिमेपणानें कांहीं वेळ उभा राहून माझ्याकडे न्याहाळून पाहूं लागला. नंतर तो आपल्याशींच कांहीं गुणगुणला व तेथून निघून माझ्याजवळ येऊं लागला. [illegible]

पडलीं होतीं, त्यांवरून त्याच्या प्रत्येक पावलाचा ध्वनि उमटत होता. तो जसजसा पुढें येऊं लागला तसतशा माझ्या मनांत आनंदलहरी उद्भवूं लागल्या. शेवटीं तो माझ्याजवळ आला तेव्हां माझा चेहरा पूर्ण चंद्रा प्रमाणें खुलला होता.

तो ह्मणाला 'तुला वाड्यांत जावयाचें आहे काय?'

'नाहीं.'

'तुझें नांव काय?'

मला पुरतें नांव नाहीं याचें भानच राहिलें नव्हतें.

'**कमला**' मी एकदम ह्मटलें.

'**कमला**?' कुणाची? काळ्यानिळ्या डोळ्यांची?

'तें मला माहीत नाहीं' मी ह्मटलें 'महाराज जर जिवंत असते तर, मला असें अपुरें नांव सांगण्याचा प्रसंग आला नसता.'

माझें नांव ऐकतांच त्याचा चेहरा प्रफुल्लित झाला, तो मला स्पष्ट दिसत होता.

तो पुन्हां ह्मणाला 'तर मग आज, मी आल्यावर **जयसिंगानें** एका स्त्रीविषयीं गोष्ट काढली होती ती तूंच काय?'

'होय. तीच मी. माझ्याचविषयीं **जयसिंग** आपणास सांगत होते.'

'असें काय? तर मग, मला ही गोष्ट **ताराबाईला** कळविलीच पाहिजे. मी आतांच्या आतां जाऊन तिला भेटतों, ह्मणजे तूं अनाथ **कमला** एवढें तरी तिला कळेल.

यावेळीं त्याच्या त्या नीलवर्ण दृष्टींत आनंद ओत-प्रोत भरला होता. मीही आनंदसागरांत पोहत होतें.

तो पुन्हां ह्मणाला—' तुझी गोष्ट मोठी विलक्षण आहे. तुझ्याशीं मला पुष्कळ बोलायचें आहे. पण कधीं तें पाहूं. '

त्याचें हें भाषण ऐकतांच मला वाटलें कीं, मी याच्याशीं कितीही बोलत बसलें तरी, माझें मन कंटाळायचें नाहीं. मला उलट आनंदच होईल. त्याचें भाषण मला फारच गोड वाटलें. त्यानेंही हांसत हांसत चारीकडे दृष्टी फेंकली.

' कमले ' तो ह्मणाला ' तूं या थंडीच्या वेळीं येथें काय करीत आहेस असें विचारल्यानें तुला राग नाहीं ना येणार ? '

' छेः ' मी ह्मटलें ' आकाशांतील नक्षत्रें, दंव व दीपोत्सव हीं पाहण्याकरितां मी इकडे आलें होतें. या सर्वत्र प्रज्वलित झालेल्या दिव्यांच्या रांगा फारच मनोहर दिसतात. '

' एकंदरींत तुला हा समारंभ आवडला ह्मणायचा. '

' होय. '

यावेळीं त्याचा चेहरा खूप खुलला होता. ' तूं कमला काय ' असें त्यानें पुन्हां मला विचारलें. तें त्याचें भाषण मला फार आवडलें. ताराबाईचें नांव घेतांच माझ्यापुढें उभा असलेला कुमारसिंग असावा अशी माझी खात्री झाली, तथापि त्याचें नांव विचारल्या वांचून मला चैन पडेना.

' कुमारसिंग आपणासच ह्मणतात काय ? '

तो ह्मणाला ' होय तोच मी [illegible]

वाड्याचें व जिंदगीचें स्वामित्व माझ्याकडे आलें हें माझें दैवच ह्मणावें लागतें. तुला नाहीं का तसें वाटत?'

'खरोखरीच आपलें भाग्य मोठें, असें मला वाटतें.'

मी कांहीं वेळ स्तब्ध राहिलें नंतर नम्रपणें विचारलें.

'महाराज! आपली स्वारी अशा थंडींतून इकडे कशी आली?'

'कमले! तो ह्मणाला 'मलाही तुझ्याप्रमाणेंच मोकळ्या हवेंत फिरावेंसें वाटलें, दिव्यांची शोभा पहावीशी वाटली, ह्मणून मी येथें आलों. हा बंगला मोठा रमणीय दिसतो, तरी पण कमले! तुला या ठिकाणीं फार वेळ उभी करतां कामा नये.

'तें कां?'

'कां ह्मणजे थंडी कडक पडली असून तुझ्या अंगावर लोंकरीची शाल वगैरे कांहींच नाहीं, ह्मणून तुला थंडी होईल. तुझ्या प्रकृतीस विकृति होईल.'

मला त्याची भूतदया पाहून मोठा आनंद वाटला. त्यानें आपल्या दुपेट्याचा एक पदर माझ्या अंगावर टाकला. तो थोर व मी नीच ह्मणून ह्मणा, अगर माझी त्याच्यावर पूर्ण प्रीति बसली ह्मणून ह्मणा, मला तो दुपेट्याचा पदर खालीं टाकवला नाहीं. मी तो नीट सांवरून धरला. नंतर आह्मी दोघेंही मिळून जाऊं लागलों. त्यावेळच्या माझ्या आनंदाची सीमा कोणास कळण्याजोगी नव्हती.

'कमले!' तो ह्मणाला 'खरोखरीच तुझी गोष्ट इतकी विलक्षण आहे कीं, मला सुद्धां तिनें मोठ्या घोटाळ्यांत घातलें आहे.'

'महाराज!' मी ह्मटलें 'तें एक कोडेंच आहे.'

'तरी पण तें सोडण्याजोगीं कांहीं साधनें असलींच पाहिजेत. तीं शोधून काढण्याविषयीं मी अत्यंत परिश्रम घेईन.'

नंतर माझा हात धरून तो ह्मणाला 'कमले! खरोखरीच तूं अगदीं अनाथ आहेस. मला तुझी कीव येते. तुझ्या सुखाविषयीं झटणें हें माझें कर्तव्य, असें मला वाटतें. कमले! इतःपर तूं मला मित्रासारखा मान. मी तुझी सर्व तजवीज करीन. माझ्यावर विश्वास मात्र ठेव.'

'विश्वास ठेवूं?' मी मनांत ह्मटलें 'माझें मनच आपण आकर्षण करून टाकलेंत आणि विश्वास तो काय ठेवूं.'

मी त्याच्या उपकाराबद्दल त्याचे आभार फार मानले.

'कमले' तो ह्मणाला 'ही गोष्ट मी आईला कळवीन, ती तुझी यथायोग्य व्यवस्था करील. ती थोडी अभिमानी स्त्री आहे. तिच्याशीं तूं जरा नम्रभावानें वाग, ह्मणजे ती तुझ्यावर अत्यंत प्रेम करील.'

त्याचे हे गोड शब्द कानांत पडतांच माझा गळा भरून आला. तोंडांतून शब्द फुटेना. त्याच्या मुखकमलाकडे मी प्रेमानें वरचेवर पाहूं लागलें. तुवरगड हेंच माझ्या प्रीतीचें स्थळ वाटूं लागलें. त्या ध्रुव नक्षत्रानें मला ही सुखाची वेळ दाखिवली. त्याला मी आजन्म विसरणार नाहीं.

ते दिवशीं मी दुसऱ्या जगांत नांदत होतें. आह्मी वाड्याजवळ जवळ आलों, तेव्हां मिळून जाण्याची मला लाज वाटूं लागली. मी अंगावरील दुपेट्याचा पदर

काढून त्याच्या हातांत दिला व माझ्या खोलीकडे निघालें. कुमारसिंग मी दृष्टी आड होईपर्यंत मला पहात तेथेंच उभा होता. माझी पूर्व स्थिति फार मागें पडली. आकाशांत तारे विशेष रीतीनें चकाकूं लागल्याचा मला भास होऊं लागला. माझें अंतःकरण उल्हासानें भरून गेलें. गालांवर तांबूस वर्ण चढला. याप्रमाणें मला हाच काय तो प्रथमतः—अनुभव आला. असें कां झालें हें माझें मलाच कळेना व मी त्यासंबंधीं विचार करीत ही उभी राहिलें नाहीं. मी घरीं जाऊन पोचलें मात्र इतक्यांत अंबाजीच्या देवाळयांतील घंटांतून 'दिपवाळीचा सण आला--दिपवाळीचा सण आला—असा प्रतिध्वनि निघूं लागला. खरोखरीच ते दिवशीं दिपवाळीचा सण होता-ही व त्यानें मला एका मित्राची ओळख करून दिली होती.

मी घरांत गेलें तरी देखील नक्षत्रांचा प्रकाश माझ्या दृष्टीआड होईना. मी हिराबाईच्या खोलींत गेलें. मला पहातांच तिला मोठें आश्चर्य वाटलें. सुखःसमाधानानें असा प्रफुल्लित झालेला माझा चेहरा तिनें पूर्वी कधींच पाहिला नव्हता.

'**कमले**' ती रागानें ह्मणाली 'तूं इतकावेळ कोठें होतीस? इकडे तिकडे फिरण्याचें तूं आतां सोड. ताराबाईचा तुझ्याविषयीं इष्टानिष्ट मनोदय कळेपर्यंत तूं आपल्या खोलींतच असत जा ह्मणून सांगितल्याची तुला आठवण नाहीं वाटतें.'

मला तिचे ते शब्द कडू वाटले नाहींत. मी तिची क्षमा मागितली व तिचा राग घालविला.

ताराबाईला पहाण्याची मला भारी उत्कंठा लागली होती. रात्रीचे आठ वाजले. त्या दिवाणखान्यांतून भोजनगृहांत चालल्या होत्या, तेव्हां मी दुरून त्यांना पाहिलें. त्यांच्या बरोबर कुमारसिंगही होता. तो मला पूर्वीपेक्षां फारच सुंदर दिसूं लागला. ताराबाई ही श्री तिरसट व फारच मानी दिसत होती. तिचें सौंदर्य राजघराण्यास शोभेल असें होतें. ती बहुमोल शालु नेसली होती. तिनें थंडी वाजूं नये ह्मणून अंगावरून शाल पांघरली होती. कुमारसिंगानेंही उत्तम जरीबुट्ट्याचा पोषाग केला होता. त्याच्या गळ्यांत रत्न-पदकें बसविलेला मोत्यांचा हार झळकत होता. त्या रत्नांचें दिव्य तेज त्याच्या तोंडावर पडल्यामुळें तें खूप मनोहर भासत होतें. हा रमणीय पेहराव व हे अलंकार पाहून मी अगदीं थक्क होऊन गेलें.

नंतर मी माझ्या खोलींत गेलें व खिडकींतून चकचकीत तारे व कणमय दंव यांचा देखावा पहात बसलें. एका सन्माननीय मित्राचा मला आज लाभ झाला होता ह्मणून माझें मन आनंदसागरांत पोहत होतें. कुमारसिंगाच्या प्रेमाच्या शब्दांची मला आठवण झाली, तेव्हां आनंदाश्रूंनीं माझे डोळे भरून आले. त्याचें तें रम्य स्वरूप माझ्या डोळ्यांपुढें क्षणोक्षणीं दिसूं लागलें. त्याचा मधुर स्वर माझ्या कानांत गुंगुं लागला. मी त्याच्या हाताचें घेतलेलें चुंबन, तसाच त्यावेळीं झालेला आनंद हीं सर्व मला आठवूं लागलीं. मीं एक मनानें अंबाजीची प्रार्थना केली. देवानें मला

हा सुखाचा दिवस दाखविला ह्मणून मी त्याची स्तुति गावूं लागलें.

हिराबाईनें केलेली सुचना मी विसरलें नव्हतें. माझ्या खोलीपासून कांहीं अंतरावर अनेक प्रकारच्या पक्षांचे अनेक पिंजरे होते. मी त्या सर्वांस दररोज नियमानें दाणापाणी देत असे. मला पक्षांची अति आवड ह्मणून हिराबाईनें हें काम माझ्याकडे सोंपविलें होतें. दुसरे दिवशीं सकाळीं बराच वेळ मी खोलीबाहेर पडलेंच नाहीं. पिंजऱ्यांत पक्षी चिवचिवूं लागले, तेव्हां मला चैन पडेना. ताराबाईचीही फराळास येण्याची ती वेळ नव्हती, ह्मणून मी हळूच स्वैपाक घरांत जाऊन कांहीं अन्न घेऊन आलें. पिंजऱ्याचीं दारें उघडून भाकरीचे तुकडे टाकतांच ते सर्व पक्षी माझ्या हातावर, खांद्यावर व मानेवर बसून उडूं बागडूं लागले.

ती वेळ मोठी मजेदार होती. हिरव्यागार गवतावर सूर्य प्रकाश पडल्यामुळें तें पाचेप्रमाणें चकचकत होतें. रोज पहाणाऱ्यांस आश्चर्य वाटल्यावांचून रहाणार नाहीं इतका आज माझा चेहरा प्रफुल्लित झाला होता. मी माझे विस्कळित केश आरशांत पाहून सारखे केले होते. मी पक्षांस दाणा-पाणी देत होतें इतक्यांत, माझ्या मागील खिडकीचें दार उघडल्याचा मला भास झाला ह्मणून मी मागें वळून बघितलें तों खिडकीच्या आंतील बाजूस ताराबाई उभी होती. तिनें आपल्या रत्नविभूषित गौर हातानें मला आपल्याजवळ येण्याविषयीं खूण केली. मी लगेच हात धुऊन खिडकीकडे गेलें. तूं या शब्दावर जोर देऊन ती ह्मणाली ' तूं कोण ?

माझें ठरीव उत्तर होतेंच.

'कमला' मी ह्मटलें.

माझें नांव ऐकतांच तिच्या कपाळास आंठ्या पडल्या. ती ह्मणाली 'कमला ह्मणून एखादी लहान मुलगी असेल असें मला वाटलें होतें. तूं तर वयानें मोठी आहेस.'

तिनें मला आंत येण्यास सांगितलें. मी आंत जातांच ती ह्मणाली.

'कमले! मला ही थंडी सोसत नाहीं. खोलीचें दार लावून घे.'

तिच्या आज्ञेनुरूप दार लावून मी तिच्यापुढें येऊन उभी राहिलें, तेव्हां ती ह्मणाली.

'गेल्या रात्रीं तुझ्याविषयीं कुमारसिंग चमत्कारिक हकीगत सांगत होता, ती सर्व कांहीं मला बरोबर समजली नाहीं. तुला तुझ्या आईबापांची, तुझ्या जन्मवृत्ताची, व तें समजण्याजोग्या साधनांची खरोखरीच माहिती नाहीं काय?'

'मासाहेब' मी ह्मटलें 'खरोखरीच मला यांपैकीं एकाही गोष्टीची माहिती नाहीं.'

'तूं मोहनेची मुलगी असा सर्व लोकांचा समज आहे व मला तें खरेंही वाटतें. तुझें कसें काय ह्मणणें?'

'मी तिची मुलगी नव्हे असेंच मला वाटतें.'

'तूं इतक्या खात्रीनें हें कशावरून सांगतेस.'

'मला पूर्वीची कांहीं स्थिति आठवते त्यावरून.'

मी ह्मटलें 'मला घर नाहीं, नांव नाहीं, आप्तइष्ट नाहींत व जिवलग असा एखादा मित्रही नाहीं.'

मित्र नाहीं ह्मणतांच मला कुमारसिंगाची आठवण झाली व माझा चेहरा खुलला. ताराबाईचें माझ्याकडे लक्ष होतेंच.

ती ह्मणाली 'महाराजांना तुझी हकीगत माहीत होती ही तरि गोष्ट खरी काय ?'

'होय—अगदीं खरी—त्यांनी मला ते दिवशीं माझी हकीगत सांगण्याचें वचनही दिलें होतें.'

मी मागचा पुढचा विचार न करतां 'आज मी चुकीची दुरुस्ती करणार' असेंही महाराजांनीं ह्मटलें होतें ह्मणून सांगितलें.

तिला माझें भाषण कडू वाटलें. ती ह्मणाली.

'अशी कोणती चूक त्यांच्या हातून घडली असावी बरें ?'

'मला तें माहीत नाहीं. महाराज जर आणखी कांहीं तास जिवंत असते व त्यांची वाचा चांगली असती तर मला माझें एकंदर वृत्त कळलें असतें, पण माझें नशीब खोटें ह्मणून मी माझ्याविषयीं अगदीं अज्ञानदशेंत आहे.

ताराबाईचा चेहरा गर्वानें काळवंडला. ती ह्मणाली.

'तर मग तुझें दैवच खोटें. महाराजांच्या हातून कांहीं तुझी चूक घडली नाहीं ?'

'नाहीं. माझ्या मनांत तसली कल्पना देखील आली नाहीं.'

'आणि ह्मणूनच ह्मणतें कीं महाराजांनीं तुझी चूक केली ह्मणून तुला येथें राहण्याचा अधिकार आहे असें तूं मानूं नकोस.'

'छे: मला तसें मुळींच वाटत नाहीं. महाराजांची माझ्यावर पूर्ण कृपा होती. ते माझ्याशीं खऱ्या प्रेमानें वागत.'

'हेंच तुझें मनोराज्य मोठें घातक आहे.' ती म्हणाली 'मनुष्य तरुणावस्थेंत आला म्हणजे अशीं मनोराज्यें फारच करतो, तशीं तूं करूं नकोस. मनोराज्य क्षणिक आहे. तुझ्यासारख्या तरुण मुलीचा तर मनोराज्य केल्यास कधींच उत्कर्ष होणार नाहीं.'

ताराबाई हे शब्द बोलते आहे इतक्यांत, मला अंबराईंतील बंगल्याची आठवण झाली. माझ्या मुखावर आनंदाची झांक मारूं लागली. ताराबाईला कुमारसिंग मला भेटल्याची हकीकत कळल्यास ती काय म्हणेल म्हणून मी विचार करूं लागलें. माझा आनंदी चेहरा पाहून तिला वाईट वाटलें. ती म्हणाली.

'तूं मोठमोठ्या मनोराज्यांत गर्क असतेस असें मला वाटतें. तुला मी या वेळीं क्षमा करतें. तूं मोठ्या कुलांत जन्मलीस व तुला तेथून कोणी चोरून इकडे आणली, तुझे आईबाप तुझ्या स्वागतार्थ तयार होऊन बसले आहेत अशीच कल्पना तुझ्या मनांत आली असेल नव्हे काय?'

कुमारसिंगाची ती आई नसून जर दुसरी कोणी असती तर, मी तिचा पुर्तेपणीं द्वेष केला असता. ती इतकी गर्विष्ठ, तिरसट, रागीट व मत्सरी बायको होती कीं, तिनें माझा उघड उघड पाणउतारा केला.

ती रागानें मला इतकें देखील म्हणाली कीं जगत्सिंगानें मूर्खपणानेंच तुला इतके दिवस खाऊं घातलें.

त्याला कदाचित् तुझ्यासारखी मूर्ख पोर वाड्यांत आहे ही गोष्ट माहीतही नव्हती असें वाटतें. आतां तूं कोणाची असावीस अशी तुझी कल्पना आहे तें तूंच मला मोकळ्या मनानें सांग पाहूं ?

'मासाहेब !' मी ह्मटलें 'मला तें कांहींएक सांगतां येण्याजोगें नाहीं. मी बहुतकरून महाराजांच्या मित्राची मुलगी असेन असें मला वाटत होतें व वाटतेंही. परंतु खरी हकीगत आतां मला कधींच कळण्याजोगी नाहीं.'

हाय ! हाय ! महाराज परधामास गेले तेव्हां त्यांच्याबरोबर माझी हकीगतही नाहींशी झाली.

'कमले' ती ह्मणाली 'तूं कांहीं शिकली सवरली आहेस काय ?'

मी ह्मटलें 'मला मराठी लिहावाचायला, बीन वाजवायला व त्या सुरावर थोडें गायाला इतकें येतें. परमेश्वरानें माझ्या पोटापुरती विद्या मला दिली आहे असें हिराबाई वरचेवर ह्मणतात.

'तर मग तुला गाणें बजावणें चांगलेंच येत असेल नव्हे ! मला तुला पाहून मोठा आनंद वाटतो. महाराजांच्या सहवासांत जे तुझे दिवस गेले त्यांत घडलेली सर्व हकीगत सांग पाहूं.'

महाराजांनीं माझ्या हाताचें व कपाळाचें चुंबन घेतलें, एवढी गोष्ट वगळून मी तिला प्रत्येक गोष्ट सांगितली, तेव्हां तिचा राग जाऊन ती जरा शांत झाली व ह्मणाली.

'महाराजांनीं तुझ्या मांडीवर प्राण सोडला काय ! मग तूं माझ्यावर अम्मल चालवूं पहातेस तें अगदी

बरोबर आहे. मला आतां तुझ्याविषयीं चांगलाच विचार केला पाहिजे.'

ती कांहींवेळ स्तब्ध राहिली व पुन्हां ह्मणाली.

कमले! मला तुझें गाणें-बजावणें ऐकावेंसें वाटल्यास तूं तितकी मेहरबानी माझ्यावर करशील, नाहीं काय?'

मी ह्मटलें 'मेहेरबानी कसली? तुह्मांकरितां मी हवें तें करीन.'

कुमारसिंगाची ही आई ह्मणूनच तिला मी असें नम्रपणानें उत्तर दिलें, ताराबाई ह्मणून दिलें नाहीं, मी लगेच खोलीबाहेर पडलें.

तुवरगडावर असा नियम होता कीं, प्रत्येक शुक्रवारीं अंबाजीच्या देवळांत सर्व मनुष्यांनीं जमलेंच पाहिजे होतें. तो दिवस शुक्रवारचाच होता, ह्मणून मी चाकरनोकरांबरोबर देवळांत गेलें नाहीं. मानी ताराबाईबरोबर जाण्याचेंही मला आवडेना. शिवाय हें राजवराणें बसण्याची जी जागा होती तीपासून माझी जागा बऱ्याच अंतरावर होती. तथापि तेथून प्रत्येक मनुष्य मला दिसत असे. ती अभिमानी ताराबाई व तिचा उदार मनाचा मुलगा तरुण कुमारसिंग हीं दोघें आणि दिपवाळीच्या सणाचें पूर्ण सौंदर्य, इतकीं मला चांगलीं दिसत होतीं. तो सण मला मोठा सुखाचा वाटला. याचें कारण मला त्याच दिवशीं कुमारसिंगासारखा मित्र मिळाला हें होय.

अंबालालची मुलगी व बायको ह्या ते दिवशीं देवालयांत नटूनथटून आल्या होत्या. त्यांच्या बसण्याच्या जागा ताराबाई जवळच होत्या. मी त्यांना मत्सरबुद्धीनें

पाहिलें याबद्दल अंबाजी मला क्षमा करो. अंबालालची मुलगी तर आज खूपच शृंगारली होती. ती पांढरेशुभ्र उंची वस्त्र नेसली होती व तिनें काश्मिरी शाल पांघरली होती. कुमारसिंगाच्या तोंडाकडे तिनें निदान हजार वेळ तरी पाहिलें असेल, पण त्याच्या लक्षांत ती आपणाकडे बघते, ही कल्पनाही नव्हती. मंगळारती होतांच सर्वत्र शांतता झाली. तेव्हां कुमारसिंग माझ्याकडे पहात होता. प्रथम मला तें माहीतच नाहीं असा मी बहाणा केला, पण माझ्या गालावर लाली चढली व मला प्रेमानें हंसें येऊं लागलें, तें अनिवार होतांच मी खालीं मान घातली. अहाहा! मला यावेळीं किति तरि सुख वाटलें असेल बरें!

अंबाजीची पूजार्चा संपतांच ताराबाई बगींत बसून वाड्याकडे निघाली. कुमारसिंग मात्र अंबालालाबरोबर बोलत उभा राहिला. त्याची मुलगी कुमारसिंगापुढें खूप नखरे करूं लागली. मला तसलीं लुगडीं नी चोळया कोठून मिळणार, मला त्याबद्दल वाईट वाटलें खरें, पण माझा तो दिवस मोठ्या मौजेंत गेला.

---

# प्रकर्ण ७ वें.

## प्रेमाची ओळख.

फुलांना बहार आला होता. थंडीचा अगदीं नायनाट होऊन गार वारें वाहण्याचें बंद पडलें. पुष्पपरागमिश्रित मंद मंद वायु वहात होता. यावेळीं माझ्या पूर्वस्थितींत व सद्यस्थितींत जमीनअस्मानाचा फरक पडला होता. मला एकच गोष्टीचा विषाद वाटत असे व ती गोष्ट ह्मटली ह्मणजे ताराबाईला मी आवडत नव्हतें. हीच होय.

ताराबाईला येऊन दोन दिवस झाले. तिसरे दिवशीं तिनें मला गाण्यावजावण्यास बोलावलें. गाण्याची कायती मीच परिक्षक असें ती मानीत असे. मी गाणें ह्मटलें तेव्हां ती ह्मणाली.

'तुझा आवाज फारच गोड आहे. तूं पद्धतशीर गातेस. तुला आतां थोडीशी मरुरी कळली पाहिजे ह्मणजे तूं उत्तम गाणारीण होशील. तुझा आवाज इतका मधुर असावा ही किति तरि आश्चर्याची गोष्ट!'

त्या दिवसापासून ती माझ्याशीं वरोपचारी प्रेमानें वागे परंतु, खरोखर तिला मी आवडत नव्हतें. मला पहातांच तिच्या कपाळास आंठ्या पडत.

एके दिवशीं माझें मन पाहायाला कीं काय नकळे

ती ह्मणाली 'कमले ! तुझें हें अगदींच एकेरी नांव, याला तूं मोहनचें आडनाव कां बरें जोडीत नाहींस?'

'मासाहेब' मी ह्मटलें 'तें दुसऱ्या घराण्याचें नांव, मी माझ्या कुळास व नांवास कधींही लावणार नाहीं!'

आमचें बोलणें एवढ्यावरच थांबलें. ती मला कोणतें काम सांगावें याविषयीं विचार करीत होती. शेवटीं एकदांचें ठरून मला तिनें आपल्या तैनातींत घेतलें मी तिला एखादें पुस्तक वाचून दाखवावें. व तिचीं खासगीं पत्रें लिहावीं, एवढें काम तिनें मला सांगितलें. मी तिच्या दासीविषयीं वगैरे कोणत्याहि बाबतींत मध्यस्ती करूं नये असेंही ठरलें होतें. त्या सांगतील त्या वेळीं बीन वाजवून व पद्य ह्मणून त्यांचें मनरंजनही मला करावें लागे. मला सांगायला मोठा आनंद वाटतो कीं, तिनें या कामाबद्दल मला दोन सुशोभित खोल्या बसाउठायला दिल्या, मी तेथेंच जेवीत असे. तिनें कपडे ठेवण्याकरितां मला एक सुंदर कपाट दिलें. त्यांत तिनें उंची दोन लुगडीं, चार चोळ्या व हिरवी आणि गुलाबी अशा दोन रंगाच्या दोन शालीही दिल्या. मला हा पोषाख करून तिच्यापुढें जावें लागे. शिवाय वेतन ह्मणून तिनें मला दरसाल शंभर रुपये देण्याचें ठरविलें होतें. माझी अशी कायती हीच संपत्ति होती. मला सुखाचा पूर्ण उपभोग मिळाला. कुमारसिंगाची मूर्ति वरचेवर पहायला मिळे, ह्मणून मला फार आनंद वाटूं लागला. त्याला माझी दिनावस्था आवडली नाहीं ह्मणून तो ताराबाईला माझी योग्यची व्यवस्था करण्यास वरचेवर सांगूं लागला. शेवटीं त्याचा निरुपाय

झाला. तिच्यानें आपल्या मुलाचा आशाभंग करवेना. तेव्हां केवळ त्याला खुश ठेवण्याकरितां ताराबाईनें माझी अशी व्यवस्था केली असें मला नंतर कळलें.

कुमारसिंगाविषयीं प्रथम मला इतकें वाटलें नव्हतें पण त्याची सुंदर तसबीर पहातांच माझें मन वेधलें. दिल्लीच्या एका प्रसिद्ध चित्रगारानें ही तसबीर रंगवली होती. सर्व तसबीरींच्यावर झट्कन् दिसेल अशा जागीं ही तसबीर ताराबाईनें मुद्दाम लाविली होती. ती तसबीर बघायला मी वरचेवर दिवाणखान्यांत जात असे. त्याचा तो काळाभोर केशकलाप, प्रेमयुक्तदृष्टी व मनोहर चेहरा हीं वरचेवर पाहून मला कधींच कंटाळा आला नाहीं जगांतील एकंदर वस्तूंपेक्षां माझें प्रेम कुमारसिंगावरच विशेष जडलें होतें. माझें आयुष्य हेंच कोणी एक आकाश त्यांत दुःखरूप काळोख पसरला होता, तो माझ्या दैवरूप ताऱ्याच्या प्रकाशानें नाहींसा झाला. प्रेमार्पण करण्यायोग्य मला आजपर्यंत दुसरा मनुष्यच न मिळाल्यामुळें, माझें प्रेम कुमारसिंगावर जडलें तें अगदीं यथायोग्य होतें. तळ्यात पाणी तुंबावें, तद्वत माझ्या हृदयांत प्रेमरस तुंबला होता. कुमारिकेच्या मनांत जें प्रेम गुप्त असतें तें सर्व माझ्या मनांतून व्यक्त होऊं लागलें, व प्रेमायोग्य दुसरी वस्तुच न दिसल्यामुळें मी तें सर्व कुमारसिंगासच अर्पण केलें. मी सारासार विचार केला नाहीं. मी अगदीं प्रेमबद्ध झालें. माझें तें प्रेम मग कधीं कमी झालें नाहीं कीं परतलें नाहीं. माझ्या भाषणांतही प्रियाविरुद्ध उद्गार कधीं निघेनात, इतकी मी प्रेमासक्त झालें होतें.

पाहिलें याबद्दल अंबाजी मला क्षमा करो. अंबालालची मुलगी तर आज खूपच शृंगारली होती. ती पांढरेंशुभ्र उंची वस्त्र नेसली होती व तिनें काश्मिरी शाल पांघरली होती. कुमारसिंगाच्या तोंडाकडे तिनें निदान हजार वेळ तरी पाहिलें असेल, पण त्याच्या लक्षांत ती आपणाकडे बघते, ही कल्पनाही नव्हती. मंगळारती होतांच सर्वत्र शांतता झाली. तेव्हां कुमारसिंग माझ्याकडे पहात होता. प्रथम मला तें माहीतच नाहीं असा मी बाहणा केला, पण माझ्या गालावर लाली चढली व मला प्रेमानें हंसें येऊं लागलें, तें अनिवार होतांच मी खालीं मान घातली. अहाहा ! मला यावेळीं किति तरि सुख वाटलें असेल बरें !

अंबाजीची पूजाअर्चा संपतांच ताराबाई बगींत बसून वाड्याकडे निघाली. कुमारसिंग मात्र अंबालालाबरोबर बोलत उभा राहिला. त्याची मुलगी कुमारसिंगापुढें खूप नखरे करूं लागली. मला तसलीं लुगडीं नी चोळ्या कोठून मिळणार, मला त्याबद्दल वाईट वाटलें खरें, पण माझा तो दिवस मोठ्या मौजेंत गेला.

---

# प्रकर्ण ७ वें.

## प्रेमाची ओळख.

फुलांना बहार आला होता. थंडीचा अगदीं नायनाट होऊन गार वारें वाहण्याचें बंद पडलें. पुष्पपरागमिश्रित मंद मंद वायु वहात होता. यावेळीं माझ्या पूर्वस्थितीत व सद्यस्थितीत जमीनअस्मानाचा फरक पडला होता. मला एकच गोष्टीचा विषाद वाटत असे व ती गोष्ट ह्मटली ह्मणजे ताराबाईला मी आवडत नव्हतें. हीच होय.

ताराबाईला येऊन दोन दिवस झाले. तिसरे दिवशीं तिनें मला गाण्याबजावण्यास बोलावलें. गाण्याची कायती मीच परिक्षक असें ती मानीत असे. मी गाणें ह्मटलें तेव्हां ती ह्मणाली.

'तुझा आवाज फारच गोड आहे. तूं पद्धतशीर गातेस. तुला आतां थोडीशी मरुती कळली पाहिजे ह्मणजे तूं उत्तम गाणारीण होशील. तुझा आवाज इतका मधुर असावा ही किति तरि आश्चर्याची गोष्ट!'

त्या दिवसापासून ती माझ्याशीं वरोपचारी प्रेमानें वागे परंतु, खरोखर तिला मी आवडत नव्हतें. मला पहातांच तिच्या कपाळास आंठ्या पडत.

एके दिवशीं माझें मन पाहायाला की वगैर[illegible]

ती ह्मणाली 'कमले ! तुझें हें अगदींच एकेरी नांव, याला तूं मोहनचें आडनाव कां बरें जोडीत नाहींस?'

'मासाहेब' मी ह्मटलें 'तें दुसऱ्या घराण्याचें नांव, मी माझ्या कुळास व नांवास कधींही लावणार नाहीं!'

आमचें बोलणें एवढ्यावरच थांबलें. ती मला कोणतें काम सांगावें याविषयीं विचार करीत होती. शेवटीं एकदांचें ठरून मला तिनें आपल्या तैनातींत घेतलें. मी तिला एखादें पुस्तक वाचून दाखवावें. व तिचीं खासगीं पत्रें लिहावीं, एवढें काम तिनें मला सांगितलें. मी तिच्या दासीविषयीं वगैरे कोणत्याहि बाबतींत मध्यस्ती करूं नये असेंही ठरलें होतें. त्या सांगतील त्या वेळीं बीन वाजवून व पद्यें ह्मणून त्यांचें मनरंजनही मला करावें लागे. मला सांगायला मोठा आनंद वाटतो कीं, तिनें या कामाबद्दल मला दोन सुशोभित खोल्या बसाउठायला दिल्या, मी तेथेंच जेवति असे. तिनें कपडे ठेवण्याकरितां मला एक सुंदर कपाट दिलें. त्यांत तिनें उंची दोन लुगडीं, चार चोळया व हिरवी आणि गुलाबी अशा दोन रंगाच्या दोन शालीही दिल्या. मला हा पोषाख करून तिच्यापुढें जावें लागे. शिवाय वेतन ह्मणून तिनें मला दरसाल शंभर रुपये देण्याचें ठरविलें होतें. माझी अशी कायती हीच संपत्ति होती. मला सुखाचा पूर्ण उपभोग मिळाला. कुमारसिंगाची मूर्ति वरचेवर पहायला मिळे, ह्मणून मला फार आनंद वाटूं लागला. त्याला माझी दिनावस्था आवडली नाहीं ह्मणून तो ताराबाईला माझी योग्यती व्यवस्था करण्यास वरचेवर सांगूं लागला. शेवटीं त्याचा निरुपाय

झाला. तिच्यानें आपल्या मुलाचा आशाभंग करवेना. तेव्हां केवळ त्याला खुश ठेवण्याकरितां ताराबाईनें माझी अशी व्यवस्था केली असें मला नंतर कळलें.

कुमारसिंगाविषयीं प्रथम मला इतकें वाटलें नव्हतें पण त्याची सुंदर तसबीर पहातांच माझें मन वेधलें. दिल्लीच्या एका प्रसिद्ध चित्रगारानें ही तसबीर रंगवली होती. सर्व तसबीरींच्यावर झट्कन् दिसेल अशा जागीं ही तसबीर ताराबाईनें मुद्दाम लाविली होती. ती तसबीर बघायला मी वरचेवर दिवाणखान्यांत जात असे. त्याचा तो काळाभोर केशकलाप, प्रेमयुक्तदृष्टी व मनोहर चेहरा हीं वरचेवर पाहून मला कधींच कंटाळा आला नाहीं. जगांतील एकंदर वस्तूंपेक्षां माझें प्रेम कुमारसिंगावरच विशेष जडलें होतें. माझें आयुष्य हेंच कोणी एक आकाश त्यांत दुःखरूप काळोख पसरला होता, तो माझ्या दैवरूप ताऱ्याच्या प्रकाशानें नाहींसा झाला. प्रेमार्पण करण्यायोग्य मला आजपर्यंत दुसरा मनुष्यच न मिळाल्यामुळें, माझें प्रेम कुमारसिंगावर जडलें तें अगदीं यथायोग्य होतें. तळ्यात पाणी तुंबावें, तद्वत माझ्या हृदयांत प्रेमरस तुंबला होता. कुमारिकेच्या मनांत जें प्रेम गुप्त असतें तें सर्व माझ्या मनांतून व्यक्त होऊं लागलें, व प्रेमायोग्य दुसरी वस्तुच न दिसल्यामुळें मी तें सर्व कुमारसिंगासच अर्पण केलें. मी सारासार विचार केला नाहीं. मी अगदीं प्रेमबद्ध झालें. माझें तें प्रेम मग कधीं कमी झालें नाहीं कां परतलें नाहीं. माझ्या भाषणांतही प्रियाविरुद्ध उद्गार कधीं निघेनात, इतकी मी प्रेमासक्त झालें होतें.

त्या तसबीरीकडे पाहूं लागलें ह्मणजे, माझे डोळे आनंदाश्रुंनीं भरून येत. मला त्या तसबीरीचें प्रेमानें पूजन करावें असें वाटूं लागलें. माझी त्याच्यावर प्रीति बसली. मला ती मूर्ति सर्व नरांत श्रेष्ठ अशी दिसूं लागली. त्याचें सौंदर्य माझ्या दृष्टीपुढें रात्रंदिवस दिसूं लागलें. मी माझ्या खोलींत वीन वाजवीत बसे तेव्हां, त्याची स्वारी अकस्मात् माझ्यासमोर येऊन माझ्याकडे स्मित हास्य करून पहात असे, तेव्हांचा तो आनंद मला अद्याप आठवतो. मला त्याच्यावांचून दुसरें कांहींच दिसेनासें झालें. जिकडे पहावें तिकडे मला त्याचाच मुखचंद्रमा दिसूं लागला. दुसरे एकंदर पदार्थ अंधारांत लपल्याप्रमाणें मला वाटत. तो बोलूं लागला ह्मणजे त्याच्याच कायत्या भाषणाकडे माझें लक्ष लागे. तो खोलींत असेपर्यंत त्याच्याकडे प्रेमदृष्टीनें पाहण्या वांचून व त्याचें गोड भाषण ऐकण्यावांचून मला तिसरें कोणतेंच काम सूचत नसे. तो ज्या वाड्यांत राहतो त्यांतच मी असतें, त्याच्या भोंवतीं जी हवा, तीच माझ्या भोंवतींही आहे. मी त्याच हवेंत श्वासोश्वास करतें. तो जे देखावे पहातो, तेच मी पहातें ही व अशा प्रकारच्या कल्पना मनांत आणूनच मी सुखसागरांत पोहत असे, पण माझ्यासारखें तोही आपलें विमल प्रेम मला अर्पण करील, ही कल्पना देखील माझ्या मनांत नव्हती. तो चालूं लागला ह्मणजे त्याच्या पावलांचा उमटणारा ध्वनि मी प्रेमानें ऐकत असे. मी त्याला मनोभावानें माझे पंचप्राण अर्पण केले होते, परंतु माझ्या प्रेमाची व निश्चयाची परिक्षा त्याला कशी कळणार

या कमलेची त्याला दया येईल व तो इतकी काळजी घेईल, अशी मी देखील आशा केली नव्हती, त्याला माझें गाणेंबजावणें मनःपूर्वक आवडलें होतें हें मात्र खरें. पहिल्या पहिल्यानदां बीनाचा आवाज ऐकतांच तो माझ्या खोलींत येत नव्हता, पण कांहीं दिवस लोटल्या-नंतर मी बीन घेऊन सूर काढण्याचीच फुरसत कीं, तो सरळ माझ्या खोलींत आल्याखेरीज राहीनासाच झाला. तो स्वतः होऊन मला गाणें ह्मणण्यास पूर्वी कधीं सांगत नसे. त्याला तें ऐकावेंसें वाटल्यास तो आपला हेतु ताराबाईस कळवी व ती मग मला काय सांगायचें तें सांगे. मी गाणें गाऊं लागलें ह्मणजे ताराबाई पलंगा-वर कलंडत व तो तरुण कुमारसिंग खिडकींतील गार हवा घेत खुर्चीवर बसे.

कुमारसिंगादेखत मी गाणें ह्मणूं लागलें ह्मणजे मला असें वाटे कीं, माझ्या या गायनांतून मी त्याला आपला आत्माच अर्पण करीत आहे. एरवीं मी त्याच्याशीं फारसें भाषण करीत नसे. त्याच्या तोंडा-कडे बघण्याइतका माझ्या मनांत धीर नव्हता. तथापि प्रेमाचीं गाणीं ह्मणून मी त्याला आपलें प्रेम व्यक्त करून दाखवीत होतें. माझें गाणें संपल्यावर तो जेव्हां बाहेर जाण्याकरितां निघे तेव्हां मी हळूच चोरून त्याच्या मुखकमळाकडे पहात असे. तोही जातां जातां माझ्यावर प्रेमदृष्टि फेंकून जाई. मी बीन वाजवून गाणें गात आहे व त्याला त्यापासून आनंद होत आहे, असें पाहून माझेंही मन उल्हासानें प्रफुल्लित होत असे.

तो माझ्याशीं बोलत असलेला, माझ्या गाण्याची

प्रशंसा करीत असलेला व हातात हात घालून बसलेला असा मला स्वप्नांत दिसे, पण दृष्टांत त्या सुखाचा मला तेव्हां अनुभव आला नव्हता. माझी कल्पना व प्रेम हीं सावकाशपणें वृद्धींगत होत होतीं. ज्या भव्य खिडकीच्या कठड्यावर तो हात टेकून बसला होता ती मला मोठी पवित्र वाटली. प्रेमरूप मनोविकारानें माझें अंतःकरण भरून टाकलें, तथापि मी कुमारसिंगा वर अनुरक्त झालें होतें ही गोष्ट कोणालाच कळूं दिली नव्हती. त्याची ती अभिमानी आई, त्याच्या सहवासांत असणारे त्याचे मित्र, चाकर वगैरे कोणाच्याच लक्षांत जिला पुर्ते नांव देखील नाहीं, ती कमला, तुवरगड-च्या नूतन धन्यावर आसक्त झाली, हें आलें नव्हतें.

ताराबाईच्या मनांत एके दिवशीं गाणें वजावणें ऐकण्याचें आलें. ती वेळ संध्याकाळची होती. तो शरदृतु होता. मला त्याचें मुळींच विस्मरण होणार नाहीं.

माझी समजूतच कोती. मी गाणें ह्मटलें त्यावेळीं मला वाटलें कीं माझे हे पंचप्राण त्याच्या पायाशीं, व त्याच्या हातांत हात असतांना जावेत, ह्मणजे मला स्वर्गांत सुख होईल. पण माझें इतकें कोठें भाग्य होतें? मी गरीबाची व माझी प्रीतिही तशीच वरपांगी नसून गरीब होती, मग त्याचा हात माझ्या हातांत पडणें तरि शक्य होतें काय? छेः पण मला ते दिवशीं गाते-वेळीं मोठी हुरुप आली होती खरी. मी त्यावेळीं इतकें सुंदर गायन केलें कीं तसें गायन पूर्वीं कधींच माझ्या कडून झालें नव्हतें.

ताराबाई पलंगावर कलंडली होती. कुमारसिंग

खिडकीच्या तोंडास बसला होता. पश्चिमेकडील सूर्यास्ताचा अंधुक प्रकाश खोलीभर पसरला होता. माझ्या मनाचा उल्हास मला दाबतां येईना, म्हणून मी उठलें व अर्धवट उघडलेल्या दारांतून बाहेरच्या पटांगणांत आलें व तेथून अंबराईतील बंगल्याकडे वळलें. तेथल्या बगिच्यांत नानाप्रकारचीं फुलें फुललीं होतीं. या बंगल्याकडूनच नदीस जाण्याची वाट होती. माझें अंतःकरण प्रेमानें तुडुंब भरलें होतें. मी माझे हात बंगल्याच्या दारावर ठेवले व त्यांच्यावर मान टेकून उभी राहिलें. यावेळीं मी माझे डोळे झांकून माझ्या प्रिय प्राणाचें चिंतन करीत होतें.

थोडक्याच वेळानें मला कोणी माझ्या मागून येत असल्याचा भास झाला. त्याच्या प्रत्येक पावलाचा ध्वनि माझ्या हृत्पटलावर प्रेमठसा उठवत होता, तरी मी डोळे उघडलेच नाहींत. इतक्यांत 'कमले!' अशी हाक माझ्या कानावर आली. मी लगेंच कावरी बावरी होऊन चारीकडे पाहूं लागलें, पण माझ्या दृष्टीस कोणीच पडलें नाहीं. मग मात्र मी जरा घाबरलें व विचार करीत क्षणमात्र उभी राहिलें.

मी प्रेमांध झाल्यामुळें, कोणी हाक मारल्याचा केवळ भास झाला असावा अशी माझी समजूत झाली, व मी पुन्हां डोळे झांकून त्या माझ्या प्रियाचें-त्या कुमारसिंगाचें-चिंतन करूं लागलें, पुन्हां मला पावलाचा आवाज ऐकूं येऊं लागला, मी वर पहाणार इतक्यांत. 'कमले' अशी पुन्हां मला कोणी हाक मारिली. मी चटकन् मागें पाहिलें तर प्रत्यक्ष कुमार-

सिंगच मला हाक मारीत होता. तो माझ्याकडे प्रेमानें पाहूं लागला. यावेळीं त्याचे डोळे प्रेमाश्रूंनीं भरून आले होते.

तो ह्मणाला

'कमले ! तुझ्या मागोमाग मी येथें आलों याबद्दल तूं मला क्षमा कर. तुला सोडून माझ्यानें रहावेना. तूं जें गाणें ह्मटलेंस त्यानें माझें मन अगदीं मोहित झालें आहे. कमले ! तूं हे कोणाचे उद्गार प्रदर्शित केलेस तेवढें सांगून मला धन्य करशील काय ?'

मी तुझ्यावर अनुरक्त होऊन माझें प्रेम त्या गाण्यांत व्यक्त केलें होतें असें माझ्यानें त्याला सांगवलें नाहीं. तो पुन्हां ह्मणाला.

'मी आजपर्यंत पुष्कळ पदें ऐकलीं पण यांतली खुमारी कांहीं विलक्षण होती. त्याचा अर्थ काय तो सांग पाहूं ?'

'महाराज !' मी ह्मटलें 'अर्थापेक्षां शब्दरचनेंत माधुर्य विशेष असल्यामुळें तें पद आपणास मधुर वाटलें इतकेंच.'

नंतर कांहींवेळ तो स्तब्धच होता. ज्या कुमाराची मी दुरूनच पुजा करीत असे तो यावेळीं माझ्या अगदीं शेजारीं उभा होता. त्याची दृष्टी व चेहरा हीं मी कधींच पाहिलीं नव्हतीं इतकीं प्रेमानें आर्द्र झालीं होतीं.

तो ह्मणाला 'तुझा मुखचंद्रमा बघतांच तुझ्या गाण्याची कल्पना करतां येते. तूं बीन वाजवून सप्त स्वर काढतेस त्याचें मला इतकें नवल वाटत नाहीं,

परंतु जेव्हां तूं आपल्या कंठांतून उदात्त अनुदात्त स्वर काढतेस तेव्हां मला मारी नवल वाटतें. '

नंतर क्षणमात्र त्यानें माझ्याकडे निश्चल टक लावली, व तो ह्मणाला.

'कुणीकडे तें मला आठवत नाहीं तरि पण अगदीं तुझ्यासारखा चेहरा मी कुठल्याशा तसबिरींत पाहिला आहे. '

'पण तुम्हांला ती तसबीर आवडली काय ? '

माझ्या पहाण्यांत तितकी सुंदर तसबीर दुसरी आलीच नाहीं, मग 'आवडली काय ? ' ह्मणून काय विचारतेस ? '

'तर मग ती तसबीर माझी नसेल. '

'छे: ती तुझीच होती. तींत तुझ्या डोळ्यांसारखे काळेभोर डोळे व धनुष्याकार भोंवया रेखल्या होत्या. त्या तसबीरीचा असाच पूर्णचंद्रवत् रम्य मुखवटा होता. केशकलाप असाच कुरळ असून, भृंगकांतीस लाजविणारा होता. हनुवटीची ठेवण अगदीं अशीच होती, मग तूंच सांग बरें अशी तसबीर दुसऱ्या कोणाची असणार ! अनाथ बाळे ! कवि कल्पना करितात तद्वत तुझें सौंदर्य आहे. तुझी भेट मला प्रथम अंबराईतील बंगल्याकडे झाली, तेव्हां तुझें सुस्वरूप पाहून मी थक्क झालों. '

मला अत्यानंद झाला. ज्या ताऱ्यानें मला त्या बंगल्याकडे नेलें, त्याचे मी मनःपूर्वक आभार मानले. सौंदर्य-आणि तें माझ्यासारख्या अनाथ पोरीला-मग मला त्याचा कसला आनंद वाटणार ? तथापि त्याला ज्या अर्थी

तें सौंदर्य प्रिय झालें त्या अर्थी मलाही तें तसें मानावें लागलें. मी ह्मटलें 'तुम्हांला जर माझें सौंदर्य व चेहरा आवडतो तर मीही आजपासून त्यांना प्रिय मानीन.'

'तुझें सौंदर्य व चेहरा मला आवडतो ? अहाहा ! कमले ! हे किति तरि मंजुळ शब्द तूं योजतेस. मला डोळे किंवा कान नाहींत असें तुला वाटलें काय ? तुझ्या मुखाकडे पाहिल्यावांचूनच तुझें मी गायन ऐकलें अशी तुझी समजूत होती काय ? तुझ्या निर्मल अंतःकरणाची परिक्षा करण्यापूर्वींच मी तुझ्याकडे बघत होतों असें तुला वाटलें काय ? कमले ! मी तुला हें अगदीं थोडक्यांत सांगितलें. मी तुला चांगली ओळखतों अशी माझी खात्री आहे.

कुमारसिंगाच्या या थोडक्या शब्दांनीं माझ्या मनाचें इतकें समाधान झालें कीं मला तेथें तेव्हांच मरण येतें तर मी आनंद मानतें. अहाहा ! ती रात्र किति तरी सुखानें गेली. मला तिचें मुळींच विस्मरण होणार नाहीं.

तो ह्मणाला 'तूं जें पद ह्मटलेंस तें ह्मणणारी कोणीतरी प्रेमबद्ध विरही स्त्री असली पाहिजे. ते विचार तुझेच ह्मणावेत तर तूं आपलें प्रेम कोणालाच अर्पण केलें नाहींस.'

मला या बोलण्याचें हसूं आलें, पण मी तें मनांतल्या मनांत दाबून ह्मटलें 'नुसतें प्रेमच अर्पण केलें नाहीं तर त्याचें चिंतन व पूजनही केलें आहे. फक्त त्याला मात्र तें माहीत नाहीं.'

कमले ' तो ह्मणाला ' कवि जे कवितेंत उद्गार काढतात त्यांतील बहुतेक त्यांच्या अनुभवाचे असतात, व तसें असल्याशिवाय कविता सरसही वठत नाहीं. तूं ह्मटलेली कविता खूप सरस आहे. कमले ! ती कोणी केली तुला ठाऊक आहे काय ? '

मला मोठा आनंद वाटला. मी ह्मटलें.

' महाराज ! ती कविता आपल्यापुढें असलेल्या या अनाथ अबलेनेंच रचली आहे. '

' पण तुला विरहव्यथेचा कधीं अनुभव आला होता ? '

मी हळूच ह्मटलें ' आला होता कशास येतो आहे असें ह्मणा. '

' शाबास ! कमले ! तूं एकंदरींत कविताही करतेस व त्या इतक्या सुंदर, ह्मणून मला मोठा आनंद वाटतो. बिचारे ! तुझ्या वयाच्या मुलीस सुखाशिवाय दुसरें कांहींच माहीत असतां कामा नये. तुझ्या या तारुण्यांतील एकांतवासासंबंधीं मला कांहीं थोडी हकीगत सांग. '

मला समजायला लागल्यापासूनच्या एकंदर गोष्टी मी त्याला सांगितल्या. त्याच्या सहवासानें मला आनंद व सुख हीं दोन्हीं प्राप्त झालीं. माझ्यानें त्या सुखानंदाचें वर्णन करवत नाहीं. तो ह्मणाला.

' तुझी गुप्त गोष्ट उघड करण्याविषयीं माझ्या हातून होईल तितका प्रयत्न करीन असें तुला मी मागेंच वचन दिलें आहे. पण त्याप्रमाणें मला अद्याप यश मात्र आलें नाहीं. '

नंतर कांहीं वेळ तो स्तब्धच राहिला व मी त्याच्या तोंडाजवळ पहात होतें. तो पुन्हां ह्मणाला.

'पुढें तुझा जन्म कसा होईल याचें मला मोठें नवल वाटतें.'

त्याचें हें भाषण ऐकतांच माझ्या मनावर धाडकन् भीतीचा धक्का बसला.

'महाराज' मी ह्मटलें 'मी येथेंच राहीन. मला हें ठिकाण सोडून जावेंसें वाटतच नाहीं.'

'आणि तूं बाहेर जावेंस अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. तुला येथें आनंद व सुख होतें ह्मणून मलाही आनंद वाटतो. माझ्या आईची तुझ्यावर मर्जी असेल नाहीं बरें ?'

'पण ताराबाईंना मी आवडत नाहीं असें दिसतें.'

'तूं कशावरून हें ह्मणतेस ? ती तुझ्याशीं कधीं निष्ठुरतेनें अगर जुलमानें कां वागली ?'

'छेः तसा प्रकार मुळींच नाहीं, तथापि मी तिला आगंतुकासरखी दिसतें.'

'कमले' तो ह्मणाला 'ही निव्वळ तुझीच कल्पना.' लगेंच खालीं वाकून त्यानें माझ्या हाताचें चुंबन घेतलें.

यावेळचा माझा आनंद अवर्णनीय होता. मला तेव्हां हंसूं आलें पण मी तें बाहेर समजूं दिलें नाहीं.'

तो ह्मणाला 'तुझें स्वरूप व गुण हीं इतकीं सुंदर आहेत कीं तूं माझ्या आईच्या प्रेमास पात्र झालीच पाहिजेस.'

'हो, तसें झालें असतें. पण ती ताराबाई आहे व मी अनाथ, धड नांव नसलेली अशी मुलगी आहे.'

'तूं सर्वकाळ अशीच अपूर्ण नांवाची राहशील असें मात्र समजूं नको. स्वरूप व गुण या दोन अप्रतिम देणग्या तुला परमेश्वरानें दिल्या आहेत, त्याच्या योगानें तुझ्या दैवरूप ताऱ्याचा उदय कधींना कधीं तरी होईल.'

मी मनांत ह्मटलें 'माझ्या दैवरूप ताऱ्याचा उदय होण्याचा राहिला नाहीं. तो पूर्ण प्रकाशित असून त्यानें मला आपल्या पुढें आणलेंही आहे.'

आह्मीं बंगल्याकडे बोलत उभी राहिलों त्या दिवसापासून कुमारसिंगाच्या स्वभावांत खूपच फरक पडला. माझ्याशीं बोलण्याची त्याला मोठी हौस असे. मी नदी किनाऱ्यावर, बागेंत अगर जंगलांत फिरावयास गेलें ह्मणजे तो माझ्या मागून येत असे. रानटी फुलें व पक्षी यांची मला त्यानें खूपच माहिती करून दिली. आह्मीं नदी किनाऱ्यास फिरलों. डोंगरीवर चढलों, नाचलों--बागडलों, यामुळें माझें प्रेम विशेष बसत चाललें. ताराबाईस हा मजकूर कळल्यास ती काय ह्मणेल याची कल्पनाच मला नव्हती. दुसऱ्यानें जर बळेंच होऊन अमृताचा पेला ओठांस लावला तर तो पिण्यास काय हरकत; असेंच मला वाटूं लागलें.

याप्रमाणें माझी ती कौमार्यावस्थेंतील प्रीति माझ्या अंतःकरणांत, ध्यानांत-मनांत व स्वप्नांत भरून राहिली. स्वतःच्या मोठेपणाच्या सुखांत जसा एखादा मनुष्य बुडून जातो, तद्वत मी राहूं लागलें. माझे त्याच्या सहवासानें बरेच दिवस गेले, परंतु त्याच्या तोंडून प्रेम-

शब्द मी एकदांही ऐकला नाहीं. फक्त तो माझी बर-दास्त मात्र उत्तम रीतीनें ठेवीत होता.

अशा स्थितीत पहिले कांहीं महिने लोटले. माधु-र्यावांचून मला दुसरीं प्रेमाचीं चिन्हें माहीत नव्हतीं. विरहव्यथा, सुंदर वस्तूच्या ठिकाणीं अप्रीति व मात्सर्य यांची मला कल्पनाच नव्हती.—लहानसहान पण सुंदर अशा अनेक झऱ्यांवर चंद्र प्रकाशतो, तथापि त्या सर्व झऱ्यांस एकच चंद्र दिसतो.—कुमारसिंग प्रत्येकाशीं प्रेमानें वागे व सर्वांस तो आवडे परंतु, मला सर्व जगांत प्रेम करण्यास योग्य असा तो एकटाच वाटत होता. माझ्यानें दुसऱ्याकडे पहावतनासेंच झालें.

तो चैत्राचा महिना होता. एके दिवशीं माझ्या मनावर भीतीचा धक्का बसला. माझ्या या प्रेमाच्या गोष्टीचा शेवट होईल असें मला वाटलें नव्हतें. कुमार-सिंग दुसऱ्या मुलीशीं लग्न करून घेणार हें मला समजलेंच नव्हतें. मी तेव्हां माझी घटकानघटका इतक्या चैनींत व सुखासमाधानांत घालविली कीं, माझ्या मनांत पुढचा विचारच आला नव्हता.

कैलासवासी महाराजांच्या दुःख प्रदर्शनांत तारा-बाईनीं कांहीं दिवस एकांतवासांत घालविण्याचा निश्चय केला. कुमारसिंगानेंही आपल्या आईच्या विचारा-नुरूप एकांतवासांत दिवस काढण्याचें कबूल केलें. नंतर हीं उभयतां कोणाच्या दृष्टीस पडेनातशीं झालीं.

हें व्रत त्यांनीं एक महिनाभर केलें. चैत्राचा महिना संपला. वैशाख आला, तेव्हां त्यांनीं आजुबाजूच्या सर्व लोकांस भोजनें देण्याचा क्रम चालविला. मोठ

मोठ्या लोकांकरितां बागेंत मेजवान्या सुरू झाल्या. 'जेव्हां पाहुणे पै येतात तेव्हां तूं कोणाच्या. दृष्टीस पडूं नको; आपल्या खोलींतच बसत जा' अशी ताराबाईनें मला ताकीद दिल्यामुळें माझा निरुत्साह झाला होता. मला खोलींत चैन पडत नसे पण सुरुंगांतील कैद्याप्रमाणें ताराबाईची आज्ञा शिरसामान्य करून मी तेथेंच पडून रहात होतें.

नंतर तिचें तिलाच काय वाटलें नकळे. तिनें मला गाणें ह्मणून व बीन वाजवून पाहुणे मंडळीस खुष करण्याचें काम सांगितलें. मी तें उत्तम रीतीनें बजावलें ह्मणून तिनें मला एक बहुमोल अंगठी बक्षीस दिली.

या चैत्राच्या महिन्यांत जेव्हां मी माझ्या मनावर प्रथमच भीतीचा धक्का बसला ह्मणून सांगितलें, ते दिवशीं ताराबाईनीं वनभोजनास सर्वत्र मंडळी बोलावली होती. मला तिनें कांहीं बोलावलें नव्हतें ह्मणून मी गेलें नाहीं. मी माझ्या खोलींतच बसून होतें.

कांहीं वेळानें ताराबाईचें मला बोलावणें आलें, अर्थात बागेंत जमलेल्या मंडळीचें दर्शन घेण्याची मला इच्छा उत्पन्न झाली व मी रंधपाक घरच्या बाजूनें बागेंत गेलें. तेथें प्रथमदर्शनीच मीं दोन मुली पाहिल्या. त्या पटांगणांतील मोरांस चारा देत होत्या. त्यांपैकीं एकटी ह्मणाली-

'कुमारसिंगाशीं विवाह झाल्यास तूं त्याची राणी होशील. मग तुला कितितरी आनंद होईल नाहिं बरें?'

'कुमारसिंगाशीं विवाह?' मी ह्मटलें 'त्याचें लग्न झालें तर मग माझी काय वाट?'

निराशेनें माझें मन उदास झालें व नखानें भुई कोरत मी तेथेंच क्षणमात्र उभी राहिलें. ज्याच्यावर मी मनोभावानें प्रीति ठेविली होती, ज्या मूर्तीचें मी प्रेमानें पूजन व मनन केलें होतें, व जो सर्वस्वी माझाच असें मला वाटलें होतें, त्याच्या गळ्यांत ही भलतीच माळ घालायला सजलेली पाहून मला कसें बरें चैन पडणार? सूर्य रक्ताप्रमाणें लाल भासूं लागला व ती सर्व शोभा मला तेजशून्य दिसूं लागली. इतक्यांत दुसरीचा मधुर स्वर माझ्या कानांत पडला.

ती पहिलीस ह्मणाली 'तूं तरी संपत्तीवर भुलून त्याला माळ घालण्यास तयार झालीस, पण मला तिची मुळींच पर्वा वाटत नाहीं. कुमारसिंगाजवळ ती असो वा नसो, मी केवळ त्याच्या त्या नीलवर्ण दृष्टीवर व मनोहर मुखचंद्रमावर अनुरक्त होऊन त्याच्या गळ्यांत माळ घालण्यास तयार आहे.'

हे शब्द मला पूर्वीपेक्षां जास्त झोंबले. पहिली फक्त राणी होईन या आशेनें संपत्तीवर भुळली होती व दुसरी स्वरूपावर भुळली होती; यामुळें माझें मन भ्रमिष्ट झालें. मीं त्या दोघींकडेही बारीक नजरेनें पाहिलें. त्या तरुण होत्या. त्यांचें स्वरूप सुंदर होतें, तथापि माझें मन मला सांगूं लागलें कीं, कुमारसिंग त्यापैकीं एकीचें ही पाणीग्रहण करणार नाहीं, यदाकदाचित् विवाह झालाच तर मग मला येथें क्षणमात्र रहावयाचें नाहीं असेंही मी ठरवून ठेविलें.

इतर मंडळीकडे पाहून मला मग आनंद वाटेना. ताराबाईच्या निरोपाविषयीं देखील मी बेपर्वा वागलें. माझें अंतःकरण दुःखानें व्याप्त झालें होतें. मी तशीच मागच्या पावलीं तडक दिवाणखान्यांत आलें. तेथें माझ्या प्रियाची—त्या मदनस्वरूपी कुमारसिंगाची—तसबीर झळकत होती, तिच्या समोर जाऊन उभी राहिलें. सुंदर पोषाख केलेल्या, सुखांत वाढलेल्या व लग्नाविषयीं हांसत खेळत गोष्टी बोलणाऱ्या त्या दोघी मुलींचीं मला आठवण झाली. त्यांपैकीं एक फक्त संपत्तिवर भुलून व दुसरी स्वरूपावर मोहून त्याला वरणार होती, परंतु माझ्या या प्रेमाच्या तोडीचें प्रेम दोघींपैकी एकीचेंही नव्हतें. माझें प्रेम प्रत्यक्ष कुमारसिंगास देखील माहीत नव्हतें, मग इतरांस काय कळणार ? तें माझें प्रेम माझ्याबरोबरच मातींत मिसळून जाणार होतें. मला मुळींच शुद्धि नव्हती, मी त्या तसबिरीकडे पाहून ह्मटलें.

'महाराज ! तुह्मी आपले मिटलेले ओंठ उघडा आणि कमले ! तुझ्यावर माझें पूर्ण प्रेम आहे असें ह्मणा ह्मणजे माझ्या मनास थोडा धीर येईल. कमले ! तूंच माझ्या प्रेमास योग्य एवढीं अक्षरें ह्मणा ह्मणजे मग मला मरण आलें तर देखील मी मोठ्या आनंदानें हांसतखेळत मरेन.'

ही माझी स्थिति फार वेळ नव्हती. मी लागेच शुद्धीवर आलें. सुवरगडच्या तरुण वारसदाराच्या तसबिरीकडे, वर डोळे करून प्रेमानें पहाण्याचा, माझ्या सारख्या अनाथ व निनावी मुलीस काय बरें अधिकार ?

असा विचार माझ्या मनांत आला. त्याच्या लग्नाचा दिवस लवकरच ठरेल. त्या दिवशीं त्याच्या मनानुरूप कोणत्याही कुमारिकेच्या गळ्यांत तो प्रेमानें हार घालील. त्याला प्रतिबंध कोण करणार ? असेंही मला मग वाटूं लागलें.

## प्रकर्ण ८ वें.

### प्रेमकुवर.

ताराबाई मला विशेष महत्त्वानें वागवीत नसत. अर्थात दुसऱ्या लोकांच्या मनांतही माझ्याविषयीं पुज्यबुद्धि नव्हती. कुमारसिंग कांहीं तरुण मुलींशीं बोलत होता पण त्याच्या त्या अभिमानी आईस तें आवडत नव्हतें. माझ्याविषयीं तर तिला तिळमात्र संशय नव्हता. कारण कुमारसिंगाशीं लग्न लावण्याइतक्या योग्यतेची ती मला मानीतच नव्हती.

एके दिवशीं आम्ही कांहीं कविता वाचीत बसलों होतों. तेव्हां निशिगंध या विषयावर केलेल्या कांहीं कविता आमच्या वाचण्यांत आल्या. मीं ' निशिगंध ' म्हणजे काय म्हणून त्याला विचारलें, तेव्हां तो म्हणाला

' तें एक प्रकारचें फूल आहे. त्याला दिवसा वास येत नाहीं, पण रात्रौ त्याचा मनोहर सुगंध मनास भारी आल्हाद देतो.

मी मागचा पुढचा विचार न करितां ' मला तें पहा- वेंसें वाटतें ' असें ह्मटलें.

माझ्या उत्सुकतेचा त्याला मोठा चमत्कार वाटला. तो लगेच ह्मणाला ' कमले ! ' तुला तेंच नाहीं, पण तशा प्रकाराचें दुसरें फुल आमच्या बागेंत दाखवितों चल. '

अहाहा ! मला कितितरि हर्ष झाला असावा बरें ! मी त्याच्या बरोबर बागेंत गेलें. वैशाख महिन्यांतील ते दिवस. सभोंवतीं फुलांचे ताटवे प्रफुल्लित झाले होते. तो देखावा फारच रमणीय होता. त्या सुगंधिकप्रदेशात कुमारसिंगाबरोबर मी एकटीच होतें. हा एकांतवास पाहून माझ्या मुखावर तेज चढलें, माझे नेत्र प्रफुल्लित झाले, पण मी त्याच्या तोंडाकडे पहाण्यास भिऊं लागलें.

त्यानें मला पुष्कळ सुंदर सुंदर फुलें दाखविलीं, तथापि मी त्यांपैकीं थोड्यांचकडे पाहिलें हें सांगायला मला लाज वाटते. सर्व फुलांनां लाजविणारा असा कुमारसिंगाचा मनोहर चेहरा, तेवढा मात्र मी वरचे- वर चोरून पहात असे. त्यानें मला त्या सर्व फुलांचे गुणधर्म सांगितले, पण माझें लक्ष त्याच्या एकाही शब्दाकडे नव्हतें. मी त्याच्या स्वरूपांत तल्लीन होऊन गेलें होतें.

' कमले ' तो ह्मणाला ' तुझें लक्ष मी सांगतों इकडे नाहींसें दिसतें. '

' तें कसें ? माझें पूर्ण लक्ष आहे. '

' तर मग मी शेवटीं काय सांगितलें तें सांग पाहूं ? '

' खरोखरीच माझें लक्ष होतें ' मी खालीं मान घालून ह्मटलें.

'मग तूं वर कां बरें पहात नाहींस ?'

मी हळूच वर दृष्टि केली. अहाहा ! त्याला तेव्हां ाय वाटलें असेल बरें ? त्यानें माझ्या ओंठास आपली ोमल अंगुली लावून 'कमले' अशी मला हांक मारली ात्र, इतक्यांत ताराबाई त्या ठिकाणीं आली. तिनें ःटकन आम्हांकडे एकदां पाहिलें. कुमारसिंग जरा ावराबावरा झाला. माझे गाल लाल झ ले. ।साहेब मला त्यावेळीं कांहींच बोलल्या नाहींत. फक्त ोनें कुमारसिंगाला 'तुला मामी बोलावतो' इतकें ांगितलें. तो गेल्यावर ती माझ्याकडे वळली.

ती ह्मणाली 'तूं घरीं काम करीत असशील असें ला वाटलें होतें. तूं इकडे कशी आलीस ?'

'मासाहेब !' मी ह्मटलें 'मी निशिगंध फुलें पहा- ाला आले होतें.'

'असें काय ? कमले !' ती ह्मणाली 'तूं कुमार- संगाशीं मोकळ्या मनानें वागतेस व तोही तुझ्याशीं ासा बोलतो चालतो ह्मणून तुझ्या त्याच्या योग्यतेंत ुष्कळ अंतर आहे, ही गोष्ट तूं विसरूं नको.'

'छेः' मी ह्मटलें 'मी ती विसरलें नाहीं व विसर- ारही नाहीं.'

'आणि तेंच चांगलें. माझा मुलगा तुझ्याशीं बोलतो ह्मणून तूं भलतेंच मनोराज्य करूं नको. दुसऱ्या एखाद्या वेळीं जर तो तुला फुलें पहायाला हाक मारील तर 'माझें काम आहे' असें सांगून तूं आपल्या

मजसारख्या भिकार पोरीची व तुवरगडच्या जहा-गीरदाराची तुलना केल्यास तिचें सांगणें अगदीं रास्त होतें, तथापि माझें मन संतापानें संतप्त झालें. हे माझ्या प्राणवल्लभा ! तूं एखादी गोष्ट सांगितलीस तर मी तिचा अव्हेर कसा करूं.

ताराबाईनें मला कांहीं काम सांगून धाडून दिलें. संतापानें माझीं गात्रें जळूं लागलीं. माझ्या हातांस कांपरें सुटलें. कशिद्याची सुई हातांत धरतां येईना. गाल रसरसले, इतकें झालें तरी, तिचें म्हणणें अगदीं रास्त होतें असें मला वाटत होतें तें होतेंच.

माझ्या हाताचें कुमारसिंगानें चुंबन घेतलें ही गोष्ट जर समजली तर तिला काय वाटेल, इकडे माझें लक्ष गेलें. मी थोरामोठ्यांच्या कुळांत जन्मलें असतें व माझीं लुगडीं वगैरे झगझगीत असतीं, तर मग मला 'माझें काम आहे' असें सांगण्याची पाळी आली नसती. ताराबाईचा तो बहुतेक सगळा दिवस विचारांतच गेला. ती कांहीं गहन विचारांत होती असें मला दिसलें.

आतां नाहीं तरी रात्रीं कुमारसिंगाची मला भेट होईल, ह्मणून मी तयारींत होतें. डोकींत माळण्याकरितां व गळ्यांत घालण्याकरितां मीं कांहीं गुलाबाचीं फुलें गोळा करून हार केले व आरशापुढें उभी राहून ते माळले. मी पांढरें पातळ नेसून त्याला भेटायला जाणार होतें.

निदान दोन तास तरी त्या खोलींत त्याची माझी

गाठ पडेल. मग विरही मनुष्याच्या प्रेमाचें गाणें मी त्याला ह्मणून दाखवीन. तें प्रेम माझ्या हृदयांतून कधींच नष्ट होणार नाहीं, मात्र त्यानें प्रेमानें माझ्याकडे पाहिलें पाहिजे. पूर्वीप्रमाणें कदाचित् तो माझ्याकडे येईल. मला रुचतील असे गोड गोड शब्द बोलून माझें रंजन करील अशा एक का दोन, हजारों कल्पना माझ्या मनांत येऊन मी आनंदसागरांत पोहत होतें. इतक्यांत ताराबाईकडून चंद्रा दासी आली. माझा हा थाट पाहून तिला हंसें आलें.

'कमले' ती ह्मणाली 'हीं फुलें आतां काढून टाक. कारण आज गाण्याकरितां तूं दिवाणखान्यांत येऊं नको' असें ताराबाईनें तुला सांगितलें आहे.

सूर्यबिंबास ज्याप्रमाणें अभ्रें काळोखी आणतात तद्वत या निरोपानें माझा मुखचंद्रमा काळवंडला. माझ्या मुखांत माती पडली. तोंडावरचें पाणी गेलें. दृष्टी मंद झाली. तीं गुलाबाचीं प्रफुल्लित फुलें कोमेजलेल्यासारखीं दिसूं लागलीं. सर्व आनंद व उल्हास नाहींसा झाला. रात्रीच्या काळोखाप्रमाणें माझ्या अंतःकरणांत दुःख रूप काळोख पडला.

मला त्याचें दर्शन व्हावयाचें नव्हतें. मध्यानरात्र झाली तरी मी आपल्या खोलींत बसलेलीच होते. माझ्या बाजूच्या खोलींत गाणें बजावणें चाललें होतें. मला तें मरणप्राय कडू वाटलें. थोडी झोंप घ्यावी ह्मणून मी अंथरुणावर पडलें, पण ती येईना. माझ्या डोळ्या समोर पूर्वीच्या दोन कुमारिका आल्या. त्यांचें बोलणें

माझ्या कानांत गुणगुणूं लागलें. पहिली त्याच्या संप-त्तिवर भुलून त्याला माळ घालणार होती व दुसरी केवळ त्याच्या सौंदर्यावर मोहूनच त्याला वरणार होती.

दुसरे दिवशीं ताराबाईचें मन उल्हासित होतें, व मीही त्या दिवशीं थोडी सुखासमाधानांत होतें. कुमारसिंगाची व माझी गांठ पडली. मला पहातांच त्याचा चेहरा खुलला.

'कमळे !' तो म्हणाला 'रात्रीं दिवाणखान्यांत तुझी वाट पहात मी किति तरि वेळ बसलों होतों. तुझें गाणें ऐकून मला किति आनंद होतो, हें तुला माहीत नाहीं काय ? तितका तुझा सहवास मला चुकल्या-सारखा वाटला.

मी त्याच्या या प्रश्नास उत्तर देणार होतें, इतक्यांत चंदा दासी जवळच उभी असल्याचें मीं पाहिलें. तिनें आमचा सर्व प्रकार ताराबाईस सांगितला असें मला कळलें, म्हणून मी खालीं मान घालून स्तब्ध उभी राहिलें. त्याच्या भाषणानें मला क्षणमात्र सुख झालें.

ती संध्याकाळची वेळ होती. मी जेवलें नव्हतें. अशा वेळीं ताराबाईनीं मला बोलावणें घाडलें. ती आपल्या निजायच्या खोलींत पलंगावर कलंडली होती. मी तिकडे गेलें तेव्हां; मला तिनें कांहीं पत्रें लिहायाला सांगितलीं. नंतर ती खिडकीकडे उठून गेली. मला तिच्या तोंडाकडे बघवेना व मला वाटलें दुसऱ्याच्या सुखावर पाणी ओतण्यास जे लोक सदा तत्पर अस-तात, त्यांच्या तोंडाकडे थोड्याच लोकांनां पहावेसें वाटेल.

'कमले !' ती म्हणाली 'पुढच्या आठवड्यांत आमच्याइकडे कांहीं पाहुणे मंडळी यावयाची आहेत. अमरसिंग—माझ्या मुलाचा शाळेंतील सोबती—शीतळा देवी,—उज्जयनीच्या सेनापतीची बायको—व प्रेमकुंवर इतकी मंडळी येणार आहेत. प्रेमकुवर तुझ्या प्रमाणेंच वीथ वाजविणारी फार उत्तम आहे. तिचा कंठही मोठा मंजुळ आहे. ती मंडळी आल्यावर मला तुम्ही विशेष जरूर लागेलसें दिसत नाहीं.'

ती कांहीं वेळ थांबली व पुन्हां मोठ्या आनंदानें म्हणाली.

'तुला सांगायला मला मोठा आनंद वाटतो की प्रेमकुंवर व कुमारसिंग यांचा प्रेमसंबंध फार दिवसां पासून जुळला आहे. त्यांचा आतां लवकरच विवाह होईल.'

ओलंबाच्या रसरशीत रसाचा एकेक थेंब पडावा तद्वत तिचा प्रत्येक शब्द माझ्या अंतःकरणावर डाग देऊं लागला. मी तटस्थ बसलें. माझ्या तोंडावर प्रेत कळा आली. तिनें परतून माझ्याकडे पाहिलेंही नाहीं.

ती पुन्हां म्हणाली 'मी तुला दोष देत नाहीं. पण तूं हीनावस्थेंतील पोर आहेस, हें तुझ्या लक्षांत असूं दे. मी सांगावें असें नाहीं. तुझें तुलाच तें समजलें पाहिजे. प्रेमकुवर आल्यावर तूं तिच्या सहसा दृष्टीस पडूं नको.'

मी काय बरें उत्तर द्यावें ? ती म्हणाली तें सर्व खरें पण मला तें सहन होईना. तिच्या शेवटच्या भाषणाचा मला भारी राग आला. तिच्या भाषणानें माझ्या काळ-

त्रास घरे पडले, पण करणार काय? 'तुम्ही सांगाल ती प्रत्येक गोष्ट मला मान्य आहे' इतकेंच मी म्हटलें. माझ्यानें मग तेथें रहाववेना. मी तडक माझ्या खोलींत निघून आलें व तोंड पांघरुणांत गुरफटून मी माझ्या अंथरुणावर स्वस्थ पडलें. यावेळीं मरणावांचून मला दुसरें कांहींच प्रिय नव्हतें.

हाय! हाय!! माझ्यासारखी दुःखी व दुर्दैवी मुलगी दुसरी एखादी तरी पृथ्वीच्या पाठीवर असेल काय? **कुमारसिंगा**चा विवाह **प्रेमकुंवर**शीं होणार होता. तोंपर्यंत माझी प्रीति किति वाढेल तें मला समजेनासें झालें. माझी पुढें काय दशा होईल तेंही मला कळेनासें झालें.

बंगल्याकडे त्याचें माझें जें संभाषण झालें तितकें गोड तो कोणाशींच बोलत नसेल, असें मला वाटलें. स्वप्नांतील गोष्टी देखील खऱ्या झाल्या नाहींत ना? त्याच्या त्या प्रेमळ दृष्टींतील प्रेमही खोटेंच ठरणार ना? माझ्या तोंडावरील तेज नाहींसें होत चाललें 'मी लग्न करून घेणार' असें देखील त्यानें मला सांगितलें असतें पण छेः माझ्यासारख्या यःकश्चित् मुलीस तो तें काय म्हणून सांगेल?

**प्रेमकुंवर**शीं **कुमारसिंगा**चा विवाह झालेला माझ्यानें बघवणार नाहीं. मला मग बाहेर निघून जावेंच लागेल. माझें अंतःकरण त्याच्यावर जडलें होतें. मी त्याची मूर्ति मनांत रात्रंदिवस चिंतित होतें आणि तो दुसरीशीं विवाह करणार ही अनिष्ट गोष्ट मला कळली.

**प्रेमकुंवर** ही कशा प्रकारची स्त्री असेल बरें! ती उंच, सुंदर व राजकीय थाटानें वागणारी असेल काय?

**कुमारसिंग** तिच्याशीं सहल करील काय? माझ्या हाताचें त्यानें चुंबन घेतलें तद्वत तिच्याकडे पाहून तो तिच्या हाताचें चुंबन घेईल काय? जर तसें होईल तर मग मला जगांत रहावयालाच नको अशा अनेक कल्पना माझ्या मनांत येऊं लागल्या. मत्सरानें माझ्या अंगाचा दाह होईल. मला त्याचें तें सुख पहावणार नाहीं. मरण आलें तर बरें होईल असें ही मला वाटूं लागलें.

माझी प्रीति निष्फळ हें मला पूर्वींच कळलें होतें. माझें प्रेम त्याच्यावर एवढ्याच करितां बसलें कीं तो माझ्याशीं प्रेमभावानें वागत आला. एवढ्याचकरितां कीं तो संपत्तीनें व मानानें उच्च स्थितींत असून, त्यानें माझ्यासारख्या अनाथ मुलीची कींव बाळगली. एवढ्याचकरितां कीं तो थोर मनाचा **कुमारसिंग** माझ्याशीं सभ्य रीतीनें बोलला. अहाहा! अशा पुरुषास वरणारी **प्रेमकुवर** कितितरी दैववान असली पाहिजे!

* * *

मी दक्षिणेकडील पायऱ्यांवरून खालीं उतरत होतें इतक्यांत **ताराबाईनीं** तुला लवकर बोलविलें आहे असा निरोप आला. 'लवकर' हें तिच्या प्रत्येक निरोपांत असावयाचेंच मी **कुमारसिंगाच्या** अगदीं जवळून गेलें. माझी ही घाई पाहून त्याला हंसूं आलें. **प्रेमकुवरशीं** त्याचा विवाह होणार ह्मणून कळल्यापासून मी त्याचें तोंड पाहिलें नव्हतें. माझें अंतःकरण दुःखानें इतकें व्याप्त झालें व शरीरास इतका कंप सुटला कीं माझ्यानें उभें राहवेना. माझें तोंड पांढरें फटिक झालें. माझे रक्ताप्रमाणें लाल ओंठ, राखेप्रमाणें ओंगळ झाले. मला बोलतां येईना.

कुमारसिंगानें माझे दोन्ही हात धरले, तेव्हां त्याचा चेहरा प्रफुल्लित झाला होता. त्याच्या दृष्टींत प्रेमाची झांक मारत होती, परंतु तो दुसऱ्या स्त्रीशीं विवाह करून घेणार असल्यामुळें मी त्याला माझें प्रेम व्यक्त केलें नव्हतें.

तो ह्मणाला ' कमले ! तुला पाहून खूप आनंद झाला. पुष्कळ दिवसांत मी तुला पाहिलें नव्हतें. इतके दिवस तूं दडून कां बसली होतीस ? '

' होय; दडून बसलें मग त्यांत काय झालें ? ' मी अविचारानें उत्तर दिलें. मला भेटण्याची त्याला आतां काय जरूर ? तो सुंदर व श्रीमंत कुमारिकेशीं विवाह करणार होता, ह्मणून मी त्याच्याकडे मत्सर बुद्धीनें पाहूं लागलें.

' काय ? कमले ' तो ह्मणाला ' काय बरें तें ? तूं आजारी का आहेस ? तुला सुख होत नाहीं काय ? तुझ्या तोंडावरील व डोळ्यांमधील तेज नाहींसें झालें. '

' तेज नाहींसें झालें व मी मेलें ह्मणून जो प्रेमकुवरशीं लग्न लावणार त्याला माझी काय काळजी ? मी मनांत ह्मटलें.

' तूं आपल्याशींच काय गुणगुणतेस ? मला तें सांगण्याजोगें नाहीं काय ? ' तो ह्मणाला.

त्याचें हें भाषण ऐकून वाटलें कीं तो मला आपल्या पोटाशीं धरील व माझें चुंबन घेईल. माझ्या हृदयांतून कोपाग्नीच्या ठिणग्या बाहेर पडत होत्या. सौंदर्य व ऐश्वर्य यांवर अनुरक्त झालेल्या पुरुषानें माझें चुंबन कां घ्यावें ? त्यानें आपल्या प्रियपात्राचेंच चुंबन

घ्यावें, असें मला वाटूं लागलें. माझ्या अंगास थरकाप सुटला, तथापि माझें प्रेम त्यावर जडलें होतें तें होतेंच. मी त्याच्या हातांतून माझे हात झिडकारून घेतले व म्हटलें.

' मला गेलेंच पाहिजे. मासाहेबांचें फार जरुरीचें काम आहे. ,

त्या ठिकाणीं एक क्षणभरच जर जास्त राहतें तर मी मोठ्या पंचायतींत पडलें असतें. मी झटकन दूर निघून गेलें, तेव्हां तो माझ्याकडे निराशेनें व दुःखानें पाहूं लागला. ' जिच्या गळ्यांत माळ घालणार तिच्याशींच क्रीडा-विनोद करून तो सुखाचा अनुभव घेतो ' असें मी म्हटलें पण, त्याची ती नैराश्ययुक्त प्रेमदृष्टी माझ्या मनास बाणासारखी टोंचूं लागली.

वाटेंत मला मोठा एक आरसा होता, त्यांत जातां जातां सहज मीं पाहिलें. माझ्या तोंडावरचा नूर उत-रला होता असें मला दिसलें.

*　　*　　*

पुढें दोन दिवसांनीं पाहुणे मंडळी आली. अमर-सिंग हा शिपाई बाण्याचा पाणीदार मनुष्य होता. सीतलादेवी हिचें नांवच तेवढें शीतळ, एरवीं ही फार भयंकर दिसत होती. प्रेमकुंवर ही फार नाजुक व सुंदर होती. मला हीं सर्व माणसें जिन्यावरून दिस-लीं. त्यावेळीं तीं जेवायला जात होतीं. प्रेमकुंवरच्या हातांत हात घालून कुमारसिंग जात होता, परंतु तिच्या लावण्य-स्वरूप त्याचें स्वरूप नव्हतें असें मला दिसलें

माझ्या काळजास जिनें पीळ घातला त्या माझ्या प्रतिस्पर्धिनीच्या स्वरूपाचें मी कसें बरें वर्णन करूं? ती स्वरूपाची केवळ खाण होती. तिचें अंग मालतीच्या पुष्पाप्रमाणें नाजुक व मनोहर होतें. मोत्यांच्या शिंपांसारखें तिच्या नखांवर तेज विराजत होतें. तिचा केशकलाप भृंगकांतिप्रमाणें काळाभोर होता. डोळे हरिणीसारखे विस्तीर्ण व इंद्रनील मण्याप्रमाणें सतेज दिसत होते, प्रेमकुंवर हा एक चित्तवेधक प्राणी होता. ती उंच पण, रूपानें खूबसुरत होती. तिच्या हातांचीं मनगटें वगैरे गरगरीत व गोरवर्ण होतीं. तिच्या हातांत रत्नजडित बाजुबंद झळकत होते. तिचा पोषाख फार मौल्यवान होता.

माझ्यासारख्या काळसर, निनामी व फाटकी लुगडीं नेसणाऱ्या पोरीस तसा पेहेराव व त्याच्याशीं बोलण्याची संधि कशी मिळणार! मी त्याच्यावर प्रेम ठेवलें तोच माझा मूर्खपणा होय. ती हांसत हांसत त्याच्याशीं बोलत होती व तो तें भाषण मनःपूर्वक ऐकत होता, तें मीं पाहिलें. मीं हें एकांतीचें भाषण ऐकलें, याबद्दल परमेश्वर मला क्षमा करो. माझ्या प्रियावर प्रेम करणाऱ्या त्या प्रेमकुंवरचा हरप्रयत्नानें प्राण घ्यावा अशी माझ्या मनांत कल्पना आली. माझ्या या कोमल अंतःकरणांत इतका मत्सर भरला होता. पुढें पुढें कांहीं दिवस लोटल्यावर वाड्यांत काय चाललें आहे याचा मला पत्ताही लागत नव्हता. तेव्हां वाड्यांत पुष्कळच पाहुणे भरले होते. त्यापैकीं कांहींजण सकाळीं घोड्यावर बसून रपेटीला जात, कोणी गाडींत बसून

फिरायला जात व कोणी तसेच पायीं सहल करावयास जात. ही सर्व मंडळी याच वेळीं मला बघायला मिळे.

कुमारसिंग व प्रेमकुवर हीं दोघें सदोदीत मिळून असत. हीं दोघें जाऊं लागलीं ह्मणजे, मी माझ्या खिडकींतून त्यांना पहात असे. हीं दोघें रपेटीकरितां घोड्यावर बसून बाहेर पडत, तेव्हां कुमारसिंग एकवार मागें वळून माझ्या खोलीकडे पाही व तेथें कोणी नाहींसें पाहून, तो मोठ्या निराशेनें बाहेर रपेटीस जाई. तो मागें पाहूं लागला ह्मणजे मला वाटे कीं, तो मला तर पहात नसेल ना ?

माझी खोली सर्वांहून वर असून हवाशीर होती. खालून पायांतील पैंजण वाजवीत प्रेमकुवर वगैरे जाई तें मला समजे. त्या बोलत तें व त्यांचें गाणें बजावणें मला ऐकूं येई, पुष्कळशी तरुण मंडळी एकत्र जमून खेळत व विनोद करीत, तेंही मला कळे. दुसऱ्याचें सुख पाहून मला दुःख होऊं लागलें. त्यांच्याप्रमाणें मी ही तारुण्यानें मुसमुसलेली असून, माझ्या कपाळीं मात्र तसें सुख व तसा आनंद नसावा याचें मला भारी वाईट वाटे.

एके दिवशीं संध्याकाळीं चंद्र-प्रकाश पडला होता. पुष्पांचा परिमळ सर्वत्र पसरून हवा सुगंधमय झाली होती. प्रत्येक झाडझुडुप स्वच्छ दिसत होतें; अशा वेळीं माझ्या आवडत्या वीणाचा मंजुळ स्वर माझ्या कानीं पडला. तो ऐकतांच मला चैन पडेना. तिकडे जाण्याविषयीं माझें मन उतावीळ झालें, पण करणार काय ? पाहुणे मंडळीस दिसेन तर, मासाहेब रागावतील

ह्मणून मला स्वस्थ जागच्याजागीं बसावेंसें वाटलें. पण छेः मला चैनच पडेना, शेवटीं मी पाय न वाजवितां हळूच लपतछपत जिना तेवढा उतरलें. नंतर कोणा नकळत थेट बाहेरच्या पटांगणांत आलें. तेथें एक गुलाबाचें मलें मोठें झाड होतें. त्या झाडानें खिडकीचा सरासरी अर्धा भाग व्यापला होता. मी त्या झाडाच्या आड उभी राहिलें. तेथून आंतील सर्व मनुष्यें मला दिसत पण, मी मात्र कोणाला दिसत नव्हतें. प्रेमकुवरनें तेव्हां मोत्यांचे व रत्नांचे खूप दागिने घातले होते व तिचा चेहरा मंगळाच्या चांदण्याप्रमाणें चमकत होता.

कांहीं वेळ गाणें बजावणें झाल्यावर बहुतेक सर्व मंडळी निघून गेली. फक्त कुमारसिंग व प्रेमकुवर हीं दोन माणसें मात्र आपापल्या जागीं स्वस्थ बसलीं होतीं. मी त्यांनां पहात तशीच उभी राहिलें.

एकंदर मंडळी बाहेर गेली असें पाहून त्यानें तिच्या कंठांत हात घातला व नंतर तिच्या उन्नत गालांचें तो बरेंच चुंबन घेऊं लागला. मला मग तेथें राहववेना ह्मणून मी परतलें व बंगल्याकडे धांवत गेलें. त्या ठिकाणीं गवत उंच वाढलें होतें. मी त्यावर बसून मनसोक्त रडूं लागलें. मी तेथें कोणाला दिसण्याजोगी नव्हतें व माझें रडेंही कोणाला ऐकूं येण्याजोगें नव्हतें. एवढ्या मोठ्या अंबराईतील बंगल्याकडे काय ती मी एकटीच होतें. माझ्या रडण्याचा कर्कश शब्द मीच ऐकावा, अशांतली माझी स्थिति होती. माझी दृष्टी ध्रुवनक्षत्रावर गेली तेव्हां तर माझें रडें अनावर झालें. अहाहा! कसल्या ठिकाणीं त्यानें मला आणलें! आतां

मीं काय करावें ? मीं त्याच्यावर प्रेम ठेवलें ही माझी मोठी चूक झाली.

'कमले ! अनाथ बाळे ! तूं या ठिकाणीं काय करतेस ? चूक कसली झाली.'

कुमारसिंगाचा स्वर ऐकतांच मी चटकन उठून उभी राहिलें. त्यानें मला पुन्हां तोच प्रश्न केला, तेव्हां मी ह्मटलें.

'चूक कसली ? मनुष्य प्रत्येक गोष्टींत चूक करतें. बरें पण महाराज ! मी येथें आहे हें आपणाला कुणी सांगितलें ?'

'सांगणार कोण ? कमले ! मी खिडकींतून बाहेरची शोभा पहात बसलों होतों. तेथें तुझा रुदन-स्वर मला ऐकूं आला.'

'मग मी येथें आल्याचें सगळ्यानांच कळलें ह्मणायचें ? आतां माझी काय वाट ?'

'कमले ! भिऊं नको. तूं येथें आल्याचें वाड्यांत कोणा एकालाही माहीत नाहीं. तुझा रुदन-स्वर फक्त मलाच ऐकूं आला व तो ऐकतांच तुझ्याप्रमाणेंच मीही कोणास नकळत इकडे आलों.'

'पण आपण तरी इतके श्रम कां घेतलेत ?'

'कमले तुझ्या बाबतींत मला बिलकूल श्रम होत नाहींत, उलट मोठा आनंद होतो. तूं नसलीस ह्मणजे मला कितितरि उघडें उघडें दिसतें, तुला एक क्षणमात्र दृष्टीआड करूं नये अशी माझी मनोदेवता मला सांगते.'

मला या बोलण्याचा मोठा राग आला व मी ह्मटलें,

'हूं पुरे, पुष्कळ झाली असलीं वरपांगीं बोलणीं मला समजतात.

'कमले! अशी रागाऊं नकोस, नीट विचार कर. तूं माझें बोलणें वरपांगी कशावरून ह्मणतेस बरें?'

'कशावरून ह्मणजे? मला एवढेंही कळत नाही काय? आपल्या प्रीतीसपात्र वाटणारी सुंदर नवरी गळ्यांत हात टाकून बसायला मिळाल्यानंतर माझी काळजी कोण घेणार? त्या सुंदर सुंदर मुली आपल्या सधोंवार मिळतात, तेव्हां माझें तुह्मांला मुळींच स्मरण होत नसेल!'

'कमले! पाहिजे असल्यास त्यांनां तूं सुंदर ह्मण, पण तुझ्या निम्में देखील त्यांच्या तोंडांवर तेज नाहीं.' तुझ्यापुढें प्रेमकुवर ह्मणजे गुलाबाच्या फुलांत गुलबाक्ष ठेवल्याप्रमाणें दिसते.

'तर मग,

मी एवढेंच ह्मणून चपापल्यासारखी झालें, मध्येंच तो ह्मणाला.

'तर मग काय? मध्येंच कां थांबलीस? काय तें स्पष्ट सांग.'

'तर मग तिच्यावरच तुमचा प्रेमा इतका कसा बसला?'

इतके शब्द माझ्या तोंडून पडतात न पडतात तोंच माझ्या डोळ्यांत झरकन अश्रुबिंदु दाटले. ते पाहून तो ह्मणाला.

'कमले! हें काय? तुझ्या डोळ्यांत अश्रुबिंदु कां बरें आले?'

माझ्या तोंडून शब्दच फुटेना, तेव्हां त्यानें लगेंच मला आपल्या बाहुद्वयांत धरलें व माझें चुंबन घेतलें.'

अहाहा! या वेळीं माझ्या मनांत कितितरि आनंद वाटला असेल बरें? तो आपल्याशींच कांहीं बोलत होता. ज्याचें मी मनांत पूजन करीत असे, जो प्रेमकुवरशींच विवाह करणार होता, तोच मला प्रेमानें पुन्हां आलिंगन देऊं लागला; पण, मी त्याला झिटकारून दूर सरलें व हाटलें.

'मला मिठी मारण्याचा तुह्मांस धीर तरी कसा झाला! मला आपण प्रेमकुवर ह्मणून तर समजला नाहीं ना?'

'छेः तसा प्रकार तर मुळींच नाहीं. तुझ्या या मुखकमलावरून दुःखाश्रु गळूं लागले, ते मला बघवेनात ह्मणून ते पुसण्याच्या इराद्यानें मी तुझ्याजवळ गेलों.'

'असें काय? तर मग तुह्मी माझे हे अश्रुबिंदु पुसण्याच्या भरीस पडूं नका, ते असेच वाहूंदेत. प्रेमकुवरच्या डोळ्यांतही आपल्या विरहानें असेच अश्रु वहात असतील ते पुसा, ह्मणजे तिचें मन सुप्रसन्न होऊन ती आपणास चुंबन तरी देईल.'

माझें हें मर्मभेदक भाषण ऐकून कुमारसिंगाचें तोंड अगदीं म्लान झालें.

'कमले!' तो ह्मणाला 'तूं अगदीं इतकी टोंचून बोलशील असें मला वाटलें नव्हतें. तुला माझी थोडी तरी दया येईल असाच माझा समज होता.'

'आणि माझाही पण अगदीं तसाच समज होता पण—

'पण काय?'

इतकें ह्मणून तो मला पुन्हां आलिंगन द्यायला पुढें सरसावला, पण मी सरकून त्याचे हात चुकविले. कारण मी स्तब्धच राहिलें असतें तर मी अर्पणकेलेल्या प्रेमानें मला पुरें रडविलें असतें.

या नंतर मला खरोखरीच यातना भोगाव्या लागल्या. जो तो कुमारसिंग व प्रेमकुवर यांच्याविषयींच बोलूं लागला. कोण कुमारसिंगाचें ऐश्वर्य व औदार्य वर्णन करी तर कोण प्रेमकुवरच्या सौंदर्याची तारीफ करी. त्यांचें कडाक्यानें लग्न होणार ह्मणून कित्येक लोक आनंद समुद्रांत पोहूं लागले.

एकेदिवशीं सकाळीं ताराबाई मला ह्मणाल्या कीं, 'तूं जर थोर घराण्यांत निपजली असतीस तर तुझें सौंदर्य, प्रेमकुवरच्या सौंदर्याहून कितिपटीनें तरी खुललें असतें.'

या तिच्या भाषणाचा मला एका वाटेनें खेद व आनंदही झाला.

* * *

सगळा चैत्र संपला, वैशाखाला नुकतीच सुरवात झाली होती. चंद्रप्रकाश उत्तमप्रकारें पडला होता. पाहुणेमंडळी अद्याप वाड्यांतच होती. त्यांचा जाण्याचा बेत यत्किंचितही दिसेना, कुमारसिंगाचा मी मागें धिःकार केला, त्याचीं मला चांगलींच फळें भोगावीं लागलीं. त्याला माझ्याशीं कांहीं बोलावयाचें होतें, हें मला माहीत असूनही, तसें करण्यास मी त्याला संधि सांपडूं दिली नाहीं.

'पाहुणे मंडळीच्या तूं सहसा दृष्टीस पडूं नको,' ह्मणून ताराबाईनीं दिलेली ताकीद मी विसरलें नव्हतें.

मला तीची पक्की आठवण होती. मला एक पुस्तक पाहिजे होतें, तें वाचनालयांतून कसें आणावें या मी विवंचनेंत होतें, इतक्यांत घोड्यांच्या टापांचा आवाज मला ऐकूं आला, ह्मणून पाहिलें तर; सर्व मंडळी फिरायला निघाली होती. तें गेल्यावर मी वाचनालयाकडे निघालें. मला वाटलें कीं, प्रेमकुवरही रोजच्या प्रमाणें फिरावयास गेली असेल, पण ती ते दिवशीं घरीच होती. ती वाचनालयांत कांहीं पत्रें लिहीत बसली होती. तिला पहातांच मी उंबऱ्यांतूनच मागें परतलें तिनें मला पाहिलें व हांक मारली. ती ह्मणाली.

'कां बाहेरच्या बाहेरच निघाला ?'

'आपल्या कामांत व्यत्यय न यावा ह्मणून.'

'माझ्या कामांत ! आणि आपल्या येण्यानें ? मुळींच व्यत्यय येणार नाहीं तुह्मी खुशाल आंत येऊन बसा.'

मी मग आंत गेलें व वाचनालयांत अंथरलेल्या गालिच्यावर बसूं लागलें, तेव्हां तिनें माझा हात धरून मला आपल्या जवळच्या खुर्चीवर बसविलें. तिला मी कोण हें तेव्हां माहीत नव्हतें. जमलेल्या पाहुणे मंडळीपैकींच मी कोणी एक असेन असें तिला वाटलें.

पुढें तिनें मला 'तुह्मी कोण' असा प्रश्न केला.

'ताराबाईच्या खासगीकडे ज्या बायका आहेत त्यांपैकींच मी एक असून माझ्याजवळ, तिचीं पत्रें लिहिण्याचें काम आहे.' मी ह्मटलें.

ताराबाईची मी दासी असें तिला तेव्हां कळलें. तिच्या अंगाचा तिळपापड झाला. मला दिलेला पूर्वीचा मान ती विसरली. तिचे डोळे अग्निसारखे लाल झाले. तिची

अशी स्थिति पहातांच मला ताराबाईच्या सूचनेची आठवण झाली. इतक्यांत ती ह्मणाली.

'ताराबाईची तूं यःकश्चित दासी असून माझ्या बरोबरीनें खुर्चीवर बसायला तुला धीर तरी कसा झाला?'

'पण मी होऊन खुर्चीवर बसलें, कां आपण आग्रह केलात ह्मणून बसलें.'

'पुरे, पुरे,' जास्त बडबडूं नकोस, तुझ्या या फाजील वर्तनाबद्दलची गोष्ट मला ताराबाईच्या कानावर घातलीच पाहिजे.'

मी मग निमूटपणें उठून खोली बाहेर पडलें. प्रेमकुंवरच्या स्वभावाची मला पक्की खात्री झाली. ती मोठी गर्विष्ट, लोभी व नष्ट होती. माझ्याविषयीं तिच्या मनात फार वाईट कल्पना आली. सर्वस्वी प्रेमकुवरच्या भेटीचा परिणाम कांहीं चांगला झाला नाहीं.

तीही माझ्या मागोमाग ताराबाईकडे निघून गेली. माझ्याविषयीं तिनें तिच्या मनांत भलभलतेंच भरून दिलें असावें, कारण कांहीं वेळानें मला ताराबाईकडून, भेटून जाण्याविषयीं निरोप आला. मला पहातांच ती एकदम ह्मणाली.

'तूं कोणाच्या दृष्टीस पडूं नको ह्मणून मी तुला ताकीद दिली असावी असें वाटतें.'

'होय. आणि मी ती विसरलें नाहीं.'

'आणि ह्मणूनच वाटतें प्रेमकुवरशीं तूं इतकी उद्दामपणें वागलीस? तिच्या बरोबरीनें खुर्चीवर बसून चुरुचुरु बोलायला तुला लाज तरि कशी वाटली नाहीं?'

'मासाहेब!'

'हं पुरे कर ! पुढें एक चकारशब्द काढशील तर खबरदार ! मला तुझ्या स्वभावाची पक्की पारख लागली आहे. तुझा हा फाजिल अभिमान व स्वभाव आतां आमरणांत असाच रहाणार. आज प्रेमकुंवरचा पाणउतारा केलास, उद्यां दुसऱ्यास बोलशील आणि परवां स्वतः मला देखील येथें बसा—उठा ह्मणायला चुकायची नाहींस. तुला घराबाहेर हांकून द्यावें हेंच योग्य.'

'पण मासाहेब माझें ऐकून तरी आधीं घ्या, आणि मग काय माझी व्यवस्था करणार ती करा.'

'बिलकुल एक शब्द देखील आतां तुझ्या तोंडचा मला ऐकायला नको. तूं या वाड्याबाहेर निघून जा. बरें पण तुझें वय किती ?'

'सतरा'

'वय खूप आहे पण अक्कलमात्र तितकी नाहीं. आणि ती, बाहेर ठाथाबुक्या खाल्याशिवाय यायचीही नाहीं. तूं आजच्याआज वाड्यांतून बाहेर पड. जा, घे आपलें सामानसुमान बांधून.'

मी एक शब्द देखील न बोलतां तिकडून निघालें तेव्हां, माझ्या मनांत किती विचार आले असतील त्याचा वाचकांनींच विचार करावा. माझ्या अंगाचा संताप होऊन गेला होता. ताराबाईनें व प्रेमकुंवरनें माझ्याशीं फारच अन्यायाचें वर्तन केलें, परंतु त्यांस अन्यायी ह्मणण्याचा माझ्यासारख्या अनाथ पोरीस काय बरें अधिकार ! मला ताराबाईची आज्ञा मान्य करणें भाग पडलें.

# प्रकर्ण ९ वें.

## मी कोण.



मला घर सोडून जावयालाच पाहिजे होतें. मला माझें बाळपणचें घर टाकून पृथ्वीवर भटकत फिरण्याची ताराबाईनें आज्ञा केली. पृथ्वींतील सर्व पदार्थांत रमणीय दिसणारें असें जें प्रियाचें दर्शन तें घेण्यास मी मुकलें. 'प्रिया! आतां तुमची ती नीळवर्ण दृष्टी माझ्या पापी नजरेस कोठून पडणार? मी ताराबाईच्या आज्ञेनुरूप माझें सामान घेण्याकरितां ह्मणून, सर्व वाड्याभर फिरूं लागलें. माझें सामान असें दर असणार कसलें? नेसायचीं दोन जुनीं लुगडीं, चार चोळ्या, दोन शाली व ताराबाईनेंच दिलेलें एक नवें लुगडें, पाणी प्यायचें एक भांडें, इतकें काय तें माझें सामान होतें. तें पेटींत घालावें ह्मणून मी माझी मोडकी पेटी शोधीत होतें, तेव्हां हिराबाईनें ती पेटी माडीवरील अडगळीच्या खोलींत असेल ह्मणून सांगितलें.

गवताच्या गंजींत सुई हुडकणें आणि या अडगळीच्या खोलींत पेटी हुडकणें दोन्हीं अगदी सारखीं होतीं. वाड्याच्या शेवटच्या मजल्यावर उंचल्या मोठाल्या तीन खोल्या होत्या. एकींत निरनिराळ्या प्रकारच्या व आकाराच्या नुसत्या पेट्याच भरल्या होत्या. परंतु माझी पेटी मात्र त्यांत नव्हती. दुसरी खोली मोडक्यातुडक्या सामानांनीं व तसबिरीच्या चौकटींनीं

भरली होती. तिसरींत अमुकच भरलें होतें आणि अमुक नव्हतें असें नाहीं. सटरफटर सर्व सामान तींत कोंदलें होतें. ही तिसरी खोली फारच मोठी असून तिच्यांत प्रकाशही भरपूर होता. जुन्यापुराण्या वस्तु कीं ज्यांची मला नुसती आठवण देखील राहिली नव्हती त्या पाहून माझ्या मनास मोठा आनंद वाटला. मला त्या संध्याकाळची प्रत्येक गोष्ट आठवते. मी त्या खोलींत गेलें त्यावेळीं, चार वाजले होते. चवथ्या प्रहरचे सूर्य-किरण जमिनीवर लांबवर पडले होते. पक्षी आनंदानीं गाणीं गात होते. छपराच्या उजेडाच्या भोकांतून सूर्याचा प्रकाश सर्व खोलीभर पडला होता. मोडक्या सारंग्या व बुकांचे गठ्ठ्याचे गठ्ठे त्या ठिकाणीं पडले होते, पण त्या सर्वांवर अतोनात धूळ माजली होती. शिवाय जळमटें व कोळिष्टकें लोंबत होतींच. त्या खोलींत कधीं झाडणी फिरली होती नकळे.

माझी पेटी कांहीं, त्या खोलींत नव्हती, तथापि माझें मन रंजविण्यासारख्या अनेक वस्तु त्या ठिकाणीं होत्या. खोलीच्या एका दूरच्या कोपऱ्यांत—तेथें उजेड साधारणच होता—कांहीं नक्षीचीं कामें पडलीं होतीं, पण तीं सर्व धुळीनें माखून राहिलीं होतीं. त्यांच्या जवळच दुसरी एक वस्तु पडलेली मला दिसली. ती पहातांच मला हसें आलें व रडेंही कोसळलें. तो त्या देशाचा नकाशा होता. महाराज आपलें मृत्युपत्र लिहित होते, त्यावेळीं त्यांनीं हाच नकाशा आपल्यासमोर टांगला होता. लांकडी रुळाची मला ओळख होतीच. त्या कागदावर निळी मलमली गडाळली होती. नकाशा

पहातांच मला जुना मित्र भेटल्याचा आनंद झाला. मी त्याच्याकडे पहात कांहीं वेळ बसलें, सरतेशेवटीं मी तो उघडला, तेव्हां त्या गुंडाळ्यांतून कांहीं खालीं पडलें मी तें घेण्याकरितां खालीं वांकलें. तें एक कागदाचें पुडकें होतें. महाराजांनीं सर्व कागद एकत्र आपल्या हातानें तांबड्या सुतळीनें गुंडाळलेलें जें पुडकें मांडलें होतें, तेंच मला मिळालें. हें जसें महाराजांनीं ठेवलें होतें तसेंच होतें. अगदीं बारीक अक्षरानीं लिहिलेला चर्मपटही त्यांत होता. दुसऱ्या कागदांच्या कांहीं लांब पट्या, ज्या दाखल्याप्रमाणें दिसत होत्या त्याही त्यांत होत्या. बंद करून ठेवलेलीं कांहीं पत्रें होतीं तीं मीं पूर्वी पाहिलीं होतींच. महाराजांच्या मरणानंतर मीं जरी हें पुडकें पाहिलें नव्हतें, तरी तें बांधल्यावर सुतळीचीं टोंकें एकत्र करून वर लाखेची मोहोर केलेली मला पक्की आठवण होती.

महाराजांनीं केलेलें मृत्युपत्र सांपडलें तेव्हां, मला आनंद तर झालाच; परंतु, त्याहून विशेष आनंदाची दुसरी एक गोष्ट होती. त्या पुडक्याच्या वरील बाजूस महाराजांनीं स्वतः आपल्या हातानें हीं खालील अक्षरें लिहिलीं होतीं.

**'माझी मुलगी कमला हिनेंच हें पुडकें माझ्या मरणानंतर उघडणेचें'**

माझ्या डोळ्यांनीं मीं हीं अक्षरें प्रथम वाचलीं खरीं पण तीं मला पुढें दिसेनात. हातांत तें पुडकें धरूनच मी केलेल्या कृपेबद्दल अंबाजीची स्तुति केली.

सरतेशेवटीं मला माझ्या बापाचें नांव समजलें,

माझ्या डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह चालला होता. हातास कंप सुटला. गळा गहिंवरून आल्याकारणानें माझ्यातोंडून एक शब्दही फुटेना. पुडक्यावरील मोहोर फोडतां येईना.

'माझी मुलगी कमला' अहाहा! याच कारणानें माझें मन त्यांच्यावर जडलें. पांढरे सफेत केस असलेला जो माझ्याशीं प्रेमानें व इतक्या विलक्षण रीतीनें वागला, ज्यानें माझ्या डोळ्यांत आंसवें आल्यावर, माझें चुंबन घेतलें; ज्याला मी कोण हें माहीत होतें, पण ज्यानें तो संबंध बिलकूल उघडकीस आणला नाहीं, तोच तो माझा जन्मदाता—बाप होता. मी त्याची ह्मणजे जगत्सिंग महाराजाची मुलगी होतें.

परमेश्वरा! धन्य आहे तुझी! मी माझें पुरें नांव शोधून काढलें. तो समय मला मोठा आनंदाचा वाटला. माझी मुलगी कमला या शब्दांचें मी चुंबन घेतलें. अहो! कैलासवासी बाबा! तुह्मी जर यावेळीं जिवंत असता, तर मी तुमचे हजारों मुके घेतले असते.

नंतर अंबाजीचें स्मरण करून मी ती मोहोर फोडली. त्यावेळचे सूर्याचे पीतवर्ण किरण छपरांतून माझ्या कागदावर कसे पडले होते, तें मी विसरलें नाहीं. त्यावेळीं त्या खोलींत किति शांतता होती तें मला पक्कें आठवतें. मी ते कागद वरचेवर परतून पहात होतें; पण त्यांचा आवाज बिलकूल होत नसे. महाराजांनीं ते दिवशीं सकाळीं जें पत्र लिहिलें होतें, तेंच मी प्रथम वाचण्यास आरंभ केला. त्यांतील मजकूर असा होता.

"माझ्या प्रिय मुली कमले ! मी हें पत्र तुझ्या समक्ष लिहितों. तुझ्या तोंडाकडे पहात मी हें पत्र लिहून गेल्यावर तूं काय म्हणशील म्हणून मला मोठें आश्चर्य वाटतें. मी तुझा बाप हें तुला माहीत आहेच. तुला पोटाशीं धरून तुझें चुंबन घेण्यास मला नैतिक धर्मानें कांहीं नड नव्हती; परंतु, मला जनापवादाचें भय व लाज वाटली. मला तुझ्याविषयीं अभिमान असायाला हवा होता, कारण तूं तुझ्या आईप्रमाणेंच सुंदर आहेस. तुझी आई सौंदर्याविषयीं सर्व गुजराथेंत प्रख्यात होती."

"कमले ! तूं माझी मुलगी आहेस तथापि, मी तुला ती गोष्ट कधींच सांगितली नाहीं. रिकाम्या अभिमानानें मला ती गोष्ट तुला सांगूं नयेशी वाटली. आतां तुला मी माझी सर्व जन्मकथा सांगतों. नंतर तूं मला निंद्य मान अगर वंद्य मानून माझ्याविषयीं प्रेम जागृत ठेव, तुझ्या मनास येईल तसें तूं कर. जगत्सिंगाचें प्रेम कसें होतें तें तुला स्वतःला कदाचित् एखादे दिवशीं तरी कळेल. कदाचित् दया व प्रेम कसें असतें याचाही अनुभव येईल. त्या प्रेमानेंच मला ग्रासून टाकलें—ती तर मेली—जिच्यावर माझें पूर्ण प्रेम होतें, ती प्रिया पद्मिनी मेली. तिनें माझा विश्वासघात केला व मला दिलेलें वचन मोडलें."

मरते वेळीं त्यानें तिची कशी आठवण काढली होती व त्या वेळीं त्याचा चेहरा कसा खुलला होता, ती मला आठवण झाली.

"माझी गरीब बापडी पद्मिनी; ती मोठी ऐटबाज बायको होती. मी एक लहानशा गडावर रहाणारा

जहागीरदार होतों खरा; पण, **कमले!** मी तिच्या करितां आपला प्राणही खर्चि घातला असता, इतकें तिनें आपल्या गोड माषणांनीं व प्रेम दृष्टीनें माझें मन मोहून टाकलें होतें. तिची माझ्यावर अत्यंत प्रीति होती.” मी तिच्यावर किति आसक्त होतों, ती गोष्ट या देशांतील प्रत्येकास माहीत आहे. मी तिच्या विरहाविषयीं रात्रंदिवस अश्रु ढाळीत होतों, तिला मरून आज बरेच दिवस झाले.”

“ तिच्या मरणानंतर मी स्त्रियांचा हेवाच करूं लागलों. मी तरुण स्त्रियांचा तर पक्का द्वेषी बनलों. याहून जास्त वाईट तें काय? माझ्या पूर्वीपार चालत आलेल्या अब्रूविषयीं मी अतिशय अभिमान बाळगूं लागलों. जगत्सिंगाला आतां कोणत्याही स्त्रीविषयीं मोह उत्पन्न होणार नाहीं, असें लोकांनीं ह्मणावें व तें मी ऐकावें अशी माझी फार आवड होती. **पद्मिनीच्या** मरणानंतर मी बरेच दिवसपर्यंत माझ्या लहानशा संस्थानांत होतें; परंतु तेथें चैन पडेना ह्मणून मी फिरत फिरत गुजराथेंत आलों. तुझ्या आईची व माझी **अन्हिलपट्टण** या शहरीं गांठ पडली. तेव्हां ती आपल्या काकाच्या घरीं रहात होती. तिचे **आईबाप** तिच्या लहानपणींच निवर्तले होते. तिचा चेहरा चंद्रबिंबाप्रमाणें तेजःपुंज व मोठा मनमोहक होता. **कमले!** तूं प्रत्यक्ष तिचीच मूर्ति आहेस. आमचा विवाह **अन्हिलपट्टण** येथेंच झाला. **एक** या चिन्हानें लिहिलेला जो दाखला आहे तो आमच्या विवाहबद्दलचें प्रमाण पत्र आहे. याची एक प्रत मी **अन्हिलपट्टणास** मरण्य [illegible] लिही आहे. ”

"आतां मला फारच शरमेची गोष्ट कबूल करणें भाग आहे. तुझी आई शरादिनी ही तरुण, रूपसंपन्न व सुशील होती. तिची माझ्यावर अत्यंत प्रीति होती, परंतु ती प्रत्यक्ष पद्मिनी नव्हती. प्रेमानें अंध झाल्यामुळें प्रथम मला ती तशी वाटली होती, परंतु लग्न झाल्यानंतर थोडक्याच महिन्यांनीं माझें मन तिच्याविषयीं अगदीं कंटाळून गेलें."

"गरीब बिचारी शरादिनी! मी माझें खरें प्रेम तिला अर्पण केलें नव्हतें. तें लपविण्याचा मी प्रयत्न केला परंतु, माझें तें कपट तिनें लगेच ओळखलें. ती स्वरूपानें सुंदर व प्रेमास योग्य अशी होती खरी; तरी पण, ती पद्मिनी नव्हती. ती पद्मिनी मरून आज किती तरि दिवस झाले, तरि तिचें स्मरण होतांच मला रडें कोसळतें. माझें अंतःकरण केवळ आकर्षण करण्याच्याच हेतूनें पद्मिनीनें माझ्या मनावर मोहिनी घातली."

"दुसरें लग्न झाल्यावर तुम्ही परत स्वदेशीं कां आला नाहीं? असा कदाचित् तूं मला प्रश्न करशील व तो तुझा प्रश्न सयुक्तिकही आहे म्हणून त्या तुझ्या प्रश्नाचें व शंकेचें मी आतां निराकरण करितों."

"माझी तिच्यावरील ( शरदिनीवरील ) सर्व प्रीति नष्ट झाली होती व अशा स्थितींत तिला तुवरगडाला आणावी ही गोष्ट मला आवडली नाहीं हें एक कारण-दुसरी गोष्ट, जे लोक प्रथम युवतिद्वेष्टा या नांवानें हाक मारीत, ते मी लग्न करून पुन्हां प्रेमांत गुरफटलेला पाहून मला हांसतील म्हणून वाटलेली लाज ही होय कमले! तुझा नंतर जन्म झाला. तूं पद्मिनीची मुलगी

असतीस तर, मी तुझी पूजा केली असती. शरदिनी च्या डोळ्यांप्रमाणें तुझेही डोळे आहेत, तुझें मनही तिच्याप्रमाणें मोठें कनवाळू आहे पण, हे गरीब मुली! तुला रहाण्यासारखी माझ्या अंतःकरणांत जागा नाहीं."

"कमले! तूं एक वर्षाची होतीस तेव्हांच मी तुला माझ्या पासून दूर केली. शरदिनीच्या मरणा-नंतर माझ्यानें तुला बघवेना. तुला कोणाच्या तरी हवाली करून दूर देशांत प्रवासास जावें असें मला वाटूं लागलें, आणि तो विचार मी लगेच आमलांत आणिला. तुझ्या आईनेंच तुझें नांव कमला असें मोठ्या आनंदानें ठेवलें व नंतर कांहीं दिवसांनीं ती मरण पावली. तुझ्या आईस माझ्याकडून जो त्रास पोंचला, त्या बद्दल परमेश्वर मला क्षमा करो. मला आतां फारच पश्चात्ताप होतो. पण अकाळीं त्याचा काय उपयोग? तुझ्या आईच्या अंतकाळीं मी तिच्या अगदीं जवळ होतों. कमले! ती तुझी आई व माझी प्रिया शरादिनी माझ्या मांडीवर शिर ठेवून मरण पावली. ती मरतेवेळीं मी माझ्याकडून घडलेल्या एकंदर अपराधाची क्षमा मागितली व तिनें ती केलीही. दोनचा अंकडा घातलेली जी कागदाची घडी आहे ती तुझ्या जन्म टिपणाची आहे. तीन अंकड्याची चिठी, शरदिनीच्या मरण तिथीची आहे. अन्हिल पट्टणा बाहेरच्याच स्मशानांत तिला दहन करून वर वृंदावन बांधलें आहे. यदाकदाचित् तें वृंदावन पहा-याला जर तूं गेलीस तर तुला मी त्याची ओळख

[illegible]

त्याच्या मध्यभागीं चारी दिशेस शरादिनि हीं अक्षरें कोरलेलीं आहेत."

"प्रियकरमुली! माझा प्रवासास जाण्याचा विचार ठरतांच मी तुला जयपुरास माझ्या एका मित्राच्या घरीं धाडून दिली, पण तुझ्या प्रकृतीस तें स्थळ मानेना. तूं वरचेवर आजारी पडूं लागलीस ह्मणून मग कांहीं दिवसांनीं तुला नेण्याविषयीं मी मोहनाबाईस पत्र धाडलें. या वेळीं तुला बऱ्यावाईट सर्व गोष्टी कळत असत. मोहनाबाई माझ्या पत्राप्रमाणें तावडतोब निघून आली. मी तुला तिच्या हवालीं केलें व तसें करण्यापूर्वी तूं कोणाची कोण हें कोणा एकास न कळविण्याविषयीं मी तिच्याकडून शपथ घेतली होती. मी लग्न करून घेतलें; ही गोष्ट देखील कोणास कळवूं नको, असें मी तिला सांगितलें होतें. मोहना ही स्त्री माझ्या फार विश्वासांतली होती. चारचा अंकडा घातलेलें पत्र मी तिला धाडलेलें होतें व ५ वें पत्र, तुझ्यासह तुवरगडास सुरक्षितपणें पोंचल्याबद्दलचें मोहनेकडून मला आलें आहे."

"कमले! मी तुला खरी हकीगत सांगतों. पद्मिनीचें विस्मरण व्हावें ह्मणून, मी प्रवास करीत पुढें पुढें पुष्कळ लांब जाऊं लागलों. निरनिराळ्या प्रदेशांतील निरनिराळे देखावे पाहून माझ्या मनांत तुझ्याविषयीं व तुझ्या आईविषयींही विसर पडूं लागला. मोहना मेल्याचें मला वकीलाकडून एक पत्र आलें होतें, पण मी तिकडे विशेष लक्ष पुरविलें नाहीं. तूं इकडेच असली पाहिजेस असा माझा समज होता, व

तो खराही ठरला. माझी गोष्ट फार शोचनीय आहे. शरदिनीला मी फार वाईट नवरा मिळलों व कमले ! तुला बापही मोठा वाईट मिळालों. मी तुझ्याविषयीं झालेल्या चुकीची दुरुस्ती करीन. कमले ! मला क्षमा कर. मी म्हातारा झालों. माझे केंस पिकले व माझी दृष्टी मंद झाली. माझ्या मुली ! 'मला क्षमा कर' हे शब्द लिहितेवेळीं तूं माझ्याकडे पहात होतीस तें पाहून माझें अंतःकरण विरघळत होतें. "

"मी घरीं आल्यावर तुला जेव्हां रूपगुणसंपन्न पाहिली, तेव्हां, माझ्या निष्ठुराचरणाबद्दल मला मोठा पश्चात्ताप झाला, पण तो फारच उशीरानें झाला. स्त्रियां संबंधीं असणारी द्वेषबुद्धि मी टाकून लग्न करून घेतलें, इतकेंच नव्हे पण, मला एक मुलगीही झाली, असें लोक नाकें मुरडून म्हणतील; तें मला सहन होणार नाहीं म्हणून मी तुझ्याविषयीं इतका निष्ठुर झालों. मी जिवंत असेपर्यंत मला लोकापवाद सह्य होणार नाहीं; माझ्या पश्चात् ते मला हवें तें बोलोत अशा हेतूनें मी तुझी अनास्था केली. "

"जयसिंगाला एक पत्र लिहून तें बंद करून ठेवलेलें तुला याच पुस्तकांत मिळेल. त्यांत त्यालाही मी माझी हकीगत लिहून कळिवली आहे. माझ्या प्रिय मुली ! शेवटीं तरी मी तुझ्याशीं न्यायानें वागलों. माझी सर्व संपत्ति मी तुला अर्पण केली आहे. तुवरगड येथील स्थावरजंगम मिळकत व जगांत माझ्या नांवाचें म्हणून जें कांहीं आहे तें सर्व तुला दिलें आहे, तूं माझी खरी वारसदार आहेस. उज्जयनीच्या तारादेवी

खेरीज माझे दुसरे कोणी नातेवाईक नाहींत हें खरें, पण त्यांचा माझ्या मिळकतीवर व माझा त्यांच्या मिळकतीवर हक्क नाहीं. कमले ! केलेल्या चुकीची मी अशा रीतीनें दुरुस्ती केली आहे. हयातपणांतच मला तसें करतां आलें असतें, पण माझा अभिमान मला तसें करूं देईना. माझ्या गळ्यासभोंवतीं हात टाकून तूं मला बाबा ह्मटलेलें ऐकावें अशी मला मोठी आवड होती परंतु, युवति द्वेष्टा ह्मणणारे लोक मला पाहून, नाकें मुरडतील व तें मला सहन होणार नाहीं ह्मणून मी तुला—तूं माझी मुलगी—असें कळविलें नाहीं."

"६ वा अंकडा मांडलेला कागद जयसिंगास देण्याचा आहे. व ७ व्या अंकड्याचा कागद माझें मृत्युपत्र आहे. मी जिवंत असेपर्यंत तुला हें वाचायला मिळणार नाहीं. माझ्या पश्चात् तुला तें मिळेल. मग वाचून तूं माझ्याविषयीं कोमलांतःकरणानें विचार कर व माझ्यासारखें खुळें प्रेम न करण्याविषयीं शीक. माझ्या मरणाला इतर कांहीं झालें नसून तुझी आई शरदिनी व सावत्र आई पद्मिनी यांचा प्रेम विरहच कारणीभूत झाला."

"माझ्या मुली मी आतां तुझा निरोप घेतों. मी हें पुडकें आतां माझ्या एका गुप्त स्थळीं ठेवतों तें तुला निःसंशय माझ्या मरणानंतर मिळेल. कमले ! हे माझ्या आवडत्या मुली ! मला आता निरोप दे. परमेश्वर तुझें कल्याण करो."

हें पत्र लिहून झाल्यावर त्यांनां पश्चात्ताप झाला हें उघडच होतें. चुकीची दुरुस्ती केली पाहिजे ह्मणून

जेव्हां ते माझ्याकडे बोलले तेच दिवशीं ते त्या गोष्टीचा विचार करण्यास निघाले होते व वाटेंतच त्यांच्यावर मृत्यूचा आकस्मिक घाला पडला.

मी कांहीं घटकांपर्यंत अगदीं गोंधळून स्वस्थ बसलें. नंतर मी त्या चर्मपटाकडे पाहिलें व खालील शब्द वाचले.

"तुवरगडचे जगसिंग महाराज यांची शेवटची इच्छा व मृत्युलेख."

ही इच्छा लहानच होती पण तींत संपूर्ण आलें होतें. घरेंदारें, जमीनजुमला, पैसाअडका, तसबीरी, तटेंतबकेंगाड्या, घोडे, पुस्तकें व जवाहीर वगैरे सर्व कांहीं माझें ह्मणून जें जगांत आहे तें मी माझी मुलगी कमला—माझी बायको शरदिनी इची मुलगी—हिला अर्पण केलें आहे. तें मृत्युपत्र त्यानें आपल्या स्वतःच्या स्वच्छ सहीनें विभूषित केलें होतें. त्याच्या खालीं हिराबाईची व रत्नसिंगाची साक्ष होती.

माझ्या मनावर बसलेला धक्का मला असह्य झाला व आलेलें रडें मनांतल्यामनांत दाबण्याचा मला मोठा त्रास पडला. माझ्या सर्वांगास कांपरें सुटलें. मी कोणाची कोण नव्हतें, तर तुवरगडच्या अभिमानी घराण्यांतील, त्यांच्या सर्व संपत्तीची मालकीण होतें. मी कांहीं आतां ताराबाईचीं पत्रें खरडणारी दासी नव्हतें तर; तुवरगडची पूर्ण मुखत्यारीण होतें. माझा मुलूख मला दृष्टीनें दिसणार नाहीं इतका मोठा होता. ह्मणून मला एकदम अत्यानंद झाला असें नाहीं. माझा आनंद हळुहळूच वाढत चालला होता. चाकरनोकरांच्या जागेंत मला आतां कोंडून रहायला नको. एकाच

खोलींत अंथरुणावर खिळून रहायला नको. जेव्हां पाहुणे घरीं असतात तेव्हां, तूं कोणाच्या दृष्टीस पडूं नको असें रागानें मला सांगायला नको असे विचार माझ्या मनांत आले. तें घर माझें होतें. चाकरमाणसें व झाड-णारे लोटणारे पुन्हां कधीं मला **कमला** या एकेरी नांवानें हांका मारणार नाहींत. ती अभिमानी प्रेमकु-मरबाई मला आतां कधींही आगंतुक ह्मणणार नाहीं कारण मी तिच्या बरोबरीनें बसणारी झालें.

माझ्या अभिमानाची पहिली ज्योत प्रथम **अंबा-लालची** बायको व मुलगी यांवर पडली. या दोघी जणी माझ्या ज्या त्या कामांत आडयेत असत. माझ्या मतायुष्यांतील माझें केवळ सुखाचें साधन जें **गायन** तें यांनीं होऊन तुषानें बंद केलें होतें. मला **अंबाजी-**च्या गाभाऱ्यात जाण्याची व गाण्याची मनाई होती. आह्मी त्रासून व जाचून सोडलेली मुलगी तुवरगडच्या संस्थानाची वारसदार आहे ही गोष्ट त्यांना समजली तर त्या काय बरें ह्मणतील ?

जिला माझा त्रास वाटे, जी कपाळाला आंठ्या घालून माझी निंदा करी. व पाहुणे मंडळींपैकीं एकीच्या दृष्टीस पडलें ह्मणून जिनें मला वाड्यांतून बाहेर जाण्याची आज्ञा केली, त्या **ताराबाई** साहेबांना मी येथील मालकीण आहे हें समजल्यास काय वाटेल, याचा मी विचार करूं लागलें. मी महाराजाची मुलगी हें तिला कळतांच तिचा चेहरा कसा होईल तें मी लक्षांत आणलें. तिनें दिलेला त्रास आठवून माझें अंतःकरण रागानें व अभिमानानें फणफणूं लागलें,

अहाहा ! मासाहेब ! तुम्हांला आतां तुमच्या रागा बद्दल व निंदेबद्दल वाईट वाटेल. मला चांगल्या रीतीनें, सभ्यतेनें, व कृपादृष्टीनें वागविलें पाहिजे होतें असें तुम्हांला वाटेल पण आतां त्याचा काय उपयोग !

नंतर माझ्या डोळ्यांतून अश्रुबिंदु झरझर गळूं लागले. व मनांतील भयंकर अभिमान नाहींसा झालासें वाटलें. अहाहा ! हे सुंदर भुवनश्वरा ! तुमच्या प्रकाशानें मला आणलें तीच ही खरोखर जागा काय ? बगळीच्या खोलीवरील प्रकाश निस्तेज होऊं लागला. संध्याकाळचें नीलवर्ण आकाश स्वच्छ दिसूं लागलें. नक्षत्रें चमकूं लागलीं. माझ्या आवडीचा ध्रुवाचा ताराही त्यांतच चमकत होता. प्रियकरा ! तुमचें या वेळीं मला एक क्षणमात्र तरी विस्मरण झालें होतें काय ?

हा विचार मी मनांत करीत असतांना झर्कन् माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. "माझा फायदा तो त्याचा तोटा. तुवरगडचें स्वामित्व माझ्याकडे आलें तर त्याला तें गमवावें लागेल. महाराजांचा जमीन जुमला, पैसा अडका वगैरे सर्व जर मला मिळालें तर त्या सर्वास तो मुकेल. मी ज्याच्यावर प्रेम ठेवलें त्याच्याकडूनच संपत्ति अपहार करावयास लागलें; ज्या मूर्तीचें मी पूजार्चन व चिंतन केलें तिच्याच सुखावर पाणी ओतून सधन होऊं लागलें तर, तें मला कसें रुचेल ! तुवरगडचा जहागीरदार मी, असें कुमारसिंग म्हणतो पण, त्याला आतां तसें म्हणवितां येणार नाहीं

माझी त्याच्यावर प्रीति जडली होती. त्याच्या त्या त्या तसबिरीकडे पाहून मला दोनच दिवस झाले होते व त्या दिवसापासून मी त्याच्या उपकारऋणांतून मुक्त होण्याची संधि पहात होतें. ती आज अनायासेंच मला लाभली. एकंदर पदार्थापेक्षां, एकंदर संपत्ति पेक्षां व स्वतःच्या प्राणापेक्षां जर मी त्याच्यावर अधीक प्रेम करीत असलें तर तें दाखविण्याची हीच वेळ होती. ज्याच्या योगानें माझा वारसा सिद्ध होतो ते सर्व कागद मी फाडून अगर जाळून टाकीन म्हणजे सर्व व्यवस्था पुर्वीप्रमाणेंच चालेल असें मला वाटलें. कारण माझा मान मला मिळाला. मी महाराजांची मुलगी एवढें मला कळलें. मी कोण हा आतां प्रश्न उरला नव्हता.

प्रियाकरितां खऱ्या स्त्रिया जसा आपला जीव वगैरे सर्वस्व खर्ची घालतात, तद्वत सर्वस्व खर्ची घालण्याचें आतां माझ्या पूर्णपणें हातांत आहे. माझ्या प्रेमार्पणाची गोष्ट मोठीच आश्चर्य कारक होईल. कारण माझी सर्व हकी-गत गुप्त होती आणि ती कोणासच माहीत नव्हती.

मी ते कागद घेऊन नाहींसे करीन. ताराबाईला अगर कुमारसिंगाला त्यांच्याकरितां मीं काय केलें तें कळूं देणार नाहीं. मीं ते सर्व कागद झटकन गोळा केले व माझ्या मलमलीच्या पातळांत लपविले. नंतर मी दरवाजा उघडला व जिन्यावरून सावकाश उतरूं लागलें. जिन्याच्या खालीं मीं ताराबाईला पाहिलें. ती माझ्याचकडे येण्याच्या हेतूनें जिना चढत होती.

---

# प्रकर्ण १० वें.

## विचार पडला.

आह्मी एकमेकांकडे भिमेपणानें पाहूं लागलों. तिच्या दृष्टींत राग, संताप व चौकसपणा स्पष्ट दिसत होता आणि माझ्या दृष्टींत भारदस्तपणा भरला होता. पहिल्याप्रथम आह्मी दोघीही समानमानाच्या स्त्रियांप्रमाणें भेटलों परंतु, मला तसें मुळींच ह्मणतां येण्याजोगें नव्हतें; कारण तिनें माझ्या काखेंतील पांढरें पुडकें पाहिलें होतें.

ताराबाई ह्मणाल्या 'दुपार पासून तुला मी दोन तिनदां पाहिली, तूं आपली माडीवरच कांहींबाहीं हुडकत बसली होतीस, या तुझ्या धाडसाबद्दल तुला काय करावें तें मला सुचत नाहीं. त्या खोल्यांत काय असेल नी काय नसेल तें माझ्यानें सांगवत नाहीं. घरांत शिरून परक्या मनुष्यानें अशी ढवळाढवळ केलेली मला सोसत नाहीं. तूं त्या खोलींत काय करीत होतीस?

मी तिच्याकडे मोठ्या आश्चर्यानें पाहिलें. कारण ज्या घरासंबंधीं ती बोलत होती तें माझें होतें. घर व घरांतील एकंदर वस्तु माझ्या मालकीच्या होत्या. तिचा त्यावर काहींनाही हक्क नव्हता. परंतु कुमारसिंगाच्याप्रेमामुळें माझ्यानें तिला तसें सांगवेना. तिचा राग निवत चालला

होता इतक्यांत तेथें प्रेमकुंवर आली. तिनें तिला पुन्हां खिजाविलें.

'तूं, ती जोरानें ह्मणाली ' त्या खोलींत काय करत होतीस, मला घराबाहेर हांकून लावण्याचा तुमचा विचार ठरला ह्मणून मी तुमच्याच आज्ञेनें माझ्या सामानाची पेटी हुडकीत होतें. नको कां माझी मला तजविज करायला ?

' हो, हो, हो, हवीतर, नको कशी ' ती तोंड वांकडे करून बोलली.

' मोठी उद्धट पोरगी! तुला अशी ढवळाढवळ करण्याचा बिलकूल अधिकार नाहीं .,

मी मनांत ह्मटलें ' मला काय मिळालें हें जर तिला समजेल तर, ती काय बरें ह्मणेल ? माझ्या या मळमळी-च्या पातळांत मी काय बांधलें आहे तें जर पाहील तर ती किति बरें विरस होईल ? तिचा अभिमान नाहींसा होईल, व तिला कृतकर्माचा पश्चात्ताप झाल्यावांचून रहाणार नाहीं. मला मग अत्यानंद होईल, माझा आनंद मग मला आवरणार नाहीं. या विचारानें माझ्या डोळ्यांत आनंदाची झांक मारूं लागली व ती पाहून तिचा चौकसपणाही जास्त वाढला.

'तुझ्या काखेंत काय आहे ?' ती सत्तेनें विचारूं लागली.

'मासाहेब' मी ह्मटलें 'तुम्हांला तें दाखविण्याजोगें नाहीं व मी दाखविणारही नाहीं. फार तर काय ? पण सांगणार देखील नाहीं. कारण ती वस्तु माझी आहे, तुमची नव्हे.

'पण तूं ती त्या खोलींतूनच आणलीस ना ?'

'आणली, पण ती तुमची म्हणून नव्हे, तर माझी म्हणून मी आणली.'

माझ्या या बोलण्याचा ताराबाईस संताप आला. व माझा उजवा हात घट्ट धरून ती म्हणाली:—

'तुझीअशी एक काडीही येथें नाही. प्रत्येक वस्तु माझ्या मालकीची आहे. माझ्या हुकुमाशिवाय या वाड्यांतून एक फुटका मणी देखील नेण्याचा तुला हक्क नाहीं.'

माझ्या हातास तिनें झटका मारला, तेव्हां मी तें पुडकें माझ्या काखेंत घट्ट आवळून धरलें. मी ते कागद नाहींसे करणार होतें, पण तेवढ्या वेळेपुरती मी तुवरगडच्या, जमीन जुमल्याची, पैसा अडक्याची व वाड्यांतील एकंदर वस्तूंची मालकीण असा मला अभिमान वाटला.

'मासाहेब !' मी शांतपणें म्हटलें 'मला जाऊंद्या. उगीच कां अडवितां ?'

'कां म्हणजे. काखेंतलें पुडकें खालीं ठेव नी मग जा. तोंपर्यंत मी तुला पुढें एक पाऊलही टाकूं देणार नाहीं.'

'तसें असेल तर मग मला जायचेंच नाहीं, कारण कुणाला न दाखविण्याची वस्तु तुम्हांला दाखवावी लागणार ?'

'दाखिवल्यावांचून गत्यंतरच नाहीं' ती ओंठ चावून म्हणाली.

'माझ्या त्या वेळच्या स्थितीचा विचार करीत मी

काहीं वेळ स्तब्ध उभी राहिलें. वास्तविक रीतीनें पाहिलें तर, तिचा ते कागद बघण्याचा हक्क होता. आणि ती सोडणार ही नाहीं ह्मणून ते तिला दाखवावे असा बळकट मोह माझ्या मनांत उद्भवला परंतु प्रियाच्या प्रेमाकरितां सर्वस्व घालविण्याचा माझा निश्चय मला तसें करूं देईना.'

ताराबाई मोठ्या धीमेपणानें बोलली.

'तूं जर बऱ्या गोष्टीनें कांखेंतील पुडकें पाहूं दिलेंस, तर तुला भय घालावें अगर तुझ्यावर बळजोरी करावी अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. पण तूं जर असाच हट्ट घेऊन बसलीस तरमात्र, मला एक दोन शिपायांनां बोलावून तुझ्याकडून तें बोचकें काढवून घ्यावें लागेल. विचार कर, आणि कोणती गोष्ट पत्करते तें सांग.'

अर्थात ती तितकें करील. बळकट दोन मनुष्यांपुढें माझें काय चालणार? माझ्या कांखेंतील पुडकें ते हां हां ह्मणतां हिसकून घेतील. अहाहा! आणि नंतर माझी प्रियाविषयींची प्रीति मुळींच व्यक्त होणार नाहीं ह्मणून मी तें पुडकें पोटाशीं घट्ट आवळून धरलें.

मी मोठ्यानें ओरडून पण विनयानें ह्मटलें

'मासाहेब! माझ्याशीं न्यायानें वागा. कांखेंत मारलेली वस्तु तुमची नसून माझी आहे. पाहिजे असल्यास मी शपथ वाहतें. कृपा करून मला सरळ जाऊंद्या. अटकाव करूं नका. मी हें आतांच्या आतां घर सोडून जातें पण मला सोडा. मी पुन्हां कधींच परत येणार नाहीं.'

तिनें माझ्या बोलण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. ती आपल्या मनांतल्यामनांतच पुडकें घ्यावें कीं न घ्यावें याविषयीं विचार करीत होती शेवटीं तिचा विचार ठरला व ती ह्मणाली

'मला तें पुडकें पाहिलें पाहिजे व मी तें पहाणारच. आतां इतकेंच सांग कीं, तूं तें सामोपचारांनीं दाखवि-णार कां मी शिपायांनां हाक मारूं?'

'हवें तें करा. मी होऊन तें आपणास दाखविणार नाहीं.'

'असें काय? तर मग चल खालीं माझ्या खोलींत. या घाणींत माझ्यानें उभें रहावत नाहीं आणि कां उभें रहावें तेंही कळत नाहीं. चल, सरळ माझ्या खोलींत चल.'

मी तिच्या आज्ञेनुरूप खोलींत गेलें. "अहाहा! माझ्याकडे काय आहे तें जर तिला कळेल तर ती काय बरें ह्मणेल?" असें मीं आपल्याशींच ह्मटलें. आह्मी दोघी आंत गेल्यावर तिनें मला खोलीचें दार बंद कर ह्मणून सांगितलें. कांखेंतील पुडकें समोरच्या मेजावर ठेव अशी तिनें मला आज्ञा केली. पण, मी तें नाकारलें,

'मला फक्त तें एकदां पहायचें आहे.'

'पण मला तें दाखवायचें नाहीं.'

'आतां किति वेळ दाखवीत नाहींस तें मी बघतें.' असें ह्मणून ताराबाई माझ्याजवळ आली; इतक्यांत कुमारसिंगानें येऊन दारावर थाप मारिली. अहाहा! हा माझ्या बऱ्यावर आला कां वाईटावर बरें!

'आई !' तो ह्मणाला तुला मी कांहीं सांगूं कां ? वळ नाहीं लागणार.

'हो सांग, पण, ये आंत ये. तूं ऱ्याचे वेळेवर आलास.'

तो माझ्याकडे व ताराबाईकडे आश्चर्यानें पाहूं लागला. नंतर त्याची दृष्टी माझ्या काखेंतील पुडक्या-वर गेली. व तो ह्मणाला.

'आई कमलेशीं तुझी आज कसली कटकट चालली आहे ?

'कुमार' ताराबाई ह्मणाली 'तूं जर मदत करशील व माझ्या अधिकारास बळकटी आणशील तर मला मोठा आनंद होईल. हिला घराबाहेर हाकून देण्याचा माझा विचार आहे. प्रेमकुवरचेंही असेंच मत आहे. हिनें तिचा कितितरी पाणउतारा केला ती हिच्याविषयीं फार सांगत होती.'

प्रेमकुवरचें नांव निघतांच तो तिच्याविषयीं कांहीं गुणगुणला. त्यानें तिची मुळींच स्तुति केली नाहीं, याचें मला मोठें आश्चर्य वाटलें. ताराबाई ह्मणाली.

'मी तिला आज सकाळीं आपल्या सामानाची बांधा बांध करून जाण्यास सांगितलें. तेव्हां पेटी हुडकण्याचा बहाणा करून तिनें आज दोनप्रहरपासून ही वेळपर्यंत सगळा वेळ खोली धुंडाळली व तिला आवडल्या त्या त्या वस्तु तिनें आपल्या काखेंत मारल्या.'

तिचें हें निष्ठूरपणाचें भाषण ऐकून कुमारसिंगास राग आला पण तो माझ्याविषयीं नव्हता. तो ह्मणाला

'आई ! तूं जें काय ह्मणतेस त्याचा तुला तरी अर्थ समजतो काय ?'

'कुमारा !' ती रागानें ह्मणाली 'होय—होय. समजतो बरं. आणि तुलाही तो समजून सांगतें ऐक. या कारटीनें काल संबंध दोनप्रहर वरच्या खोल्यांतील वस्तु गुंडाळण्यांत घालविले आणि काखेंत हें पुडकें मारून ही जिन्यावरून खालीं येत होती; इतक्यांत मीही तेथें गेलें. मला त्या पुडक्यांत काय आहे तें पाहिलें पाहिजे पण ती नाहीं ह्मणते. याचा काय तो तूंच विचार कर. काखेंत काय आहे तें तिला दाखविल्यावांचून आतां गत्यंतरच नाहीं. ही पोरगी चोर दिसते ,

'आई' तो रागानें ह्मणाला 'तुझ्या बोलण्याचें मला भारीच आश्चर्य वाटतें . तूं तिला इतक्या वाईट रीतीनें वागवशील याची मला कल्पना देखील नव्हती. माझा कमलेवर पूर्ण विश्वास आहे. व तो तसाच माझ्या जिवांतजीव असेतोंपर्यंत राहील.

मला मग थोडासा धीर आला.

मी ह्मटलें 'छोटे महाराज !' मी जें कांहीं घेतलें आहे तें माझें पूर्णपणें माझ्या हक्काचें आहे व दुसऱ्याचें नाहीं ह्मणून मी पाहिजे असल्यास शपथ वाहतें.'

'कमले ! माझा तुझ्यावर विश्वास आहे.'

'कुमारा !' ती मध्येंच ह्मणाली 'आणि मी तुला माझ्या मदतीस बोलाविलें असून असा स्वस्थ कां बसलास ? धर तिचा हात आणि घे काखेंत काय आहे तें.'

'महाराज !' मी ह्मटलें.

'माझ्या मुला!' ताराबाई ह्मणाली.

तो इकडून तिकडे व तिकडून इकडे एकसारखा टकमक पाहूं लागला. त्याला कोणाला काय उत्तर द्यावें तेंच सुचेना. त्याला आपल्या आईचा खूप राग आला होता, परंतु तिच्या उलट त्याच्यानें एकही शब्द बोलवेना.

शेवटीं तो मला ह्मणाला.

'कमले! तूं जें घेतलें आहेस तें तुझें स्वतःचें आहे याबद्दल मला तिळमात्र संशय नाहीं. तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. पण, माझी आई ह्मणते त्याप्रमाणें तुला त्या पुडक्यांत काय आहे तें दाखवितां येण्यासारखें नाहीं काय?'

त्याचें हें भाषण ऐकून मला वाईट तर वाटलेंच पण काय उपयोग? मला त्याच्याच संरक्षणार्थ नाहीं ह्मणणें भाग होतें.

'महाराज!' मी ह्मटलें 'तें मला कुणालाच दाखवायाचें नाहीं.'

'पाहिलेंस कुमारा!' ताराबाई ह्मणाली 'हिचा किति ताठा आहे तो. ती तें दाखवितच नाहीं. अरे चोरीचा माल ती तो कसा दाखवील.'

'आई' तुझ्या या बोलण्याचें मला भारी वाईट वाटतें.'

'हो-हो-' मध्येंच आठवल्यासारखें करून तो ह्मणाला 'आई तुझ्या या धांदलींत मी अगदींच विसरलों. मी तुला एक निरोप सांगायला आलों होतों.'

'तो कसला?'

'उज्जनीच्या पंडितरावाची बायको-तुझी जिवलग मैत्रिण मुद्दाम तुला भेटण्याकारितां आली असून ती येथें एकदोन तासच रहावयाची आहे.'

ताराबाईला आनंद झाला. ती ह्मणाली 'कोण पंडितरावाची बायको? तर मग तिला मला भेटलेंच पाहिजे. पण, या कमलेची काय वाट? माझें ह्मणणें मी खरें करणार. या यकःश्चित् पोरीचा हट्ट मी चालूं देणार नाहीं. तिच्या काखेंत काय आहे तें पाहीन तेव्हांच तिला सोडीन.'

'आई! पण आतांच नको तो गोंधळ. याचा विचार मग करूं' तो माझ्याकडे वळून ह्मणाला 'कमले! माझ्यावर तुझा विश्वास आहे ना? माझ्याजवळ तें पुडकें ठेवायला दे पाहूं.'

माझा मनाचा होय किंवा नाहीं कसें ह्मणावें याचा मोठा विचार पडला. मी चित्रासारखी स्तब्ध उभी राहिलें.

तो एका पेटीजवळ वळला व ह्मणाला.

'दे तें पुडकें माझ्याजवळ. पुन्हां यासंबंधीं चर्चा करण्यास आपणास वेळ मिळेपर्यंत मी हें पुडकें या पेटींत ठेवतों व कुलूप करतों'

ती वेळ मोठ्या आणीबाणीची होती. मी त्याला विचारलें.

'महाराज! या पुडक्याला दुसऱ्या कोणाचा व आपला स्वतःचा देखील हात लागणार नाहीं ह्मणून आपण वचन द्याल काय? तसें असेल तर मग, मी हें पुडकें माझ्या हातानें त्या पेटींत ठेवून मी आपल्या

हवाली करतें. आपण तिकडे पहातां देखील कामाचें नाहीं. '

त्यानें त्याप्रमाणें वचन दिलें. नंतर मी माझें पांढरें पातळ त्याच्या सभोंवतीं घट्ट गुंडाळलें व तें त्या पेटींत ठेवलें. त्यानें लगेच पेटीस कुलूप करून ती किल्ली माझ्याकडे दिली.

कमले ! ' तो ह्मणाला ' माझा तुझ्यावर किति विश्वास आहे तें तुला समजावें ह्मणून ही चावी मी तुझ्याकडे दिली. आईच्या मताप्रमाणें व्यवस्था होई पर्यंत तूं देखील त्याला शिवूं नको बरें. '

नंतर तो आईकडे वळून ह्मणाला-' आई चल-जल-कर तुझ्या मैत्रिणीस भेट. तिला घाई असेल. आपण हा तंटा उद्यां अगर परवां सवडीनुसार मिटवूं.

' उद्यां अगर परवां ? ती गोष्टच नको. तिनें आजच घर सोडून गेलें पाहिजे. '

' बरें मग त्याविषयीं विचार करूं. त्याला सावकाशीचा वेळ पाहिजे. आतां हांसून आपला चेहरा प्रफुल्लित कर. नाहींतर, ती तुझी मैत्रीण तूं दुःखाकष्टांत आहेस असें समजेल.

ताराबाई हांसत हांसत ह्मणाली.

' तूं मोठा चाणाक्ष खरा ? तुझा मला केव्हांही वीट येत नाहीं. '

नंतर तो कुमार माझ्याजवळ आला. त्यानें माझा हात आपल्या हातांत धरला. तो पुढें कांहीं बोलणार इतक्यांत ताराबाई मागें परतली. कुमारसिंग चटकन दूर सरला.

ताराबाईचे डोळे रक्ताप्रमाणें लाल झाले होते. ती म्हणाली.

'तीं किति वेळ रहाणार म्हटलेंस?'

'अवघे दोन तास.'

'तर मग चल आपण दोघेंही तिची भेट घेऊं.'

कुमारसिंगासह ताराबाई निघून गेली. मी पूर्वीच्या जागींच उभी होतें. त्यांच्या मागून एका घटकेनें मी माझ्या खोलींत गेलें. मी स्वप्नांतच कीं काय असें मला त्यावेळीं वाटलें.

पुढें थोडक्याच वेळानें मला माझ्या आवडत्या बिनाचा आवाज ऐकूं येऊं लागला. प्रेमकुंवर तें वाजवून गात होती. कुमारसिंग तिला लागून उभा होता. माझ्या जवळ तो असा कधींच राहिला नव्हता. मला माझें दैव मोठें खडतर वाटलें. मी महाराजांची मुलगी होतें हें माझें स्वतःचें घर होतें. मी कोण हें लोकांस कळलें तर ते मला मोठा सन्मान देतील पण कुमारसिंगाकरितां मला तसें करावयाचें नव्हतें. त्याच्या सुखाकरितां जमीन जुमला आणि पैसा अडकाचसा काय, पण माझा प्राण देखील खर्ची घालण्यास मी तयार होतें. त्याला सुख नाहीं तर मला कसें मिळेल?

मी उद्यां पृथ्वीच्या प्रवासास जाणार व त्यांनां या माझ्या संस्थानाचा उपभोग घेऊं देणार. पुढें कांहीं दिवसांनीं मी परत तुवरगडावर येईन. मग मला माझा प्राणविसावा आपल्या प्रियेसह नांदत असलेला दिसेल. अभिमानी ताराबाई ही दृष्टीस पडेल.

माझ्या डोळ्यांतून या वेळीं घळघळ दुःखाश्रु वाहूं लागले. अहाहा! हा बाष्पपूर कां बरें लोटला असेल? माझ्या मनांत पुन्हां विचार पडला.

---

## प्रकर्ण ११ वें

### गुप्त—परिस्फोट.

कांहीं वेळानें माझ्या जिवाला चैन पडेनासें झालें. कुमारसिंग हा विश्वासास योग्य आहे आणि पेटीची चावी माझ्याकडे आहे हें मला माहीत होतें. पण, कर्मधर्म-संयोगानें जर ते कागद कोणाच्या दृष्टीस पडले तर मग काय बरें करावें? वाड्यांतील सौख्य व ऐश्वर्य प्राप्त करून घेणें ही कांहीं विशेष कठीण अशी गोष्ट नव्हती. पण माझ्या मनाला ती गोष्ट रुचली नाहीं. जर त्याला—माझ्या प्रियकराला—या कागदांतील एवढासा मजकूर कळेल तर, तो जें काय करील तें न्यायानेंच करील.

सर्वस्व अर्पण करण्याचा माझा विचार जसजसा दृढ होत चालला, तसतसा माझ्या मनाला उल्हास येत चालला. माझें प्रेम आजपर्यंत परमेश्वरासच माहीत होतें. तें मी आतां कुमारसिंगास व्यक्त करून दाखविणार. माझ्या मनांत प्रेम रवीचा प्रकाश पडला. माझी त्याच्या-

वर किती प्रीति होती त्याचें हें, ढळढळीत प्रमाण होतें. प्रेमाकरितां स्त्रिया याहून अधिक तें काय करणार ?

माझ्या प्रियानें माझ्याकरितां तुवरगड कधीं सोडूं नये. मी जगाच्या अवाढव्य पाठीवर कोठेंही फिरत राहिलें तरी, माझ्या प्रियकरानें याच ठिकाणीं आपल्या सुंदर पत्नीसह व मुलांबाळांसह रहावें. सौख्याचा अंश त्यालाच मिळावा व दुःखाची वाटेकरीण मी व्हावें. आयुष्यांतील उत्कर्षाचे व सुखाचे दिवस त्यानें भोगावे व अपकर्षाची बाजू माझ्या वाट्यास यावी अशीच माझी इच्छा होती. माझ्या उपकाराचा त्याला मागमूसही नसावा. मी मरायला टेंकलें ह्मणजे कदाचित् त्याला मी हें सांगेन, पण छेः—त्यानें सर्वच बिघडून बसेल. माझा प्राण देखील खर्ची पडला पाहिजे. माझ्या आईच्या वृंदावनावर जसा शरदिनी हा एकच शब्द आहे, तसाच, माझ्या वृंदावनावरही कमला हा एकच शब्द असावा. प्रेमाकरिता सर्वस्व खर्ची घालण्याच्या उत्कटेच्छेनें माझें मन उचंबळूं लागलें व मी त्याच्या केवळ बऱ्याकरितां प्रेमार्पणानें होणारा त्रासही सोसण्यास तयार झालें.

कुमारसिंग विश्वसनीय असो अगर नसो मला माझे कागद मिळाले पाहिजे होते. त्यानें माझ्यावर विश्वास ठेवला होता परंतु मला, त्याला काय वाटेल तें वाटो ह्मणून विश्वासघात करणें अवश्य होतें. कशाही प्रकारचीं संकटें गुदरलीं तरी मला त्या कागदांचा नाश केलाच पाहिजे होता. पण हें होणार कसें ? ताराबाई पुष्कळ वेळ आपल्या खोलींतच बसून हाती. तेव्हा मी असा विचार केला कीं काळोख पडल्यावर प्रेमकुंवर

दिवाणखान्यांत रोजच्याप्रमाणें गाणें ह्मणूं लागेल, मग ताराबाई तिकडे जाणारच. ती गेल्यावर हळूच खोलींत जाऊन तेवढे कागद घेऊन त्यांचा पूर्णपणें नाश करावा. नंतर कुमारसिंगाला ' मी तुझा विश्वासघात केला ' असें सांगावें. आणि ही किल्ली तेव्हांच त्याच्या हातांत द्यावी.

रात्र कांहीं काळोखी नव्हती. चंद्र-प्रकाश स्वच्छ पडला होता. माझ्या मनांत विलक्षण उत्सुकता उत्पन्न झाली होती. माझ्याप्रमाणेंच वाटून ताराबाई जर पेटी उघडून कागद पाहील तर, मी काय करणार? मग माझ्या या इच्छा जागच्याजागींच राहतील. अहाहा! प्रियकरा! नाहीं—नाहींच ते कागद मी आपणाला दाखविणार! अगदीं फाशायला टेंकलें तरी चालेल, ते कागद मी माझ्या काखेंत घट्ट धरून सुखानें [illegible]न.

माझें अंतःकरण दुःखानें व्याप्त झालें ; इतक्यांत दिवाणखान्यांतून प्रेमकुंवरचा गायनस्वर माझ्या कानावर आला. मला मोठा आनंद झाला. ताराबाई दिवाणखान्याकडे निघून गेली. खोलीचें दार उघडेंच होतें सर्व चाकरमाणसें आपआपल्या कामांत निमग्न होतीं. माझी चाहूल ऐकेल अगर मला पाहील ह्मणायला, माझ्याजवळ कोणी नव्हतें. खिडकींतून माडीच्या पायऱ्यांवर चंद्रप्रकाश अगदीं स्वच्छ पडला होता. व त्या प्रकाशानेंच अगदीं चोरून मी जिन्याखालीं उतरलें.

मी ताराबाईच्या खोलींत शिरलें. चंद्राच्या एक दोन किरणांवांचून त्या खोलींत दुसरा कसलाच प्रकाश नव्हता. मी चटकन पेटीजवळ जाऊन तिचें [illegible]

काढलें. माझे कागद जशास तसेच होते. ते घेऊन मी तशीच मागल्या पावलीं खोलीबाहेर पडलें.

या मौल्यवान पुडक्याची आतां कशी वाट लावावी? त्याचा नाश तरी केलाच पाहिजे होता. पण ती काय सोपी गोष्ट नव्हती. कागद फाडून चूर चूर जरी केले तरी पण ते राहिले असतेच. विस्तवांत टाकून राख रांगोळी करावी म्हटलें तर माझ्या जवळील कुठल्याच खोलींत विस्तव नसून फक्त स्वैंपाक घरांत मात्र तो होता ' पण तेथें जाण्याचा मला धीर होईना. नंतर माझ्या मनांत आकास्मिक एक कल्पना आली. ती अशी:— पुडकें आहे तसेंच घेऊन, त्याला एक जड शिळा बांधावी व तें सर्व चंबळेच्या खोल डोहांत भिरकावून द्यावें

या कल्पनेनें माझ्या मनाला मोठा आनंद झाला. मी आपली शाल डोकीवरून घेतली. नंतर मी तें पुडकें काखेंत मारलें व घराबाहेर पडलें. मोठ्या दरवाजाच्या बाहेर मी पडलें मात्र इतक्यांत माझ्या मागून कोणी आल्याचा मला भास झाला. परंतु मी फार सावध-गिरीनें निघालें होतें. यामुळें कोणीं मला पाहिलें असेल असें माझ्या मनांत मुळींच आलें नाहीं.

वाऱ्याच्या झुळकीनें झाडांचीं पानें फडफडत होतीं. चंद्राचा शीतल प्रकाश पटांगणावर, झाडांवर, घरांवर, वगैरे सर्वत्र पसरला होता. तो देखावा फारच मनोहर होता. मी वाटेनें जाऊं लागलें तेव्हां माझ्या सभोंवतीं पूर्ण शांतता होती. मी सावकाश रमत चाललें होतें

कारण मला घरातून बाहेर पडल्यावर घाई करण्याची गरजच नव्हती.

मी तें पुडकें हातांत घेतलें होतें. चंबळा नदीचें पाणी, कांहीं अंतरावर चांदण्यांत चमकत होतें. मी त्या नदीच्या अगदीं तीरावर पोंचलें व पाण्याकडे पहात कांहीं वेळ उभी राहिलें. केवळ प्रियाच्या प्रेमाकरितां निःशेष केलेल्या माझ्या इच्छा या चंबळा नदींत जल समाधी घेणार होत्या. माझ्या प्रियाकरितां खर्ची घालण्यास तयार केलेलें माझें ऐश्वर्य व प्रमाणभूत असे कागद यांवर त्या पाण्याच्या लाटा वाहावयाच्या होत्या.

मी खालीं गवतावर बसून, कुमारसिंगास हें सर्व कळेल तर, त्याचा चेहरा कसा होईल तें आठवूं लागलें. त्याचे ते सुंदर नीलनेत्र आनंदानें कसे भरतील—व माझी निंदाही करतील, त्याचा चेहरा किती प्रफुल्लित दिसेल, यांचा मी चंद्रप्रकाशांत विचार करीत बसलें. मी तो प्रसंग कधींही विसरणार नाहीं.

नंतर मी एक जडसारखा दगड शोधून आणला व तो त्या पुडक्यासह एका फडक्यात घट्ट बांधला. पुडकें जरा मोठें असतें तरी देखील, त्याला बुडविण्याइतक्या वजनाचा तो दगड होता. मग मी सावकाश नदीच्या अगदीं कांठावर आलें. व त्या पुडक्याचें मी प्रेमानें चुंबन घेतलें. जगांतील प्रत्येक वस्तूस व माझ्या ऐश्वर्यास, माझ्या प्रियाकरितां—केवळ प्रियाच्या प्रेमाकरितां —मी शेवटचा प्रणाम केला. व 'प्रेमा! केवळ तुझ्याकरितां' इतके पुन्हां शब्द बोलून मी तें पुडकें नदींत

झोंकून देणार, इतक्यांत माझा कोणीं कीं मागून हात धरला व त्यानें तें पुडकें काढून घेतलें.

मीं मागें वळून पाहिलें तर कुमारसिंग माझ्या मागें उभा होता. मग मात्र माझ्या काळजांत धक्का बसला.

'तूं हें काय करतेस?' तो मोठ्या गंभीर शब्दानें ह्मणाला! मी दचकून मागें सरलें. माझ्या तोंडावरील पाणी उतरलें. अंगाला कापरें सुटलें व एक शब्दही बोलतां येईना. डोळ्यांतून झरझर अश्रुधारा वाहूं लागल्या.

कांहीं वेळानें मी ह्मटलें 'महाराज! माझ्या बऱ्या-करितां, आपल्या हिताकरितां व परमेश्वराची मी शपथ घेतली आहे, ती पाळण्याकरितां माझें हें पुडकें मला परत द्या. आपण त्याला हात लावूं नये अशी माझी विनंति आहे. मी वेडी होऊन जाईन.

'त्यांत काय आहे, तें मला समजलेंच पाहिजे. कमले तुझ्यासंबंधीं त्यांत कांहीं लिहिलेलें असावें असा मला संशय येतो, तेव्हां त्याची मला निवृत्ति केलीच पाहिजे.'

माझी निराशा होण्याचा रंग आला तेव्हां मी त्याच्या पायावर पडलें व ह्मटलें.

'महाराज! मज गरीबावर दया करून तेवढें माझें पुडकें माझ्या स्वाधीन कराल काय? आपला त्याला हात लागला? हाय! हाय!! तर मग ही पहा माझी प्राणज्योतही मावळत चालली.'

तो माझ्याकडे पाहून ह्मणाला 'कमले इतर कसली

गोष्ट असती तर, मी तिकडे कानाडोळा केला असता. पण, ही महत्वाची गोष्ट दिसते, तेव्हां मला तसें करतां येत नाहीं. यांत काय आहे, तें मला पाहिलेंच पाहिजे. '

मी त्याचा स्वर ऐकला व त्याच्या चेहऱ्यावर होणारे फेरबदल पाहिले तेव्हां, माझे सर्व उपाय खुंटले. माझ्या पायास कांपरें सुटलें. मी तें पुडकें घेण्याकरितां उभी रहात होतें पण मला तसें करतां येईना. मी धाडकन् गवतांत पडणार होतें, इतक्यांत त्यानें मला सांवरून धरिलें.

कमळे ! ' तो गहिंवरून ह्मणाला. 'तुझें दुःख पाहून माझा गळा गहिंवरून येतो. या अश्रुधारा माझ्यानें थांबवत नाहींत, पण काय करूं मला तुझें संरक्षण केलेंच पाहिजे. '

नंतर त्यानें काय काय केलें तें सर्व मला चांदण्यांत दिसत होतेंच. त्यानें त्या पुडक्यावरील फडकें सोडलें व दगड काढून दूर फेंकून दिला. त्यानें नंतर कागदाचें पुडकें उघडलें तेव्हां माझ्या अंतःकरणांत जसें होत होतें तें माझ्यानें सांगवत नाहीं. माझ्यासारखा ज्यांना प्रसंग आला असेल त्यांनांच तें कळेल.

एका मागून एक असे अनुक्रमें तो ते कागद लक्ष्य पूर्वक वाचूं लागला. प्रमाणभूत दाखले, माझ्या बापाचे दाखले व शेवटीं त्याचें मृत्यपत्र त्यानें वाचलें. मग मात्र मी ध्यानावर नव्हतें. नक्षत्रांसह चंद्र भूमितलावर पडला व चंबळानदीस पूर येऊन मी त्यांत वहात आहेसें मला वाटलें.

कांहीं वेळानें मीं डोळे उघडून पाहिलें तर नक्षत्रें चंद्र किंवा नदी यांपैकीं मला कांहींच दिसलें नाहीं. फक्त ज्याच्याकरितां मी माझा प्राणही खर्ची घालण्यास तयार होतें तो माझा प्रियकर सखेदाश्चर्यानें माझ्यावर वांकलेला दृष्टीस पडला.

तो ह्मणाला 'कमले ! हे माझ्या उदार प्राणा ! आपले डोळे उघड आणि माझ्याकडे बघ. नंतर मी माझे डोळे पुसत पुसत त्याच्याकडे पहात उठून बसलें.'

कमले !' पुन्हां तो ह्मणाला 'तूं आतां मला काय सांगणार ? तुझी मला सर्व हकीगत कळली. तूं आपल्या नांवालौकिकास व ऐश्वर्यास झुगारून देण्याचा प्रयत्न चालविला होतास. तूं तसें कां करीत होतीस तें मला कृपा करून सांगशील काय ?

'महाराज !' मी ह्मटलें 'आपल्या हिताकरितां केवळ, आपल्या हिताकरितां. आपला तोटा करून अगर आपणास दुःख देऊन, माझा नफा करून सुखांत रहाण्याचें, मला आवडलें नाहीं. माझा नफा तो आपला तोटा नव्हे काय ?

एवढे शब्द कसेबसे माझ्या तोंडून बाहेर पडले मात्र, इतक्यांत पुन्हां मी बेशुद्ध पडलें. चंबळेंत वाहून गेल्याचा पुन्हां मला भास झाला. पुढें मी शुद्धीवर येऊन पहातें तर माझ्या दृष्टीस नदी पडली नाहीं. सुंदर नीलनेत्रांची अशी माझ्या प्रियाची मूर्ति, तीही माझ्या शेजारीं नव्हती. मी एका सुंदर खोलींत अंथरुणावर पडलें होतें. ही खोली माझ्या वहिवाटींतली

नव्हती. रघुनाथजी मला कमळेसें औषध खलून देत होतेच. हिराबाई व चंदादासी या त्या खोलींत उभ्या होत्या.

खिडकीच्या गजांतून सूर्याचा स्वच्छ प्रकाश खोलींत पडला होता. तेव्हां मी ह्मटलें, 'कुमारसिंगजी आपण कोणीकडे आहां बरें? माझे कागद कोठें आहेत, ते मला दाखवा.'

'कमलाबाई! रघुनाथजी ह्मणाले' कुमारसिंग आतांच बाहेर गेले आहेत. ते आल्यावर आपले कागद देतील. तोंपर्यंत जरा झोंप घ्या.'

मी डोळे झांकून झोंपेची मार्ग प्रतिक्षा करूं लागलें. पण व्यर्थ. डोळाच लागेना. यावेळीं मी चांगली शुद्धीवर होतें. नदीतीरावर घडलेली एकंदर गोष्ट मला आठवली कुमारसिंगाला माझें गुप्त कळलें. ज्या कागदांवरून त्याला माझी हकीगत कळली ते नाहींसे करून आतां काय उपयोग असें मला वाटूं लागलें. ते कागद माझ्या जवळ नाहींत, ही गोष्ट देखील त्यावेळीं माझ्या लक्षांत आली नव्हती. रघुनाथजींनीं मला झोंप घे ह्मणून सांगितलें, व मीही स्वस्थ पडून पाहिलें पण ती येईना. आधणाचें पाणी सळसळतें तद्वत, माझ्या शरीरांतील रक्त सळसळूं लागलें. थोडक्याच वेळांत मी कमला, महाराजांची मुलगी व तुवरगडची जहागीर-दारीण असें समजेल व माझा प्रियप्राण जो कुमारसिंग त्याला तुवरगड सोडावा लागेल. असें मला वाटूं लागलें.

मला मोठा भयंकर ताप आला होता व त्यांतच भ्रम झाला. त्यांत चंबळानदीला पूर येऊन ती मल

समुद्रांत घेऊन गेली. जातांना मी तिच्याशीं पुष्कळ झुंजलें, धिंगामस्ति केली, मला बुडवूं नको म्हणून तिची विनवणी केली, पण कांहीं केल्या ती ऐकेना. शेवटीं मी समुद्रांत पडलें तेव्हां ती शांत झाली असें मला वाटलें.

माझा ताप केव्हां कमी झाला ती वेळ माझ्यानें सांगवणार नाहीं. कुमारसिंगानें मला नदीतीरावर आपल्या बाहुद्वयांत धरिली तेव्हां, चांदणें स्वच्छ पडलें होतें. भाद्रपदाचा महिना लागून आठ एक दिवस झाले होते, तेव्हां; मी एके दिवशीं सकाळीं चांगली शुद्धीवर आलें. यावेळीं सूर्याचे कोंवळे किरण खोलींत भिंतीवर पडले होते.

नंतर काय काय घडलें तें सर्व मी ऐकलें व तें सांगण्यास मला हें स्थळ योग्य वाटतें.

कुमारसिंग मला हातांत धरून वाड्यांत आला. मी ज्या ठिकाणाहून कागद चोरून काढले होते, त्याच ठिकाणीं म्हणजे ताराबाईच्या खोलींत त्यानें मला प्रथम नेऊन निजविलें व आपण आपल्या आईस बोलावण्याकरितां बाहेर गेला. पुढें तीं दोघेंही आंत आलीं, व माझ्या पलंगाच्या दोन बाजूंस दोघें उभीं राहिलीं.

'आई!' कुमारसिंग म्हणाला 'जिला पुतें नांव मल्हतें, जिच्यावर तूं चोरीचा आळ घातला होतास, जिला तूं वाईटसाईट शब्द बोलून वाड्यांतून हांकून लावणार होतीस, ती मुलगी कोणाची कोण तें तुला माहीत आहे काय?'

'कुमारा!' ती म्हणाली 'मलाचसें काय पण,

वाड्यांतील एकंदर माणसें तिच्याविषयीं अज्ञान आहेत. कोणा एकालाही तिची माहिती नाहीं.'

'आई! पण मला ती माहीत झाली आहे. आपल्या या संस्थानचे जहागीरदार जे जगत्सिंग महाराज त्यांची ही प्रत्यक्ष मुलगी आहे हिच्याशीं तूं फारच वाईट रीतीनें वागलीस.'

कुमाराच्या तोंडचीं वरील वाक्यें ऐकतांच तिचा चेहरा पांढरा फटिक झाला. ती ह्मणाली.

'कुमारा! तूं हें कशावरून ह्मणतोस? माझी तर कांहीं खात्री होत नाहीं.

'खात्री होत नाहीं? तर मग हे महाराजांचेच कागद वाच.' ताराबाईनें सर्व कागद वाचले.

'आतां तरी तुझी खात्री होते कीं नाहीं.' तो ह्मणाला.

'हो आतां न व्हायला काय झालें. ती झालीच पाहिजे.'

ताराबाई हे वरील शब्द मनःपूर्वक बोलली नाहीं. ती ह्मणाली 'महाराजांचें मन इतकें निष्ठूर असेल असें मुळींच वाटलें नव्हतें. त्यानां जिवंतपणीं आपल्या मुलीचें देखील कांहींच वाटलें नाहीं ह्मणून आश्चर्य वाटतें. किति भयंकर चूक.'

'आणि तीच चूक ते दुरुस्त करणार होते, इतक्यांत मरणाधीन झाले.' मी ह्मटलें.

माझा शब्द ऐकतांच ताराबाई कावरी बावरी झाली.

'आई!' तो ह्मणाला 'हेच कागद तिला वर अडगळीच्या खोलींत सांपडले होते. ते वाचून तिनें

कपविले इतकेंच नव्हे तर त्यांचा नाश करण्याचा तिचा विचार होता. आई ! तिचें हें औदार्य काय लहान-सहान असें तुला वाटतें काय? ती आपला नांवलौकिक धनदौलत व प्रसंग पडल्यास प्राण देखील खर्ची घालण्यास तयार झाली होती; आणि तें कां तुला सांगूं काय ?'

'हं सांग जें काय सांगायचें तें एकदम सांगून टाक.'

आनंदानें कां दुःखानें तें सांगवत नाहीं पण तिच्या डोळ्यांतून यावेळीं अश्रुधारा चालल्या होत्या.

तो ह्मणाला 'फक्त या कुमारसिंगाकरितां ही तें कृत्य करण्यास तयार झाली होती. माझा तोटा झालेला तिला आवडेना; ह्मणून तिनें आपल्या नफ्यावर पाणी सोडण्याचा विचार योजिला. जगात अमोल्य अशा ज्या वस्तु, त्या सर्वांचा ती त्याग करण्यास तयार झाली होती.

'आणि ह्मणूनच तिचें मन फार मोठें असें ह्मणावें लागतें.'

'खरोखरीच आई! माझ्याकरितां सर्वस्व अर्पण करणारी दुसरी एखादी तरी स्त्री याशाप्रकारची असेल काय?'

नाहीं कुमारा! हिच्या इतकी उदार स्त्री मिळणारच नाहीं.'

'आतां या सर्वांवर तिचें स्वामित्व आहे. हें सर्व तिच्या स्वाधीन केलें पाहिजे. चुकीची दुरुस्ती केल्या बद्दल सर्व लोक महाराजांची वाहवा करतील. जयसिं-

गास उद्याच बोलावणें धाडतों. ते आल्यावर कमले-ला तुवरगडचें स्वामित्व देऊं.'

ताराबाईनें मोठ्या कष्टानें कुमाराच्या बोलण्यास हुंकार दिला. कांहीं वेळ स्तब्ध राहून ती ह्मणाली:-

'हें सर्व तिचेंच आहे पण, जग काय ह्मणेल?'

'मला जगाशीं कांहींच कर्तव्य नाहीं. यापुढें कमलाच येथली मालकीण होणार व सर्व लोक तिचें स्वामित्व कबूल करणार.'

नंतर मला माडीवरच्या दिवाण खान्यांत नेलें. तेव्हां माझ्या अंगांत भयंकर ताप भरला तो दुसरे दिवशीं सकाळीं काढला.

मी चांगली शुद्धीवर होतें. मी कोण हें वाडाभर समजलें. दाया वगैरे वाड्यांतलीं सर्व माणसें मला ताईसाहेब ह्मणून हाका मारूं लागलीं. दुसरे दिवशीं ताराबाई मला भेटण्याकरितां आली. ती अलीकडे माझ्याशीं वरोपचारी प्रेमानें व सभ्यतेनें वागत होती; पण तिचें मन स्वच्छ नव्हतें.

ती अगदीं जवळ येऊन माझ्या हाताचें चुंबन घेण्याकरितां खालीं वांकली व ह्मणाली.

'माझ्या प्रिय मुली कमले, तुला मी फारच निर्दतेनें वागविलें असें कुपारसिंग वरचेवर ह्मणतो व मला त्याचें मोठें वाईट वाटतें ह्मणून मी तुझ्याजवळ माफी मागतें. तूं मला क्षमा करशील काय?

'मासाहेब! तुह्मां सारख्यानां ही यःकश्चित् पोर

झाला. तूं मोहनेची मुलगी अशी लोकांनीं मुद्दाम माझी समजून केली. पूर्वी पूर्वी माझा त्यांच्या बोलण्या-वर विश्वास नव्हता, पण जेव्हां अंबालालच्या बाय-कोनें प्रत्यक्ष आपणास अंबाजीचा दृष्टांत झाला, व आतां तिला जवळ केलीत तर तुमचें धड होणार नाहीं असें सांगितलें; तेव्हांच माझें मन तुझ्याविषयीं कलुषित झालें व मग तुझ्याशीं तशी वागूं लागलें यांत मी कांहीं गैर केलें असें का तुला वाटतें.

'छेः गैर कसें होईल. तुम्ही मला औदार्यानेंच वागविलें'

'तूं जगसिंगाची मुलगी असशील अशी माझी-चशी काय पण कोणा एकाची कल्पना नव्हती'

'आणि ह्मणूनच मला मागील दिवस दुःखा कष्टांत काढावे लागले'

'कमले! आतां मागची गोष्ट विसर व मन निर्मळ करून माझ्याकडे बघ. तुझें हें दुःख कमी होऊन तूं कधीं बरी होशील असें मला झालें आहे.'

'तुम्ही माझ्याविषयीं इतकी कळकळ बाळगतां हें पाहून मला मोठा आनंद वाटतो, पण मासाहेब! खरें सांगूं का?'

'बेटा—तुला काय वाटतें तें खरें सांग.'

मी लगेच तिच्या हाताचें चुंबन घेतलें व ह्मटलें.

'मी आता कांहीं बरी होईनसें वाटत नाहीं. कारण तुवरगडचें स्वामित्व कुमारसिंगाकडून घेण्याचा विचार नाहीं. त्याला तुवरगडचा मोठा अभिमान

माझें हें भाषण ऐकून तिला हंसें आलें. ती इतक्या

चमत्कारिक रीतीनें हांसली कीं, तसें हंसें मी पूर्वी कधींच पाहिलें नव्हतें.

ती ह्मणाली 'कमले! आतां तुवरगडावर तुझा अधिकार. यामुळें माझ्या मुलाचा कांहीं अंशीं तोटा होणार हें खरें, पण तो कांहीं गरीब मनुष्य नाहीं. त्याला लवकरच दुसरें घर मिळेल. येथें आल्यापासून आह्मांला तिळमात्र त्रास झाला नाहीं. तुला मात्र भारी त्रास झाला. याचा मला मोठा पश्चात्ताप होतो.'

ताराबाई ! माझ्याशीं फारच गोडीगुलाबीनें वागूं लागली. एकेदिवशीं सहज बोलतां बोलतां ती मला ह्मणाली कीं, तुझ्याहून जास्त औदार्याचें कृत्य मला करतां येण्याजोगें नाहीं. कारण तूं केवळ माझ्या मुला-करितां आपलें घरदार, धनदौलत, व नांवलौकिक या सर्वांवर पाणी सोडण्यास तयार झाली होतीस.

मी दिवसेंदिवस बरी होत चाललें व मी कोणाची कोण ती बातमी सर्वतोमुखीं झाली. अशा रीतीनें माझ्या नांवाचा व कुळाचा परिस्फोट झाल्यानें ताराबाईचीं पत्रें खरडणारी दासी तुवरगडची वारसदारीण कशी झाली तें सर्व संस्थानभर कळलें.

मी आजारी पडल्यादिवसापासून मला कुमारसिंगाचें दर्शन नव्हतें. ताराबाईशीं माझ्या भाविस्थिति विषयीं विचार करण्याजोगा जोम आला. मी तिच्याजवळ ती गोष्ट काढीत असे पण ती ह्मणे कीं, तूं चांगली बरी हो ह्मणजे आपण त्याविषयीं विचार करूं.

तो भाद्रपदाचा महिना होता. मी एके दिवशीं वाचनगृहांत गेलें. त्या ठिकाणीं ज्यावर माझे बाबा

लिहीत बसले होते ती खुर्ची, तें मेज व ते सर्व कागद पहातांच मला पूर्वीचें स्मरण होऊन पोटांत भडभडून आलें. मीं तो दिवस तसाच पूर्वस्थिति आठवून उदासपणात घालविला.

दुसऱ्या एके दिवशीं मी अशीच ताराबाईसह दिवाणखान्यांत बसलें होतें. बाहेर झिम्म पाऊस पडत होता, गुलाबाचीं अगदीं थोडीं फुलें फुललीं होतीं. तिकडे पहातांच प्रेमकुवरचें मला एकाएकीं स्मरण झालें. कारण तिला तीं फुलें फार आवडत असत.

'मासाहेब!' मी ताराबाईला एकदम विचारलें 'हल्लीं प्रेमकुवरबाई वाड्यात दिसत नाहींत.'

'ती गेली.'

'केव्हां आणि कोठें?'

'ती मुलखाची मित्री होती. तुला तापांत सान्निपात झाला तेव्हांच ती निघून उज्जयनीस गेली.'

'तर मग' मी ह्मटलें 'माझ्या दुखण्यानें त्यांच्या लग्नांत विघ्न आलें ह्मणायचें.'

'कुणाच्या लग्नांत?' ताराबाईनें झटकन विचारलें.

तिचा हा प्रश्न ऐकून मी मोठ्या आश्चर्यांत पडलें. मी स्वप्नांत तर नाहींना? आजारीपणांत मला खूप स्वप्नें पडत व तीं खरींही ठरत. मी खूप गोंधळलें. प्रेमकुवरशीं कुमारसिंगाचा विवाह व्हावयाचा होता. पण ताराबाईचें आज बोलणें अगदींच परतलें होतें.

मी विचारलें 'प्रेमकुवरचा व कुमारसिंगाचा विवाह ना होणार होता?'

ती जरा गोंधळल्यासारखी झाली, पण झटकन् पुन्हां पूर्ववत चेहरा करून ह्मणाली.

'कमले ! तुला तें अगदीं खरेंच कां वाटलें. मी तुला तसें सांगितलें होतें खरें पण, त्याचें कारण अगदीं निराळें होतें.'

'तें कोणतें ?'

'प्रेमकुंवरच्या आईची व माझी बाळपणापासूनची मैत्री होती. माझें व तिचें एकाच मंडपांत लग्न झालें. पुढें तिला व मला जेव्हां मुलें झालीं तेव्हां त्याच्या लग्नाविषयीं आह्मी बोलत होतों. प्रेमकुंवरपेक्षां कुमार चार वर्षांनीं मोठा आहे. तिच्या आईच्या मनांतून तिला कुमारालाच द्यावयाचें होतें व ती मला, ही तुमची सूनबाई असें ह्मणत होती. आणि मी तरि तिचें मन कशास मोडावें ह्मणून थट्टेनें हूं हूंच ह्मणत आलें. आज त्या गोष्टीस सोळा सतरा वर्षें झालीं तथापि मी तसें ह्मणतेंच आहे. खरें ह्मणशील तर माझ्या मनातून कांहीं तिला सून करावी असें नाहीं.'

'पण कुमारसिंगाच्या मनांत तरी ती बायको असावी असें आहे ना ?'

'छे; तो तिच्याशीं वरवर प्रेमानें बोले एवढेंच. बाकी प्रेम नव्हतें.

ताराबाईच्या या बोलण्याचें मला जितकें आश्चर्य वाटलें तितकाच आनंद झाला. पुढें थोड्याच वेळानें जयसिंग आले. त्यांच्याबरोबर कुमारसिंगही होता. माझी दृष्टी पुन्हां एकवार त्याच्यावर पडताच मी एकंदर विसरलें. तो माझा हात धरून ह्मणाला.

'कमले ! तुझी प्रकृति सुधारलेली पाहून मला मोठा आनंद वाटतो.'

नंतर तो माझ्या शेजारी बसला. त्यावेळीं माझ्या या मूर्ख हृदयास त्यानें माझा अंगिकारच केला असें वाटलें.

जयसिंग ह्मणाले 'तुवरगडावर कमलेची पूर्ण मालकी असल्याची या कागदावरून सिद्धता होते. तेव्हां हें तिच्या स्वाधीन करावें असें मला वाटतें.'

'माझेंही मत तसेंच आहे' कुमारसिंग उत्सुकतेनें ह्मणाला.

मी ह्मटलें 'आपला विचार अगदीं योग्य आहे' पण माझें मत तुवरगडचें संस्थान कुमारसिंगा-कडेच असावें असें आहे. सुखासमाधानांत व ऐश्वर्यांत राहतां येईल इतका पैसा मी त्याच्याकडून वेळोवेळ मागून घेत जाईन पण हें संस्थान मला नको.

'तें कां ?' जयसिंग ह्मणाले.

'कारण कुमारसिंगाची त्याच्यावर प्रीति आहे. तो त्याचें योग्य प्रकारें संरक्षण करितो आणि सर्व लोक त्याच्यावर प्रेम करितात. मग त्याच्यापासून मला तें कसें घेववेल. तें त्याच्याजवळच असूं दे.'

नंतर मी त्या माझ्या प्रियकराकडे वळून ह्मटलें.

'महाराज ! कां मी ह्मणतें तें खरें ना ? आपली या संस्थानावर प्रीति आहे नव्हे काय ?'

'हो ! प्रीति आहे. पण, ती त्या केवळ संस्थाना-वर नव्हे. त्यांत तुझ्यासारखा एक उदार प्राणी आहे त्याच्यावर'

त्याच्या या भाषणानें माझ्या मनाला किति आनंद झाला असेल त्याचा वाचकांनींच विचार करावा.

मी माझ्या शिक्कामोर्तबानें त्याला तुवरगडचा अधिकार देण्यास सिद्ध झालें. पण जयसिंगास ती गोष्ट आवडली नाहीं. त्यानें लगेंच आपली मान हालवली व ह्मटलें.

'तुवरगडावर तुझा अधिकार आहे व तो तूं तुझ्याच जवळ ठेवला पाहिजे'

'कमले!' 'तुवरगडचें आधिपत्य तुलाच शोभतें' कुमारसिंग माझ्या हाताचें चुंबन घेऊन ह्मणाला.

मग मात्र माझा निरुपाय झाला, कारण सर्वांच्या इच्छेविरुद्ध माझ्यानें वागवेना. मला तें अयोग्य वाटूं लागलें. अर्थात — सर्वांच्या अनुमतानें मी तुवरगडची मालकी संपादिली.

नंतर दिपवाळीच्या सणापर्यंत मी ताराबाईसह जुन्या वाड्यातच असावें व कुमारसिंगानें सर्व व्यवस्था पहावी असें ठरलें. पण कुमारसिंग मध्येंच 'मी बाहेर गांवीं जाणार, असें ह्मणाला. मला ताराबाई व जयसिंग जवळ असल्याचें भानच राहिलें नाहीं. मी झर्कन् त्याच्या गळ्यांत हात घातला व ह्मटलें.

'महाराज! कितितरि दिवसांनीं हा जन्मभेटीचा योगायोग असून आपण बाहेर गांवीं जाणार ह्मणतां मग माझ्यानें धीर तरी कसा धरवेल. महाराज नका हो—नका—आतां कोठें ही जाण्याचा विचार करूं नका.'

जयसिंग व ताराबाई तेव्हांच निघून बाहेर गेल्या. कुमारसिंगानें आपली मान खालीं घातली व तो ह्मणाला.

'कमले! तूं हें काय केलेस. सर्वांदेखत माझ्या खांद्यावर हात घालण्यास तुला धीर तरी कसा झाला? प्रेमकुवर ती मीच असा तरि तुला भास झाला नाहीं ना?'

त्याच्या या बोलण्याचा अर्थ माझ्या मनांत तत्काळ बिंबला, पण मी त्यावेळीं इतकी प्रेमानें बांधलें गेलें होतें कीं माझ्यानें त्याला जा ह्मणवेना. मला टाकून न जाण्याविषयीं मी त्याची विनवणी करूं लागलें तेव्हां तो ह्मणाला.

'मला एव्हांच इकडे राहतां येत नाहीं. तें फारच गैर होईल. मी आतां गुजराथेंत अन्हीलपुरास जाणार त्याच ठिकाणीं महाराजांचा शरदिनीशीं विवाह झाला होता. शरदिनीचें वृंदावन ही तेथें आहे तें पाहून व उज्जयनीस जाऊन तिकडची कांहीं तजवीज करून मग मी इकडे येईन.

'पण—गेलेंच का पाहिजे.'

'होय. मी बहुधा दिपवाळीच्या सणास परत इकडे येईन. तोंपर्यंत जयसिंग सर्व कारभार पाहतील. मी येईपर्यंत तुझी प्रकृतिही उत्तम सुधरून गुलाबाच्या फुलाप्रमाणें तुझा मुख--चंद्रमा प्रफुल्लित होईल अशी मला आशा वाटत आहे.

कुमारसिंग गुजराथेंत गेला. जयसिंग कारभार पाहूं लागला व माझी प्रकृति सुधारत चालली. माझ्या तोंडावर जसजशी तेजी येत चालली, तसतसे कुमारसिंगाच्या येण्याचे मी दिवस आणि तास मोजीत बसलें.

---

